# तुझेच मी गीत गात आहे (कादंबरी)
Tujhech Mi Geet Gaat Ahe (Novel)

लेखिका : शुभांगी पासेबंद
9869004712
scpaseband@gmail.com



प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान
www.esahity.com
esahity@gmail.com
9869674820

प्रकाशन : २३ मे २०१६

**अर्पणपत्रिका**

देवा मी हे पुस्तक लिहून मी तुझेच गीत गाते आहे. साडेतीन पीठातील त्या देवीमातांना मी ही कला अर्पण करते. त्या शक्ती देवता म्हणजे माहूरची रेणूका देवी, वणी नांदूरीची सप्तश्रुंगी देवी, कोल्हापूरची अंबाबाई व तुळजापूरची भवानी आई होय!

त्यांच्या आशिर्वादानेच मी हे लिखाण पूर्ण करु शकले. मी तर एक सामान्य व्यक्ति आहे. माझ्यातील प्रतिभा त्यांच्या कृपेने फुलते व मी लिहीते.

**ऋणनिर्देश**

ह्या पुस्तकातील महफिलीत मी रमलेली असताना मी कुणी वेगळीच होऊन जायचे. माझे ते हरवलेपण समजून घेऊन ज्यांनी मला मदत केली त्या सर्व स्नेही व आप्तांची मी ऋणी आहे.

**मनोगत**

खूप प्रयत्न करुन बनवलेला हा कलाकृतीचा नैवेद्य मी माता सरस्वती समोर व वाचकांसमोर ठेवत आहे.

अभिव्यक्तीचे उत्कृष्ठ रुप परमेश्वराच्या कृपेनेच बनत असते. वाचकांना ते आवडेल यावर माझा विश्वास आहे.

शुभांगी पासेबंद

ठाणे १५ ०४ २०१६

गढीमाळावर साम्राज्यात, आनंदगावच्या अंतर्भागात, नदीकिनारी हा राजमहल म्हणजे ऐतिहासिक अशी ही हवेली होती. सतराव्या शतकात बांधलेली ती भव्य वास्तू होती. बाजूला हिरवीगार झाडी होती व सर्वत्र मऊ सुत काळी माती होती. भव्य बुरूज, रूंद तटबंदी व पटांगणातील एका चौथऱ्यावर राजाचे सुवर्ण सिंहासन होते. सोन्याचा पत्रा कधीच बेपत्ता झाला होता. तुकडे कापून विकला गेला की चोरीला गेला सांगणे कठीण आहे. पण दगडी अवशेष शिल्लक होते. राजेपाटलांच्या त्या हवेलीतील प्रथमदर्शनी दिसणाऱ्या त्या दुसऱ्या मजल्यावरील खोलीतील सज्जाच्या खिडकीजवळ एक उत्तम प्रतीचा सागवानी लाकडाचा पलंग ठेवलेला होता. ऐतिहासिक काळात या शय्यामंचकावर मोत्याचे वेल सोडलेले होते. आता त्या पलंगावर जेथे कोरीवकाम दिसत होते तेथे पूर्वी पोवळी, पाचू व सोन्याची वेलबुट्टी होती. काही शतकापूर्वी या हवेलीने खूपच वैभव पाहिले होते व या मंचकावर पूर्वी चांदीचा पत्रा वापरून खऱ्या सोन्याने मोर बनवून खांबावर कोरलेले होते. कधी काळी राजे, आधीराजेही आरुढ झाले होते. स्वातं«योत्तर काळातील वैभव, स्वातं«यलढयातील अस्वस्थता या महालांनी अनुभवली होती. या महालात समयांच्या प्रकाशात पूर्वी तिथे रात्री सजल्या होत्या, दीप रागाच्या मैफली उमलल्या होत्या. आज त्याच महालातील दुसऱ्या मजल्यावर राजेपाटलांचा वंशज आदित्यराजेपाटील त्या पलंगावर पडून आपले सोनेरी आयुष्य आठवत होते. कधी आपल्या भाग्याचा हेवा करत होते. कधी उसासे सोडत होते. राजाचा सोन्याचा राजदंड शिल्लक होता; पण त्याची रवानगी बॅंकेच्या लॉकरमध्ये झाली. पर्यटकांसाठी चांदीचा मुलामा लावलेला राजदंड ठेवला होता.

शंभर वर्षापूर्वी याच पलंगावर थोरले भाऊरावसाहेब  मोठया मुलाने- केशव राजेने लग्न केले नाही म्हणून झुरुन वारले. धाकटया सोन्याभाऊंना त्यांनी सुंदर मुलगी करुन आणली. तिला मुलेही आली. पण केशवचा संसार सजला नाही हे दु:ख धरुनच भाऊराव राजे वारले. त्याच पलंगावर निजून सोन्याभाऊसाहेब आदित्यराजेंचे वडील, मुलीचे आशाराजेंचे लग्न बघायला मिळाले नाही म्हणून खंत काढीत वारले होते. त्यांना दोन मुलगे होते. आदित्य व सीताराम. मुलांचे संसारही सुखी होते. पण मुलीचे लग्न व्हावे व टिकावे म्हणून बराच प्रयत्न करुनही त्यांना यश आले नव्हते. दोन्ही मुलांचे संसार सुखी होते व त्यांची मुले श्रीमती आशाताईंनी आपल्या मुलांप्रमाणे सांभाळावी. सुन्या आयुष्यात तृप्त राहावे,  असे सोन्याभाऊंना वाटत असे. पण आदित्य व सीतारामने कधीही आशावर प्रेम केले नाही. अगदी उलट तिचा राग रागच केला. तिघे भावंडे आदित्य सीताराम व आशा एकमेकांपेक्षा निराळी होती. कर्तृत्वात दोघा भावांपेक्षा आशा सरस होती. पण भावांनी तिचे कधीही चांगले होवू दिले नाही. आपल्या इस्टेटीत ती वाटणीदार आहे असा भाव ठेवून तिचा रागरागच केला. भाऊबंदकीत जे मराठी किंवा अन्य साम्राज्यांचे होते तसे ्झाले पाहता इथे मला वाटते साम्राज्य टिकले, पण राजेपाटलांनी तिची वाट लावली व स्वत:चे हित घडवले. दुबळयाचा बळी देऊन इमले बांधावे तसेच! आदित्य व सीताराम पूर्ण सुखी होते. पण बहिणीचे अहित करणे, हे त्यांचे एकमेव ध्येयधोरण होते. राजघराण्यातील भाऊबंदकीचा आजार या घराण्यालाही होता.

कसक ये दिन रातकी,

तडप ये बिन बातकी,

यालाच म्हणती भाऊबंदकी.

आज त्या महालातील उच्च अभिरुचीपूर्ण त्या दालनातील त्या पलंगावर आदित्यराजे पाटील पहुडले होते. ते भातुकलीच्या खेळातले राजे नव्हे, तर ते खरेखुरे राजे होते.

नवल म्हणजे याच जागी पूर्वी भाऊसाहेब राजेपाटील निजत असत व म्हणत असत ‘कसे होईल माझ्या मुलाचे?’ त्याच जागी सोन्याभाऊसाहेब निजून दु:ख करीत ‘माझ्या मुलीचे कसे होईल?’ आणि आज त्याच पलंगावर पडून आदित्यसाहेब आपल्या आयुष्याचे पुनरावलोकन करीत होते. त्या राजमहालात हुरहुनरी सोन्याभाऊंनी प्रयत्नांनी वीज आणली होती. आधुनिकतेचे वारे, यांत्रिकीकरणाद्वारे आल्याने घरात दूरदर्शन, वातानुकूलित यंत्रणाही आली होती. असेही हवेलीचे बांधकाम काळया कातळाच्या चमकदार दगडाचे असल्याने मूळचाच थंडावा होता. आजूबाजूला उंच झाडांचे देखणे असे फणसाचे व नारळाचे झाड द्वारपाल होते. रस्त्यावर हेलियम स्ट्रीट लाईटस् आले होते. एका उद्योगपती अक्षय वाच्छानीने जवळच एक हॉटेलही काढले होते. हा वाच्छानी तिथे पर्यटकांसाठी सर्व सुखसोयी करीत असे. गावात या राजेपाटलांची हवेली बघण्यासाठी टूरिस्ट या जागेला आवर्जून  भेट देत. त्यांत परदेशी नागरिकांचा व अतिश्रीमंतांचा भरणा असे. त्या राजमहालात आतल्या बाजूला सुसज्ज उच्चअभिरुची जागा होती. त्यामुळे वाच्छानीचे हॉटेल जोरात चालत असे. वाच्छानी राजकारणातही बऱ्यापैकी जम बसवून होता. हा एक दिवस आपली हवेली हडपणार, ही भीती मला आदित्यसाहेबांना होती. तो घोर जिवाला लागल्यामुळे मला राग येउन ***‘दिवस बरा की रात्र’ वाटे.*** त्यामुळे जरी मी आदित्यराजेने काही पैसे घेऊन त्याला हवेली दाखवण्याचे कंत्राटी काम दिले होते, तरी दोघांना तो आवडत नसे.

त्या राजमहालात आतल्या बाजूला सुसज्ज उच्चअभिरुचीपूर्ण कलादालन होते. तिथे अनेक तैलरंगचित्रे व मूर्ती होत्या. काही जुन्या, तर काही आशाताईंनी बनवलेल्या, तर काही आधुनिक, तर काही ऐतिहासिक होत्या. पण सर्वच सुंदर होत्या. पूर्वीच्या काळी जेथे हत्तीपागा होती, तिथे हल्ली आदित्यसरांची होंडा गाडी उभी होती एखादा छोटा टूरिस्ट कंपनीवाला राखणदाराला पैसे देऊन वाच्छानीच्या मदतीने हवेलीचा तळमजला दाखवत असे. व्हीआयपी ग्रुप असेल तर अधिक पैसे घेऊन कलादालन, स्टील्ट कार पार्किंग व स्थापत्य कला  दाखवीत. आपण आधुनिक सजावट एकविसाव्या शतकात पाहिली, ते काम त्यापूर्वी ४०० वर्षे, पण सतराव्या

शतकात पूर्वजांनी त्या हवेलीला केले होते. स्टील्ट कार पार्किंग महाराज राजेपाटलांनी केले हाते. वाच्छानी हॉटेलचा मालक राजमहालमध्ये बॉलरुम करु इच्छित होता. आदित्यराजेंनी काही इस्टेट यापूर्वी  विकली होती. सरकारकडून तनखा होता, पण खर्चही खूप होता. शिवाय घोडयावर पैसे लावायची सवय सर्वांना होती. सरकारी नियमाने व राजे संस्थानाचे वतन म्हणून ही जमीन मिळाल्याने विकता येत नव्हती. वाळूचे घडयाळ, सतीचे समाधी मंदिर व भातुकलीच्या राजाराणीच्या उंच लाकडी मूर्ती बघायला पर्यटक येत असत.  वाच्छानी हॉटेल्सच्या त्या टूरिस्टवाल्याचे द्वारासमोर ६० फूट रुंदीचा मोठा रस्ता पसरला होता व पुढेही २३० एकर शेतीवाडी जमीन, एक ओढा, अशी ऐसपैस पसरलेली हवेलीची वाडी होती. वाच्छानीने आधी तिथे थोडीशी त्याची टाचकीटुचकी जागा छोटया हॉटेलपुरती अतिक्रमण करुन मिळवली व नंतर पाय रोवले. सोन्याभाऊराजेचा मुलगे दोन मी आदित्यसाहेब मला दोन मुले होती व दोन्ही मुले अमेरिकेत शिक्षणासाठी गेली होती. परत यायचे नाव काढत नव्हती.

मोठा मुलगा विराज पन्नाशीला आला होता व धाकटा सागर ४८ चा होता, पण त्यांची अजून लग्न झाली नव्हती. आधुनिक वातावरणात व लिव्हइनच्या फॅशनमुळे त्यांना लग्न नको वाटे व सुयोग्य मुलगीही मिळाली नाही. उगीचच आदित्यसाहेबांच्या मनात आले.

आपल्या मुलांचे कसे व्हायचे, आपल्या राजे घराण्याला शाप तर नाही ना? तरीही तो विचार मनातून बाहेर काढून त्यांनी आपली सुविद्य पत्नी सौ. रजनी  हिला बोलावले व ते तिच्याशी गुजगोष्टी करु लागले. वाच्छानीच्या बायकोबरोबर गावातील राजकारणात किरकोळ सहभाग घेऊन रजनी खूष असे. शिवाय परदेशातील खरेदी मैत्रिणींना दाखवण्यात कायमच बिझी असे. आजूबाजूच्या वस्तीतील खूषमस्करे, पार्लरवाले किंवा शेजारच्या बहाद्दरच्या वाडयातील बायका, नोकरांच्या बायका तिच्याकडे कधी बसायलाही येत. तिच्या मानाने मी आदित्यसाहेब थोडे एकाकी, निराशेकडे झुकून खंत करणारे वृध्द झालेले, थकणारे, झुकणारे व मितभाषी होते.

रजनी  थंड सरबत घेऊन आली.

‘‘आज उदास वाटतेस?’’ आदित्यराजे.

‘‘तुम्ही उगीच खंत काढता. सुख टोचतेय तुम्हाला. ’’ रजनी.

‘‘चला दोघेजण फिरायला जाऊ या! ’’ आदित्य.

‘‘मला भिशीपार्टी आहे. तुम्हाला मी मृदमणी डोहावर, सिनियर सिटीझन क्लबमधील मित्रांमध्ये सोडते. तिथे काही पेन्शनर्स जमतात. तुमचे मन रमेल. परदेशातून आलो आहोत, जेटलॅग होणारच! जाऊ परत अमेरिकेला ६ महीने होता. नाराज होऊ नका. ’’ बर ठीक आहे, म्हणून आदित्यसाहेबांनी तिची गाडी काढली. तिच्याबरोबर ते मृदमणीच्या रम्य हिरव्यागार डोहावर गेले. तिथे आज एकही पेन्शनर नव्हता. सर्वजण जवळ आनंदगावच्या शहरात कुठल्याशा सभेला गेले होते. ‘‘रजनी, तू गाडी घेऊन जा. मी बसतो. ’’ हा माझा मार्ग ऐकला, असे म्हणून रंग उधळणाऱ्या सूर्यास्ताला बघत आदित्यसाहेब बसले. एक वर्ष खरेतर परदेशी मुलांकडे मजेत खुषीत राहून व्हिसा संपल्याने परत आल्यामुळे रुळायला वेळ लागणारच! पण मन ऐकेना. लगेच त्यांनी स्वत:ला समजावले. मातीच्या मण्यांसारखा तो गोल डोह त्याच्या चकचकीत पाण्यामुळे मृदू वाटे म्हणून, मातीचा मण्यांसारखा तो गोल डोह मातीचा आहे म्हणून, त्याचे नाव मृदूमणी पडले होते.

एक डास घोंगावत आला व चावू लागला. आदित्यसाहेब तरीही बसून राहिले. त्यांनी नेम धरुन तो डास बरोबर दोन हातांमध्ये धरुन मारला. त्याच वेळी त्यांच्या मनात आले, आशाताईला असे मारता आले असते तर…

पण ताई मच्छर नव्हती. सहज मेलीही नसती व जर मेली असती तर आपलीच अधिक बदनामी झाली असती. वाच्छानीने आपल्याला हैराण केले असते. मृदूमणी डोहाच्या थोडया अंतरावर पलीकडे सरदार पत्नी आनंदलीचा ऐतिहासिक वाडा व भिंत दिसत होती. साफ पडझड तोडमोड झाली होती. शिवाय त्या तशा वस्तीतले काही लोकही चोरुनमारुन तिथे राहायला आले होते. देवळातील कोरीव मूर्त्या कधीच चोरीला गेल्या होत्या. घाणेरडया स्वस्तातल्या फरशा लावल्याने तो आनंदकीचा वाडा शोभाहीन वाटत होता. तो एखादया जुन्या सरदार घराण्याच्या इमारतीवत  न वाटता सामान्य कलाहीन व अभिरुचीहीन वाटत होता. एक बुरुज पूर्ण ढासळला

होता. कै. सरदार पत्नी आनंदीबाई इथे राहायच्या. इतिहासकालीन किती घटना तिथे घडल्या. महायुध्दकालीन चर्चा कितीवेळा येथे घडल्या. त्या जागी आता चोरउचक्के राहतात. वॉचमन अन्य प्रांतीय, ते पैसे घेऊन माणसे हवेलीत सोडतात. अनैतिक धंदेही चालतात असे ऐकले. कै. आनंदीबाईंना मूलबाळ नव्हते. त्यांचे नाव लावायला कुणी वंशज नाही. खरेतर ऐतिहासिक स्मारक जतन व्हावे इतके टुमदार आहे, पण खास अनुदानप्राप्त स्मारकांच्या त्या यादीत ते नव्हते. नियमात न बसल्याने स्मारकांच्या यादीत त्यांचे नाव नाही. यामुळे ती वास्तू शापीत आयुष्य जगते आहे. आत सरदारांनी बांधलेल्या शिव मंदिराचे भग्न अवशेष आहेत. पण दगड व चिरे कुणाकुणाच्या धरी पाटा वरवंटे म्हणून विराजमान झाले आहेत.

पण सरदारांप्रमाणे आपल्यालाही काही एकदोन वर्षात मरण येणार. आपण जास्तीत जास्त दहा वर्षे जगणार. नंतर आपल्याही या सुंदर राजमहालाची काही काळामध्ये आनंदली किल्ल्यागत दशा होईल किंवा मुले अमेरिकेहून परत भारतात येत नाहीत म्हणून हा राजमहाल किल्ल्याप्रमाणे, वाडयाप्रमाणे बनेल. वाच्छानी राजमहालची आपली हवेली हडप करेल. समाजकारणात पडलाच आहे. हळूहळू मोठा होईल व राजमहालामध्ये त्याचे जनसंपर्क व लोकसेवा कार्यालय सुरु करेल. तो सुशोभीकरणा नावाखाली व नूतनीकरणाच्या आश्वासनाने जागा बळकावेल. तो कॉन्फरन्स हॉल सुरु करायचे, बॉलरुम बनवायचे स्वप्न पूर्ण करेल. हॉटेल बनवेल. आपल्या माघारी जे होईल ते! आपण तर समृध्द आयुष्य जगलो. एक सुस्कारा सोडून कंटाळा आला म्हणून ते उठून महालाकडे चालू लागले. खरेतर राजेसाहेब फोन करुन गाडी बोलावू शकत होते. पण ते घरी जाऊन तरी काय करायचे म्हणून घराकडे चालू लागले. त्यांना घरी राजमहाली जावेसे वाटत नव्हते असे नाही, पण आज बाहेर बरे वाटत होते. अमेरिकेचे दिवस संपले. उदयापासून आनंद गावचा नवा डाव मांडायचा. ते मनाशी म्हणाले.

‘आदित्यराजे’

कुणाची तरी हाक आली. ते थांबले. पण दूरवर कुणीही नव्हते. मृदूमणीच्या डोहाच्या गोदावरी नदीच्या विशाल पात्रात, निळयाशार पाण्यात आदित्यने प्रतिबिंब पाहिले. पाण्यातील,

आरशातले माझे रुप देखण्या, चतुर माणसाचे होते. पण सर्वच आरसे सत्य रुप थोडीच दाखवतात व आरशात दिसणारी प्रतिबिंबीत प्रतिमा खरी असतेच असे नाही. राजे त्यांच्या आरशातील त्या रुपावर खूष झाले व पुटपुटले ‘माझ्या मनातील प्रतिमा फक्त मलाच कळत होती व ती मला बघायची नव्हती. ’ राजे घरी पोहोचले. राजे पुन्हा पुटपुटले. ‘परत जायचे आहे ऑस्टीनला. ’

ते तळमजल्यावरील दालनात शिरले. त्या खोलीतील दालनात कोपऱ्यात एक मोठी सुरई होती. एक पितळी नक्षीदार रांजण होता. वर पूर्वी हाताने नोकर जो नक्षीदार पंखा हलवीत व राजांना वारा घाली तसा हाताने फिरणारा कापडी पंखा होता. जमिनीवरील कोपऱ्यातील कातळी घळीतून पाणी सोडून हवा थंड करायची कूलरसारखी यंत्रणा होती. राजेंनी आता वातानुकूलित यंत्र लावले होते. ऐश्वर्याच्या व उच्च राहणीमानाच्या खुणा त्या दालनात जागोजागी विखुरल्या होत्या. भिंतीवरील आरशात त्यांच्या राजबिंडया रुपाची प्रतिकृती दिसत होती. पण मनात कुठेतरी त्यांना वाटत होते की, मी राजा नाही. मी राजघराण्यात जन्मलो, पण राजस नाही, राजहंस नाही, मी राजा नाही. बगळा, ढोंगी बगळा! मी दुष्ट आहे. पण माझी प्रतिमा मी भ्रामक करुन प्रतिष्ठित अशी केली आहे. ती तशीच ठेवण्यात माझे हित आहे.

खरेतर स्वत:च्या बहिणीचा आशाराजेंचा जीव घेणारा दुष्ट माणूस, पण संस्कृतीरक्षकाचा टेंभा मिरवतो. पाकिस्तानमधील कुठल्याशा गावात स्त्रियांना जसे जगणे मुश्कील केले जाते. मारले जाते म्हणे. तसे मी तिचे आयुष्य मुश्कील केले. तिला हाकलणे हा माझ्या प्रतिष्ठेचा प्रश्न केला. सिबलींगरायव्हरी, हेवा! ईर्षा! बुरसटलेपण!

गॅलरीतून बॅटमिंटनचे कोर्ट दिसत होते. गावातील तरुण, तरुणी संध्याकाळी खेळायला येतात. तेवढेच पायरव होते. त्यातील त्या कोवळया मुली आदित्यला विनाकारण आशाताईसारख्या वाटू लागल्या. ‘‘आशाताईसारख्या व्यक्तिमत्वाच्या, कलाप्रेमी, प्रतिभावान मुलीच्या आयुष्याचे मी पोतेरे केले. ’’ राजे पुटपुटले.

राजे स्वत:शीच बोलू लागले. ‘मीच तिचे पहिले लग्न जमवले. राजघराणे मोठे घर पोकळ वासे व कलाहीन नवरा होता. म्हणायलाच राजघराणे चांगले स्थळ होते. घरी घेणेकऱ्यांची रांग

लागत होती. जसे जगणे खाणेपिणे व वावरणे जमले ती जगली. पोट भरायला अन्न लागते म्हणून शेळयामेंढया, कोंबडया पाळाव्या लागत. आशाताई सासरी गेली व त्या घरी कोमेजून गेली.

‘काय पाहूनी कन्या देली शिवाला बाई

पर्वकाल पाहूनी गंगेत लोटली का नाही. ’ असे आजी म्हणे.

सीताराम व सोन्याभाऊ  जाऊन तिला परत राजमहालात घेऊन आले. तिला सेकंडहॅण्ड म्हणून हिणवण्याची संधीही मी सोडली नाही. मला ती घरी नको होती. पण तिला हाकलणे जमले नाही. कारण मला हक्क नव्हता. ती माझ्या वडिलांच्या महालात राहात होती व ते वडील तिचेही होते. ती मला नको होती व सीतारामभाऊंनाही ती नको होती. पण आम्हा दोघा भावांचे स्वअर्जित काहीच नव्हते. तिला बाहेर काढायची सोय नाही. त्यावेळी सोन्याभाऊ माझे वडील चांगले ठणठणीत जिवंत होते. त्यामुळे मी थोतांड करुनही उपयोग झाला नाही. मी घटस्फोटांचा डाग लागलेली अशोकवनातील सीता म्हणून तिला मी हिणवत असे. ती राजमहालात खालमानेने जगू लागली.

पूर्वी इंग्रजांनी एक सनद काढून संस्थाने विलीन केली. सत्ता, श्रीमंती व राज्य गेले व पूर्वज हळहळले. राजेपाटलांच्या संस्थानाला हातातल्या अधिकाराला उतरती कळा लागली होती. इंग्रजानी जेव्हा संस्थाने खालसा केली, तेव्हा लाखोची दौलत मातीमोल झाली. जे उरले होते ते दागिने पलंगांचे चांदीचे पाय, भांडीकुंडी, खरी सोन्याची जर असलेले कपडे मोडून विकले गेले. महालाची रया गेली. सावकार उभे करेना. वाकून नमस्कार करणारे विचारेना. पाश्चिमात्यांचे राजेशाही थाटात खाणेपिणे व वावरणे व ऐहिक जीवनाचा उपभोग घेणे आमच्या राजेपाटील खानदानाने पटकन उचलले. आर्थिक आवक पुरेशी होती. पण चैन करावी एवढी नव्हती. आशाताईचे सासरहून परत माहेरी येणे, मी ही नाइलाजाने स्वीकारले. मी कुरकुरत होतो. माझे वैभव गेले, पण आम्ही भाऊ आदित्यसाहेब व सीतारामभाऊ आता ह्या क्षणाला तरी श्रीमंत होते. राजवाडा होता. उच्च अभिरुचीपूर्ण कलादालने, पैसाअडका होता. दागदागिने होते.

साठवलेला पैसा होता. शेतीचे उत्पन्नही भरपूर येत होते. दुसरी लहान वाडयाची केशवभाऊंची वास्तू हॉटेलला भाडयाने दिली होती. खाली लवून आदित्यराजे जिना चढू लागले. गंगाघाटी दधाश्वमेघ घाटावर बनारसला राजा विभूत नारायणसिंगने जशी लिफ्ट बसवली आहे, तशी बसवून घ्यावी, असा विचार त्याच्या मनात आला. राजमहालात गोलगोल फिरणाऱ्या व नागमोडी पायऱ्या होत्या. ते एका दमात त्या चढून आले. नक्षीदार कमानीचा दरवाजा पुढे होता. त्या लाकडी दरवाजाला पितळी कडया होत्या. हत्तीच्या धडकांनी उघडला जावू नये किंवा तुटू नये म्हणून खिळे लावलेले होते. अणकूचीदार ते खिळे वाडयाचे रक्षण करीत. आत नक्षीदार कमानीचा हौद होता. कोरीव हौद! त्यात एक पूर्वी अप्रतिम वाटणारे  नृत्यांगणेचे शिल्प होते. पण परदेशी झुळझुळते विदेशी कारंजे पाहून आल्यावर येथे बांधलेले ते कारंजे माझे  दृष्टीने आता तुटके व तुटपुंजे वाटणारे बनले होते. त्यात आता पाणी नव्हते. एकदोन दिवसांत पाण्याची सोय करता येईल व कारंजे राजमहाल पूर्ववत होतील. मुले अमेरिकेला गेल्यावर एकच नोकर व एकच दासी कामाला ठेवली होती. वाडयात खंदक व भुयारे होती व एक विचित्र असे मृत्यूचे अदभुतसे गूढ वलय महालाभोवती होते. त्यामुळे चोरांची भीती कधीही नव्हती. गावातील लोक अजूनही, संस्थान खालसा झाले तरीही, आदित्यसाहेबांना राजेसमान मानत होते. याहून अधिक काय हवे असते? रातराणीचा धुंद सुवास नाकातून पार शरीराच्या रोमारोमांत भिनला होता. रात्रीच्या कल्पनेने पूर्वी आदित्यराजे आनंदीत, उत्साहित होत. ठराविक वेळी मदय, उंची जेवण व राणीचा सहवास, रातराणीचा सुवास, सुखासीन रात्र! पूर्वजांच्या आशीर्वादाने सर्व काही विलीनीकरणानंतरही आलबेल होते. राजेपाटलांच्या घरात मुली नकोशाच असत. अजूनही नकोशाच होत्या. दोन मुलगे झाल्याने आदित्यराजेंना स्वर्ग दोन बोटे उरला होता.

तसे पाहता उनपावसाने व काळाने महालावर परिणाम केला होता. तो राजेशाही देखणा महाल काहीअंशी खंडहर वाटत होता. पण आत गेल्यावर प्रवेश करतानाची लॉंज, चिंचोळी जागा व बरेच नक्षीदार खांब होते व वरचे दालन भव्य होते व रंगरुप वैभव राखलेले होते. जरी बाकीचा भाग तितकासा खास नव्हता. तरी ऐटदार होताच. कलादालनात जुन्या काळाची मोठमोठाली

तैलचित्रे सोनेरी काठाच्या फ्रेममधून त्रिमिती भास देत होती. चित्रातील घोडे ही अगदी आता उधळतील असे हुबेहूब रंगवलेले होते. डाळिबी ओठांच्या स्त्रिया होत्या. पावसात भिजणारी, आता न्हावून आलेली, पाणी भरणारी, अशा तैलचित्रांसमोर राजे उभे राहिले. आशाराजेंनी रंगवलेले एक चित्र होते, खाली लिहिले होते, 'सुन्या सुन्या मैफलीत माझ्या'. पुढे एक फिनिक्स पक्षी होता, त्या चित्राला नाव दिले होते, 'फिरुनी नवी जन्मेन मी'. सर्व पूर्वज आपल्याकडेच बघत आहेत असे त्यांना वाटले. सर्व पूर्वजांची, पुरुषांचीच तैलचित्रे होती. पण राणीसाहेबांची का नाही? आशाराजेंना आपण या महालात जगणे मुश्कील केले नसते, तर त्यांनी नक्कीच या शाही राजमहालात आर्ट गॅलरी बनवली असती. आज समोरचे संगमरवरी कारंजे झुळझुळत असते. त्यांची धडाडी व हुशारी मला घाबरवून माझा जीव दडपून टाकी. म्हणूनच तर मी त्यांचा काटा अशाप्रकारे काढला.

उद्या या पूर्वजांत उदया माझाही फोटो लागेल. जन्म १९५६, मृत्यू २०२०?! इथे हॉटेल होईल. लोक हसत खिदळत हवेलीत येतील. दारु पितील व बॉलरुममध्ये नाचतील, या जागेचे पावि«य काय राहील?

सुंदर जलशात अचानक फुटक्या कानाचा कप हाती यावा व त्यामुळे त्या कपातून चवदार चहाही बेचव वाटावा, तसे त्यांना वाटले. ते वरच्या मजल्यावरील सज्जा जवळ टेकले. परदेशातून आणलेल्या दुर्बिणीने ते परिसर निरखू लागले. समोरच्या घरी वाच्छानीचा जावई मिजाशीत त्या पर्यटकांना माहिती सांगून हसत होता व आपण त्याला तुच्छ लेखत होतो. पण आज त्याने दोन्ही जावई हाताशी धरले होते व खुषीत होता. दोन्ही मुलींनी वडिलांच्या धंदयात पाय रोवले होते. वर्षा चे सहा महिने, म्हणजे टूरिस्ट सिझनला ते कुटुंब येथे येई. एरवी त्यांची शहरातसुध्दा जागा होती, तिथे ते राहात असत.

भूकेची जाणीव झाली. आदित्यराजे आत मुदपाकखान्याकडे वळले. दरवाजा सताड उघडा होता. आत देवापाशी समई जळत होती. यशोदाच्या आईने (मोलकरणीने) सुग्रास स्वयंपाक केला होता. रजनीराजे अजून भिशीच्या पार्टीतून परत आल्या नव्हत्या. महालाच्या गच्चीत जाऊन

मदय प्यावे म्हणून आदित्यराजनी नोकराजवळ इच्छा व्यक्त करताच, भीमाने गच्चीत शामियानाखाली जाळीदार टिपॉयवर सुरई, मदय (विदेशी) कट ग्लासेस सोडा आणून ठेवला. गच्चीतही एक फ्रिज होता. वरती आकाश हात वर केले तर तारे तोडायला येतील इतके जवळ वाटत होते. आदित्यराजचे राजचित्त उल्हासले.

आदित्यराजेंनी रसास्वाद घ्यायला सुरुवात केली. पूर्वी भरपूर चमचे, नोकर, मदतनीस, मित्र व तत्सम लोक  गराडा घालून असत. विदेशात गेल्यामुळे ग्रुप तुटला होता. जमेल, जमतील फुकट खाणारे जमतील पुन्हा! असतील शितं तर जमतील भुतं हळूहळू म्हणत राजेंनी एकटयानेच प्यायला सुरुवात केली. दोन पेग पोटात जाताच गात्रे सैलावली. 'असतील शीते तर जमतील भुते! ' पण शीते कुठे? कसे व्हायचे या मुलांचे?

सोन्याभाऊसाहेब बोलताहेत असा भास आदित्यराजेंना आला. त्यांनी चमकून आजूबाजूला पाहिले. कुणीच नव्हते. ''आदित्य अरे किती रे म्हातारा झालास! माझ्या खोलीला आग लागली, विझव रे. '' पुन्हा तसाच आवाज आला. गच्चीत गार वारा सुटला होता. पण घामाने थबथबलेले राजे घाईघाईतच धडपडत खाली आले. त्यांचे पाय लटपटत होते. त्यांनी दालनात येउन ब्लडप्रेशरची गोळी खाल्ली. आशाताईचा हक्क हिसकावला. गावकऱ्यांना, लोकांना लुबाडून पैसा मिळवला, पण तारुण्य नाही राखता आले. ते पलंगावर पडले व मनाशी म्हणू लागले.

''माझ्या मुलांचे कसे होईल? जीवनाच्या नाटकातील तीन अंकांच्या तीन घंटा झाल्या आहेत. आयुष्याचे तीनही अंक बालपण, तारुण्य मध्यान्ह, मध्यंतराविना पार पडले आहेत. कुठल्याही क्षणी पडदा पडेल. मरण्यापूर्वी आत्मचरित्र किंवा माझी कथा कुठेतरी लिहायला हवी. लिहून पुन्हा एकदा ते आपलेच आयुष्य त्रयस्थ रीतीने बघून ते अनुभव गंगार्पण करुनच मी पूर्वायुष्य व नवाजन्म  त्यांना सामना करु शकतो. अपराधी भाव मला नाही, पण सत्य सांगायचे आहे. एखादी/एखादा नातेवाईक पकडून त्याच्याजवळ लिखाण करावे. प्रेयसीबददल अनेक कथा लिहिल्या गेल्या. बहीणभावांबददल एकही नाही. माझे हे अनुभव कदाचित बहीण म्हणजे काय हे

सांगू शकतील. मला तरी अजूनपर्यंत आशाराजे काय अजब रसायन आहे, हे समजलेले नाही. ’’ राजे स्वत:शी बोलू लागले.

कुठल्याशा बक्षिसासाठीही आशाराजेंचे नाव सुचवले गेले होते. कुठल्याशा शाळेला, वर्गाला पाठयपुस्तक म्हणून त्यांचे लिखाण ठेवले होते. त्यांना बक्षीस मिळाले आहे, तर त्यांच्या लोकप्रियतेचा फायदाही घ्यायलाच हवा. एकदा निश्चय करुन त्यांनी एका मित्राला फोन केला व आत्मचरित्र लेखनाचा मनोदय व्यक्त केला. जीवनगाथा किंवा आदरांजली किंवा कुलवृत्तांत किंवा सर्वच एकत्र लिहावे. एखादा वृध्द, वरिष्ठ नागरिक पाठवा. त्याला तेवढीच मदत होते. असे सांगून मी मह्रराज आदित्यराजेंनी फोन ठेवला. आदित्यला शांत झोप लागली.

दुसऱ्या दिवशी वाच्छानी आत्मचरित्र लिहिण्यासाठी तरूण स्त्री लेखिका अलका घेऊन आला. ती एक तडफदार मुंबईची आधुनिक स्त्री होती. पण रजनी राजेंनी तिला बाइ म्हणून परत पाठवले. ती इतिहासाचे संशोधन करणारी होती. पण तरीही पत्नी त्या स्त्रीला म्हणून नको म्हणाल्या. एक साठे आडनाावाचे वृध्द हजर झाले. त्यांनी आशाराजेच्या लिखाणांवर विशेष अभ्यास करायचे ठरवले होते. त्यांच्याजवळ आशाराजेंची बरीच हस्तलिखीते, स्तंभ व कात्रणे जमवली होती. स्त्री जीवनावर ते अभ्यास करत होते. त्यांना मूलबाळ नव्हते व पत्नीही वारली होती. मी आदित्यराजेंनी त्यांना लिखाण सांगायला सुरवात केली. ‘‘पुस्तक पूर्ण होईपर्यंत त्यातील मजकूर व मी आत्मचरित्र लिहितो आहे हे बाहेर सांगायचे नाही. मी काही जहाल सांगितले तरीही लिहिताना त्यात मार्दव, अदब पाहिजे. ’’ ते साठेंना म्हणाले. तुम्ही लिखाण मंजूर केल्याशिवाय मी प्रकाशित करणार नाही. साठेनीं सुचवले. एका जाड वहीत त्यांनी लिखाणाला सुरूवात केली. त्यांची राहण्याची सोय राजेंनी महालातच केली. शीर्षक ठरले.

सुन्या सुन्या मैफलीत माझ्या, तसेच गीत गात आहे

वा सुन्या सुन्या मैफलीत माझ्या मी गीत गात आहे.

आदित्यराजेंनी खुशीत मान डोलावली. राजे सांगू लागले.

## १ तिचे माझे नाते,

ही कथा माझी व तिची आहे. ती माझी बहीण हे तिचे माझे नाते. एकाच आईचे रक्त आम्हा दोघातूंन वाहते. मी आदित्य राजेपाटील. एका उच्च सधन राजेघराण्यातील सुपुत्र! माझ्या ज्या विचारांची लाज वाटावी असे विचार मी पूर्वी काल आजपर्यंत अभिमानाने मांडत असे.

पुत्र व्हावा पुंडा त्याचा तिन्ही लोकी झेंडा.

अशी माझाी माझ्याबद्दलची कल्पना होती. आजपर्यंत होती. मला चार बहिणी होत्या व एक भाऊ – भावाचे नाव सीताराम होते व चार बहिणी सुनंदा, सुनीता, वसुधा, आशा, सुनंदा सर्वात मोठी होती व सुनंदा माझ्या कळत्या वयापूर्वीच सासरी अपघाताने वारली होती. हुंडयासाठी तिला छळले होते. सुनीता, वसुधा व तिघी जणी त्यांना दिलेल्या घरी सुखी होत्या. होत्या की नाही माहिती नाही. त्या दिल्याघरी राहात होत्या म्हणजे नांदत होत्या. कधीमधी पूर्वी यायच्या. पण आता संपर्क नव्हता. आपल्या घरी त्या ठीक असाव्यात आणि समजा सुखी नसल्या तरीही मी व पत्नी व असेही इतके लबाड होतो की, त्यांनी सासरच्या त्रासाला कंटाळून आत्महत्या केली असती की नाही, माहीत नाही. पण चतुर अशा आमच्या त्रासाला वैतागून जरुर केली असती. आम्हा हुशार दोघा भावांना मात्र नशिबाने गोऱ्या व बऱ्या बायका व सुखदायी नातेवाईक मिळाले होते. आम्ही स्वत: भाग्यवान होतो व आहोत. आम्हा दोघा भावांना दोन दोन मुले होते व मुली नाही जन्मल्या याची सोय करुन तो आनंदोत्सव आम्ही अभिमानाने साजरा करीत असू. असेही मला आठवते. बहिणींची भातुकली रंगली की, मी त्यात पाहुणा म्हणून जेवायला जाई व जेवण केल्यावर खाऊ खाल्ल्यावर दुष्टपणा करुन त्यांची भातुकली मोडून त्यांचा खेळ मोडून टाके. भातुकली मोडल्यावर बहिणी रडत. मी जोरजोरात हसे. मी कुलदीपक होतो. त्यामुळे बहिणींच्या तक्रारीकडे आईवडील दुर्लक्ष करीत.

मी पंचवीस वर्षांचा होतो. आशाराजें एकोणवीस वर्षाच्या होत्या. आम्हाला बहिणीही नसत्या तर आम्हाला वाटते आम्हाला स्वर्ग दोन बोटे उरला असता. माझ्या वर जबाबदारी फक्त

आशाचीच होती व मला ती ही नको होती. आशाराजे देखण्या होत्या म्हणजे शोभेसाठी बरी अशा नव्हे तर रूबाबदार भारदस्त कलाकार होत्या. मुलगी होऊ नये म्हणून मी दोन वेळा पत्नीचा शहरात गर्भजलाचिकित्सेनंतर गर्भपात करुन घेतला होता. जबाबदारी तीही मुलीची कोण घेणार? पैसा खर्च कोण करणार? मला नराधम, दुष्ट म्हणाल, पण या देशात बऱ्याच विकृत पुरुषांचीही पुरुषी वर्चस्वी वृत्ती आहे. त्यांना 'ती' हवी स्त्री म्हणून, शरीर म्हणून, मुलगी म्हणून नको. आई एका संस्थेची संस्थापिका होती. त्याच एका 'कन्या वाचवा मोहिमे'साठी मी ही सदस्य बनलो होतो. पण ते माझे रुप फसवे होते. हो वेळ काढून मी उद्या जाईन. मी तिथे त्या मित्रांमध्ये मन रमवेन. तर मला चार बहिणी. मोठी सासरी जळून वारली आणि त्याबददल मला आनंदच वाटतो. दुसरी हिमवादळात वारली. आई एकदा सांगत होती. अजून एक सात महिन्याचा गर्भपात झाला. मी म्हणालो, ''बरे झाले! ''

आई म्हणाली, ''नाही रे, मुलगा काय, मुलगी काय. आईला आपली मुलं हवीच असतात. '' माझी आई साधी, अर्धशिक्षित, अडाणी बाई. तिला काय कल्पना बदललेल्या काळानुसार जगात मुलीच्या गर्भाचा गर्भपात करणाऱ्या आया येणार आहेत. खरे तर आपण होऊन माझ्या बायकोनेसुध्दा तिची इच्छा म्हणून मुलगी नको म्हणून गर्भपात केला.

''आशाताई सारखी गल्लीत बेवारस फिरायला मुलगी नको. '' रजनीराजे नेहमी म्हणत असत. त्या वाक्यावर कडी म्हणून आम्ही चौघे, दोघे भाऊ + दोन त्यांच्या २ बायका फिदीफिदी हसलो. पण ताईला आधार देण्याएवढी, ती घराण्याचे रक्त आहे. कळण्याइतकी सांस्कृतिक पातळी आमची नव्हती. गल्लीत ती फिरु नये याची तजवीज म्हणून आम्ही काही केले नाही. नर किती हीन असे आम्ही विचित्र होतो. जबाबदारी घ्यायची हिम्मत नसलेले आम्ही मुलींनाच मारले. वर पुरुषार्थ या शब्दाचा गमजा केला.

आई वारल्यावर आईच्या बॅगेत दागिन्यांसाठी शोधाशोध केली तेव्हा मोठया सुनंदाताईला आईने लिहिलेले एक पत्र आईच्या बॅगेत सापडले. त्यानंतर मोठी ताई सासरी न नांदता परतली होती. तेव्हा मोठा भाऊ सीताराम तिच्याशी काय वागला ते समजले. तोपर्यंत मला वाटे की मीच

बहीण नको म्हणणारा होतो. त्या काळी आई ही अचानक समाजसेवा करु लागली होती. आईच्या त्या बॅगेत आईने वारलेल्या बहिणीला लिहिलेले पत्र सापडले. सुनंदा कशाने वारली असेल व आईची व्यथा त्या पत्रातूनच कळली. राजेपाटलांनी ते जीर्ण पत्र साठेंकडे म्हणजे लेखकाकडे आणून दिले व त्याला मोठयाने वाचा म्हणाले.

साठेंनी ते पत्र वाचले -

**२ माझ्या लाडक्या लेकीस,**

स. न. वि. वि. ,

तुला लिहिलेले हे पहिले व शेवटचे पत्र.

तुझ्यावेळी मला दिवस राहिले आणि नस्यजलचिकित्सा करुन घ्यावी व मुलगा होऊ दयावा किंवा गर्भपात करावा असा आग्रह सासूने धरला. पण माझीही इच्छा नव्हती व ते जमले नाही. खरेतर मोठे भाऊ होते. त्यामुळे तू मुलगी झाली म्हणून हाकारी करायचे कारण नव्हते. पण मुलगा हवा हा हव्यास आपल्या समाजात असतो ना! राजघराणे होते. पण सुशिक्षित तरीही... तर मुलगी झाली हो! म्हणून माझे पती तुला बघायला आलेच नाहीत. फेंदरी झाली म्हणून सासूने अवहेलना केली. अगदी तेलापाण्याला, अंघोळीला बाई-दाई लावली नाही. मी जे आयुष्यभर भोगले ते भोगायला नवीन बळी आला म्हणून मीही डोळयाला पदर लावला. निर्णय चुकला होता, पण आता काहीही करता येत नव्हते.

गोरी गोरी बाहुलीसारखी तू पाळण्यात मजेत पहुडली होतीस. बोटे चोखत होतीस, भूक मारत होतीस, रडून गप्प बसत होतीस. अभावाचे जिणे आम्ही तुझ्यावर तेव्हापासूनच लादले. वरच्या गल्लीतील डॉक्टरीण बाई बाळ बघायला आल्या. त्या म्हणाल्या, ‘‘तुला मुलगी नको असेल तर दे मला. मी छान सांभाळीन बाळीला. ’’ माझे पती तुझे सोन्याभाऊं वडील म्हणाले, ‘‘देऊन टाक. लग्न नाही झाले म्हणून डॉक्टरीन एकटी राहाते. कुत्री घेऊन फिरते. ती डॉक्टरीन आहे. तिलाही आधार होईल व आपल्याला नंतर पुन्हा मुलगा हवा म्हणून संधी येईल. ’’ पण माझे मन होईना. मी तुला घेउन घरी आले.

सोन्याभाऊंना, वडिलांना तुझी माया नव्हती. मोठा भाऊ तर हिला विहिरीत टाक, मला मांडीवर घे! म्हणत असे. तुझी तू मात्र अंगणात, झोपाळयावर किवां गच्चीतील उघडया पाळण्यात मस्तपणे आकाश-चंद्र सूर्य-चांदण्या फुले झाडे निरखत असायचीस. तुला सांभाळायला मी लक्ष्मी नावाची बाई ठेवली. सासऱ्यांनी पुन्हा संधी घे म्हटले. पण मी ठरवले की, एकदिवस गुपचूप कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करुन यायचे. नवऱ्याने धुसपूस केली. मी मात्र म्हणायची -

''मुलगी असली तरी एक दिवस नाव काढेल. वर्तमानपत्रात नाव छापून येईल तिचे. ''

दिसामाजी तू चंद्रकलांप्रमाणे वाढत होतीस. तुझे कौतुक कुणाला नव्हते. कदाचित तू मुलगा असतीस तर झालेही असते. आपल्या समाजात दुर्गुणी मुलाची किंमत सदगुणी मुलीपेक्षा जास्त असते. तुझा भाऊ तुझ्यापेक्षा तीन वर्षाने मोठा होता. पण तो मुलगा आहे म्हणून सर्वत्र भाव खाऊन जात असे. तू अक्षरश: कळत्या नकळत्या वयापासून उपेक्षिलेलीच होतीस. मी तुझे नाव ठेवले होते सुनंदा. तू सर्व काम करायला शिकलीस. बोटे वळायच्या आधीच तुला स्वयंपाक कळू लागला. तू शाळेत पहिली येऊ लागलीस.

एक दिवस सीतारामच्या शाळेतील गुरुजी त्याच्या वर्गमित्रांना व त्याला बखोटे धरुन तक्रार घेऊन घरी आले व वडिलांना म्हणाले. ''ही मुले कॉपी करत होती. '' वडील शांत बसले. भाऊ शेपूट घालून बसला. तो गेल्यावर म्हणाला, 'मी कॉपी केली नाही. शेवटी सर्व खकाना तुझ्यावरच निघाला. ' सीताराम म्हणाला. ''ही नेहमी पहिली येते, लक्ष ठेवा. हीच कॉपी करते का?'' वडिलांनी तुझ्यावर हात उगारला व संताप तुझ्यावर काढला. तुला गालाला जखम झाली. तू रडू लागलीस. मी हळद लावली. चूक कुणाची? कॉपी कुणी केली? व मार तुला का? पुरुषी वर्चस्व दुर्बल अबलेवरच का?

आयुष्य असेच असते - कुणाच्या तरी गुन्हयासाठी कुणाचा तरी बळी जातो. रस्त्याने चालणाऱ्या एकाचा धक्का दुसऱ्याला लागून तिसरेच कुणीतरी जखमी होते. तुझ्या भावाच्या वरचष्म्याची व गुंडागिरीची ती सुरुवात होती. आम्हीही थांबवली नाही. तुझ्या पहिल्या येण्याचे शिष्यवृत्तीचे, चित्राचे, स्वयंपाकाचे कुणीही कधीही कौतुक केले नाही. तरीही तू आपली आपण काहीतरी वाचत, लिहीत, चित्र काढत काम करीत स्वानंदी मग्न असे. तुझी चित्र बघायला अनेक जण येत. तुझी अंगणातली रांगोळी नेहमीच नेटकी असे. बागेत फळझाडे, फुलझाडे लावणे, अंगण शेणाने सारवणे ही कामे तू नोकरांकडून करून घ्यायची. सर्वात तुला अव्वल मार्क असत. तू लाडकी लेक होतीस. राजघराण्यातही तू साधेपणाने राहात असे. तुझ्या रुपाने माझ्या घरी कस्तुरी मृग आला होता. त्या सुगंधाने माझ्या घराचे नाव सर्वत्र रोशन होत होते. आमची कीर्ती द्विगुणित

होत होती. कधी कधी दया यावी एवढी तू कष्ट करीत होतीस. तुझा भाऊ लाडात होता. तू मात्र घरगडयाप्रमाणे गुलामाप्रमाणे कष्ट करीत होतीस. बारका बुटका तुझा अशक्त देह अजूनही आठवतो. त्या काहीच दिवसांच्या त्रासात तुला पोटदु:खीने उठवतही नसे. पण... कशी तरी पाय ओढत तू वावरत असे. त्या दिवसांतही तुझ्या मुर्दाड भावाला व वडिलांना चहा पाणी करुन देत होतीस. घरात नोकर होते तरीही तुला जन्माला घालण्याची खंडणी आम्ही वसूल करीत होतो. हो! माझे गप्प बसणे म्हणजे मूक संमतीच होती.

तुझ्या जन्माबद्दल नवरा घालून पाडून बोलत होताच. त्याच भरीस भर हा मुलगाही. तुझा भाऊ सीताराम बोलू लागला. मुलाचे नाव राम ठेवल्याने तो राम थोडीच होतो. ''बिन हुंडयाची कशी खपेल ही मरतुकडी?'' सीतारामचे ते शब्द रामबाणाप्रमाणे वर्मी लागत व तू रडू लागायचीस. वाढीच्या वयात ना तुला विश्रांती ना खुराक, तू जाड कशी होणार? नजरेत भरण्यासाठी तरी तुला मी थोडी विश्रांती द्यायला हवी होती. घरी नोकर होते. पण मुलीला तुच्छ लेखणे. उंच मान, बारीक कंबर, लांब वेणीचा जाड शेपटा घालून तुझे सारस पक्षासारखे लांब टांगा टाकत चालणे, अगदी पक्षी जातीचेच होते. निसर्ग तसा सर्वांनाच सारखा असतो. तो सूर्य पृथ्वीवरील सर्वांनाच सारखा प्रकाश देतो. बालपण, यौवन, वृध्दत्व, मृत्यू हे चक्र तर निसर्ग नियमच असते. माझी सासू वारली. आम्ही म्हातारे झालो. तू तरुण झालीस. तुझ्या शरीरावर यौवनाच्या खुणा स्पष्ट दिसू लागल्या. तुझ्या भावापेक्षा तू सर्वच बाबतीत उजवी ठरु लागलीस. त्यांना प्रतिकूल परिस्थितीत वावरावे लागते त्या तारका आपोआपच स्वयंप्रकाशित होतात. तू तेजस्वी व विचारी बनू लागलीस. त्यावेळी तुला सकस आहार दिला असता तर नक्कीच तुला ''मुलगी व नारळ द्या'' सांगून कुणाही राजकुमाराने हसत उचलून नेले असते.

आज मला वाटते... मी किती मूर्ख होते, मला मुलगी खपवायची होती तर मी घासून पुसून नटवून व्यवस्थित ठेवली असती तरी जवळपासच्या कुणी, नात्यातल्या कुणी कदाचित अक्षयने तुला मागणी मागून फुकटसुध्दा केली असती. तुझ्या भावाला जन्मापासूनच तुझी असूया होती. तुझ्या हातातले खेळणे तो ओढून घेई. तू माझ्या मांडीवर झोपली असलीस की, तुला

ढकलून देई. तुला कधी कधी लाथाही मारीत असे. मी त्याच्यावर संस्कार करायला कमी पडले. मी त्याला पुरुष म्हणून मुभा दिली व तुला स्त्री म्हणून अवास्तव संयमाची शिकवण दिली. नवऱ्याशी भांडायला ताकद नव्हती व लग्न जपून ठेवण्यासाठी त्यांना मम म्हणणे तुला दुय्यमपणे वागणे भाग होते. कारण वडिलांनाच मुलगी नकोशी होती. तुला कपडे भावाचे जुने मिळत असत. पुस्तके त्याने वापरलेली मिळत होती. तुला सायकलही त्याची जुनी मिळाली. 'तुला सर्व सेकंड हॅण्ड मिळते,' असा रामबाण भाऊ मारत असे. पण तू त्या सेकंडहॅण्ड वस्तूंतच आनंद मान होतीस. पर्याय कुठे होता? 'जुन्या सोन्यातून नवे दागिना आपण घडवतोच ना! 'सेकंडहॅण्ड म्हणजे काय?' तू विचारीत असे.

तुला अक्षयच्या घरुन विवाहाचा प्रस्ताव आला. पण आम्ही हुंडा दयायला तयार नव्हतो व त्यांना पैसा हवा होता. आम्हाला मुलांसाठी सर्व राखायचे होते. बिनहुंडयाचे, बिनचौकशीचे बीजवराचे राजघराण्यातील स्थळ तुला सांगून आले. तू खूप रडलीस व मला म्हणालीस.

''आई मला नवरा तरी सेकंडहॅण्ड लादू नको गं?''

मी हिम्मत करुन तुझ्या त्या वडिलांना व तुझ्या त्या भावाच्या बापाला माझ्या नवऱ्याला ते सांगितले. त्यांनी तोंडाचा पट्टा सुरु केला. भावाला विकृत, असुरी आनंद झाला. तो म्हणाला. ''असे कसे तोंड उलटून बोलतेस. मुलींना कुठे निवडीचा हक्क असतो का? होय, तिची इच्छा नाही तरी तिला त्याच घरी देऊया शिक्षा म्हणून. पुरुष कधी बीजवर होत नसतो. मुलगी म्हणजे गायी, ज्या दावणीला बांधू तिथे नांदायचे. त्याचेच उपकार आहेत. आपण राजघराण्यातली माणसे होतो. तो स्वखर्चाने लग्न करणार आहे. ''

वडील म्हणाले, ''भावाचे लग्न होईल, हिचा त्रास नको. उरका एकदाचे. ''

राजघराण्यातली तू हिम्मत करुन म्हणालीस, ''माझा काय त्रास आहे? मी घरची कामे करते. नोकरांचाही खर्च नाही. बिले मी भरते. बॅंकेचे व्यवहार करते. मला शहरात शिक्षणाला ठेवा व दुसरे एखादे स्थळ बघा. मला या महालात पडू देत. मी कधीही राजघराण्याचा अभिमान दाखवला नाही. ''

‘‘गप्प बस, गर्व झाला का?’’ भाऊ ओरडला. त्या राजघराण्याचा अभिमानेने सेकंडहॅण्ड मुलाशी तुझे लग्न झाले. बहर ओसरलेले ओसाड झालेले, मोहोर गळून गेलेला ते बंजर, घर. खंडहर सारखी शेती, साबरीच्या झाडांनी शेताचे बांध बांधलेले असल्याने काटेरी वाटणारी ती जमीन तुझ्या नशिबी आली. नवरा कुरकुरा होता. छोटया छोटया गोष्टीत किस पाडणे, वाद घालणे, चिडणे पिरपिर करणे ह्यामुळे त्याच्या कपाळावरची आठी कधी गेलीच नाही. त्याच्या पहिल्या पत्नीच्या मृत्यूबददल माहिती असूनही आपण उगीच दिली, असे मला वाटू लागले. हसल्यावर एकसारखे दिसणारे तुझे छोटे छोटे महिरपीचे दात मला नंतर दिसलेच नाही.

भावाच्या लग्नात तू आलीस तेव्हा तू त्या संसाराला विटलेली दिसलीस. तुझे गाऱ्हाणे मी तुझ्या वडिलांच्या कानी घातले व चार मध्यस्थ घेऊन बोलणी करावी असे सुचविले. तेव्हा ते चतुर राजकारण्याप्रमाणे गप्प बसले. दोन्ही घरांतील तुझे स्थान तुला समजले तरीही तू परत जायची हिम्मत केली नाहीस. त्यावरुन व तुझ्या न हसणाऱ्या उदास डोळयावरुन तुझी जखम मला कळत होती. गावात प्रत्येक घरटी मुलींचा प्रश्न होता. पण तुझा प्रश्न त्या छोटया डबक्या एवढया लहान गावाने फारच चघळला. तुला जीव नकोसा केले. भावाचे नवीन लग्न झाले होते. आम्ही त्याच्या लग्नात सढळ हाताने खर्च केला. गाडी करुन नवरा-नवरीला देवीला नेले. तुला मात्र घरी राखणदार म्हणून घरी ठेवले. तुझ्या लग्नाच्याच वेळी आमच्याकडे पैसा नव्हता. कारण तू मुलगी तू मानिनी होतीस. पण समाज तुला सन्मानाने जगू देत नव्हता. साधी राहिलीस की, तुला ओंगळवाणी म्हटले जाई व नीट राहिलीस तर तुझे साजिरे रुप त्यांच्या नजरेत खुपे. मनाने विस्कटलेल्या संसारात तू तडजोडी पलीकडे गेली होतीस.

मी माझ्या सुनेला कधी त्रास दिला नाही. माझ्या मुलीला मात्र सासरी त्रास व्हावा? एका सकाळी तू हताश पडलेली होतीस. मी विचारले, ‘‘उठायचे नाही का?’’ तुझ्या भावाच्या व वहिनीच्या खोलीचा दरवाजा बंद होता व मागील दारी जायला रस्ता त्याच खोलीतून होता. बंद होता. तुझ्या भावाने तुझे अक्षयबरोबर लग्न होवू दिले नाही आणि तो मात्र मजेत होता. तरी तुला हिडीसफिडीस करुन तुझ्यामुळे एकांत मिळत नाही, असे सांगून ते दोघे शहराच्या गावी,

बाहेरगावी मधुचंद्रासाठी वारंवार जाऊ लागले. ते न कळवता अनेक दिवस राहत असत. त्याचाही राग तुझ्या वडिलांनी सोन्याभाऊराजेनी तुझ्यावरच काढला.

''घरात ही सासरी न जाणारी, टाकलेली मुलगी हिची नजर त्यांच्या संसारात पडू नये म्हणून तो तिकडे राहतो. '' तू खालमानेने देवळात निघून गेलीस. न पावणाऱ्या देवाच्या देवळांची कमी नसते. पावणारे देव कुठे आहे का हो? देवळातून येताना तुला एक स्त्रीमुक्ती संघटनेवाल्या बाई भेटल्या. त्या कधीमधी घरी येवू लागल्या. 'मुलगी वाचवा हो! ' ह्या त्यांच्या संस्थेत तू काम करावे असे त्यांनी सुचविले. पण घरी भाऊ व वडील तुफान करुन लागले. तुलाही त्या सर्वांतील फोलपणा बोचू लागला. तू नोकरीसाठी प्रयत्न चालू केले. स्वामिनी मंडळाची सदस्य झालीस. पण नोकरी मिळणे तरी सोपे असते का? वाईट बोलणाऱ्यांचे तोंड थोडीच धरता येते. भावाच्या बायकोचे ओटीभरण होते. तशी तू अस्पर्शित होतीस. पण तुला मुले नाही म्हणून आम्ही तुला कुमारीकेऐवजी वांझोटीचाच अपमान दिला. काळ बदलला म्हणतो. पण मी आई असूनही, स्त्री असूनही तुला जाणले नाही. तुला मदत केली नाही. पारंपरिक बेडयांनी आम्ही एकमेकींना का दु:खावतो? स्त्री हीच स्त्रीची शत्रू का? ती काळोखी विळखा घालणारी उदासी, रात्रीची वाट पाहात जाळणारा दिवस गुरासारखे कष्ट कण्यास तू घालवत होती व रात्री रडत होतीस. एक दिवस तुझाा तो नवरा तुला घ्यायला आला. तुला जायची इच्छा नव्हती. मला पाठवायची नव्हती. भावाला तू नजरेसमोर नकोशी होतीस. वडिलांना तू मोलकरीण म्हणून हवी होतीस. नव्या सुनेला तू घालून पाडून बोलायला एक व्यक्ती म्हणून हवी होतीस. तशा तुम्ही दोघी मैत्रिणी होऊ शकत होता. पण नणंद-भावजयीचे अवघडलेले नाते तुमच्यात निर्माण झाले. तुझ्या सौदर्यामुळे ती तुझा हेवा करु लागली. पुरुष जातीची अनेक गिधाडे तुझ्या भोवती गिरटया घालू लागली. नवरा घ्यायला आला होता. पण दुसऱ्या बाजूला...

'नवऱ्याने सोडलेली बाई आहे,' आपल्याला संधी मिळेल म्हणून तुझ्या अवतीभवती जाळे टाकणाऱ्यांपासून तुझे रक्षण करायची हिम्मत आमच्यात नव्हती. आम्हाला सोन्याभाऊराजेनाही पदरातील निखारा बाहेर फेकायचा होता. प्रश्न कसाही करुन सोडवायचा होता. तुझा नवरा

बोलत असतानाच नव्या सुनेने तुझी बॅग धपकन आपटून बाहेर आणून ठेवली. तू खालच्या मानेने नवऱ्या बरोबर बाहेर पडलीस.

तुझ्या नजरेत दु:ख होते. राग होता. अपमान होता. माहेर म्हणजे वेदना!

माहेर म्हणजे खोटे वचन कि वंचना!

माहेर म्हणजे अडवणूक की फसवणूक?

माहेर म्हणजे कटी पतंग.

धागा तुटल्यावर भरकटू देणारे घर? माहेर म्हणजे बंद रिकामा लिफाफा. तरी मी तुझेच माहेर चे गीत गाते आहे. जाताना तू म्हणालीस. ''आई तू माझी आई नाहीस. तू भावाची आई. '' आणि तू मागे वळून न पाहता त्या बैलगाडीत बसलीस.

एखादा महिना गेला. तू रमली असावीस म्हणून मी दुर्लक्ष केले. घटस्थापना आली. त्या रात्री मला विचित्र स्वप्न पडले. ''कुत्रा येऊन घर मोडून, देव्हारा पाडून घरावरचे कोवळे धान्य खाऊन गेला. '' मी ओरडत जागी झाले. पण मी तुला बघायला आले नाही. वाटले तू माझ्या बरोबर माहेरी आलीस तर पुन्हा प्रश्न निर्माण होईल. एक दिवस समोरच्या कॉलनीत सांगावा आला. तुला अपघात झाला आहे. भाऊ बाप व मी गाडीतून तुझ्या घरी आलो. पण आम्ही पोहोचायला फार उशीर केला होता. तुझा पूर्वीच मृत्यू झाला होता. तुझ्या भावाने, वडिलांनी खांदा दिला. खरे खांदेकरी तेच होते. तेच तर तुझ्या मृत्यूचे कारण होते.

तुझ्या अंत्ययात्रेला बरीच गर्दी जमली.

ज्यांनी खांदा दिला ते तुझे खुनीच होते. कुठलीही चिठठी, कुठलाही संदेश न ठवेता तू गेलीस. तू सांगितले नाहीस असे नाही. आम्ही दुर्लक्ष केले. आम्हाला कळले नाही असे नाही. आम्ही ते कळून न कळल्यासारखे दाखवले. आम्ही जाणूनबुजून टाळले. आम्ही मुलगी वाचवायला हवी होती. पण आम्ही त्या लायकीचेच नव्हतो. हुंडाबळीला माहेरसुध्दा सासरइतकेच जबाबदार असतात. आज तुझे नाव वर्तमानत्रात छापून आले. पण पान सहावर चार ओळीची बातमी आली. 'अपघातात राजघराण्यातली विवाहितेचा मृत्यू', आम्ही तुला घराचे नाव रोशन

करण्याची संधीच दिली नाही. आम्हीच तर तुला मोलकरीण बनवले आणि सासरच्यांनाही तुझे नकोसेपण दाखवले. तुझ्या मृत्यूला सासरएवढेच आम्ही माहेरचे लोकही जबाबदार आहोत. सर्वच खुनी सापडतात असे नाही. सर्वच खून उघडकीला येतातच असेही नाही. जगात अपघात होतच असतात. अविधवा नवमीला श्राध्द घातले की नातेवाईकांचे आमचे कर्तव्य संपते. लाडकी लेक एवढीच लाडकी का? पंचवीस वर्षापूर्वी जी मुलगी आम्हाला गर्भात मारायची होती ती आम्ही तेव्हा जगवली व आज आमच्या चुकीच्या धोरणांनी मारली. आमच्या ॲपॅथीने मारली. आम्ही गाडीतून परत आलो. विहिरीवर अंघोळ केली. मला दरवाजाशी हाक मारण्याचा भास झाला. मी धावत दाराशी आले. वाटले - एक वाईट स्वप्न होते. ते संपले. सुनंदा परत आली आहे. पण तो भासच होता. तुझे वडील वहिनी व भाऊ जिलबी खात होते. त्याच्या हसण्याखिदळण्यातसुध्दा काहीही दु:ख नव्हते. तू माझ्या आतडयांचा तुकडा होतीस. त्याची कुणीही नव्हतीस. उदया मीही मेले तरीही हे जग असेच चालू राहील. महालातील वाळूच्या घडयाळाजवळ मी बसले.

जगातील कुठल्या आईवडिलांना आपल्या मुलीचा असा मृत्यू झालेला बघायला आवडेल? पण तुझे वडील म्हणाले.

''बरे झाले हे घ्या ते घ्या, तिचे रक्षण करा हे टुमणे संपले. '' मला वाटले बरे झाले. ''तू ही सुटलीस, मीही सुटले. '' आपल्या आवडत्या व्यक्तीचे दु:ख पाहून आपल्यालाही वेदना होतातच की! अर्थात ही खोटी पळवाट भेकडपणा होता.

माय म्हणते लेकीला, लाडकी माझी पोर
मर एकदाची मर ॥ तुझ्या ह्या संसाराचा माझ्या जीवाला घोर ॥ २

मन रमेना. मी सतीच्या समाधीजवळ बसे. माझे मन संसाराला विटले. मी वेगवेगळया देवळांमध्ये फिरु लागले. वेगवेगळया संस्थांत उगीचच जाऊ लागले. हो – तेवढया कारणाने मला राजमहालाबाहेर घराबाहेर राहता येते. ते घर माझ्या मुलीला काही काळ पण आधार देवू शकले नाही. त्यात मी कशी राहू? माझ्या मुलीच्या मृत्यूला मीही जबाबदार आहेच की! माझी अपराधी भावना मला खाते. आजूबाजूची घरे व नातेवाईक, त्यांच्या मुली व ती त्यांच्या घरची त्यांची

प्रातिनिधीक मुलगी, तिच्या घरीही तेच प्रश्न उभे होते, आहेत, होणार आहेत. तरीही त्यांनी त्यावेळी सुनंदावर घाव घातला. वेळीच कुणीच डोळे उघडले नाही आणि वेळ निघून गेल्यावर चुटपुटून उपयोग नसतो. गेलेली वेळ व गेलेली व्यक्ती परत येत नाहीत. स्त्रियांनी चालवललेल्या ह्या संस्थेतही बोचरे शब्द झोंबणारे असतात. काहीजणी मुददामच ''काय झाले?'' पुन्हा पुन्हा विचारत होत्या. मी अपराधी भावनेने कानकोंडी होत असे. पण पुढे पुढे अभिराज त्या संस्थेत येऊ लागला. त्याने मला उत्तर सुचविले. ''त्या विषयावर मी बोलणार नाही. दुसरे काही बोला. '' घटस्फोट, विवाह विसंवाद समुपदेशन, समेट, मुलींना मदत अशा प्रकारे आम्ही संस्थेचे कार्य सुरुच ठेवले. दु:खी स्त्रियांना अधिक दु:खी करण्यात विकृत आनंद माननारे असतातच की! मुलगी वाचवायची कशी? आम्ही कार्य सुरुच ठेवले. दुर्लक्ष करायला शिकलो.

आर्थिक पाठबळाशिवाय समाजकार्य अपूर्ण ठरते. आम्ही कार्यालय पाळणा दवाखाना सुरु केला. आपले मातब्बर घराणे व सेवाभावी वृत्तीच्या कार्यकर्त्या आहेत. खेडोपाडी स्त्री प्रश्नांबद्दलची जागरुकता पसरवण्याबद्दल शासनातर्फे मिळणाऱ्या पारितोषिकेसाठी माझे नाव सुचवले गेले आहे. मला ते बक्षीस मिळाले, तर मी तुझ्या नावाने विदयार्थ्यांसाठी अभ्सासिका व वाचनालय बनवणारे आहे.

लाडकी लेक म्हणणे सोपे असते. पण आपल्याच माणसांशी झुंजून आपल्या माहेरी परत आलेल्या लेकीलाही आधार देणे सोपे नसते. आज मी तुझेच वेदनेचे गीत गात आहे. तुझ्या वडिलांचे ठीक आहे. पुरुषांचा वाटा मुलांच्या जडणघडणीत बिंदूचाच असतो. मीच सागर होऊन तुला पायावर उभे करायला हवे होते. भावांचे ठीक होते. त्यांची बौध्दिक कुवत तेवढीच होती. परतून आलेली मुलगी, घटस्फोटीता, प्रौढ कुमारिका निराधार विधवा ह्यांना त्यांच्या संघर्षमय जीवनात आपण मदत करायला हवी. त्यांच्याबददल अभिमान बाळगायला हवा 'ती' वेळ कुणावरही येऊ शकते. चंगळवाद बोकाळलेल्या ह्या जगात जगणे मुश्कील आहे. लाडक्या लेकींना खंबीर बनवण्यात ही संस्था मदत करते. खरे तर त्या गूढ रम्य राजमहालातील अवाढव्य

अक्राळविक्राळ खंडहरातील एखादी गुंफासुध्दा माझ्या संस्थेला राजेपाटलांनी  दिली असती तर चाललं असतं. पण माझ्या पतीची ती इच्छा नव्हती.

तू गेलीस माझे डोळे उघडले. तुझ्यामुळे मी हे शिकले. ज्या  तुला ज्या तुझ्यामुळे मी हे पत्र लिहिते आहे की, तू मात्र खूपच दूर निघून गेली आहेस. माझा आवाजसुध्दा तुझ्यापर्यंत पोहोचणार नाही. थांब ही छोटी सुनंदा माझा पदर ओढते आहे. गंगूबाईंनी कुण्या फसलेल्या मुलीने कचराकुंडीत टाकलेली मुलगी उचलून आणली होती. औषधोपचाराने वाचवले. मी त्या मुलीचे नाव सुनंदा ठेवले आहे. पायात चाळ घालून घरभर फिरते. जशी तू फिरायचीस. अजून तिच्या पायात बेडया पडल्या नाहीत ना! थांब सुनंदा, मलाही मृत्यू बोलवतो आहे. मला छोटया सुनंदाला पोलिओ डोस देण्यासाठी घेऊन जायला सांगितले आहे. शिवाय दसरा आहे. तुझे श्राध्द म्हणून मोफत नेत्रबिंदू शस्त्रक्रियेचे शिबीर आहे. तुझा बळी व्यर्थ गेला नाही. ह्या संस्थेच्या रुपाने तू कायम जिवंत राहशील. अजून एक...

राज्याचा तो मुलगी वाचवण्याबददलच्या कार्याबददलचा कदाचित राजघराण्यातली आहे त्यामुळे तो पुरस्कार मला मिळाला. मी ह्या लायक आहे का ग? कुणीतरी माझी मुलगी वाचवायला हवी होती! लेकी लाडक्या आहेत. लाडक्याच राहू द्या हो!

मी सुनंदाची आई... मी... तुझी आई की तुझ्या भावाची आई.

कैलासवासी मुलीची आई  संस्थापक - मुलगी वाचवा संस्था.

..............

सार्तेनी पत्र घडी करुन पेटीत ठेवले. राजे पुढे सांगू लागले. कचराकुंडीतील फेकलेल्या मुली उचलून त्यांना वेगळे जीवन देणारी माझी आई कुठे व सख्ख्या बहिणीला असे वागवणारी आम्ही कुपुत्र कुठे? आज ती संस्था वाच्छानीच्या कुणी नातेवाईक, कुणी पगारी नोकर चालवतो. समाजकार्य करणे माझी नियत नव्हती. मी राजघराण्यातला मला कचराकुंडीतील जीव जगवायचे नव्हते. आईसाहेब कचरा वेचणाऱ्या स्त्रियांची बाळंतपणे करीत असे. मला मात्र वाटते, कशाला हवी किडा मुंगीसारखी ही प्रजा? मला फक्त स्वत:ला जगायचे होते. कुंडयांना गेरु लावायचे एक

मोठे भांडे होते. आशाराजे वाईट प्रसंगी त्या भांडयात मुटकुळ करुन झोपायच्या. पण मी त्यांना तेवढी जागा दयायलाही नाही म्हणालो. सुनंदाचा मृत्यू पाहिल्यामुळे आशाराजेंना परत आणावे असे आई साहेबांनी सांगितले.

पुढे लिहिताना लेखक साठेंनी चष्मा पुसला डोळे टिपले.

आई वारली अक्षय कोण हे कळलेच नाही. साठे तुम्हाला काय वाटते? वाच्छानी व अक्षय एकच असतील का? त्यावेळची आईची मित्रमंडळी व आईचे त्यावेळचे समाजकार्य सुनंदाच्या मृत्यूचे दु:ख मला कळलेच नाही. आईसाहेब जिवंत होत्या तोपर्यंत मी परराज्यात महिनपूरला शिक्षणाला राहिलो. आईसाहेबांनी रजनीराजेंना सासुरवास केलाच नसता. पण मला भांडणाची रिस्क नको होती. व स्वातंत्रयसुध्दा हवे होते. आई वारताच आम्ही त्या राजमहालात हक्क गाजवायला आलो. जवळ राहून भांडून वेगळे होण्यापेक्षा व नंतर इस्टेटीचा हक्क सोडण्यापेक्षा हे परराज्यात राहणे सोपे! सीतारामराजे लबाड आहेत. हावरे होते. ते राजमहल हडपतील म्हणून घाईत मी व मुलगा व रजनीराजे आनंदगावच्या राजमहालात परतलो. आई वारली होती. सोन्याभाऊसाहेब जिवंत होते व ही परत आलेली आशाताई त्यांची सर्व सेवा करायची. आशाराजेंला आम्ही आईच्या सांगण्यावरुन सासरहून परत आणले. ते नोकर म्हणूनच आणले.

आशाराजे सुनंदासारखी सासरी मरु नये असे आईला वाटत होते. आईने तिला कॉलेजमध्ये घातले व शिक्षण पूर्ण करुन नोकरी करावी असे सुचवले. आमच्यावर आईचा विश्वास नसावा. मी व मोठा सीताराम लबाड होतो. आम्हाला सोन्याभाऊराजेंची वृध्दावस्थेत म्हातारपणाची सेवा करण्यात घाण वाटायची. नोकरसुध्दा कुरुबूर करीत. वृध्दापकाळामुळे सोन्याभाऊ चिडके झाले होते. त्यामुळे आम्ही खूप उपकार केल्यासारखे दाखवून आशाताईंना ठेवून घेतले. आशाराजेंना माहेरी आणल्यावर आईसाहेबांनी त्यांना माहेरहून मिळालेला धूळवडगडीचा महाल तिच्या नावांवर केला. गोड बोलून सुचवले. भांडून सुचवले. दोनतीन महिन्यातच त्या वारल्या.

दोन्हीकडे गोड बोलून दोन्ही बाजूंना प्रेम दाखवत व सांभाळून वागल्यासारखे मायावी भाष्य करणारा माझा मोठा बंधू सीतारामभाऊ नागाप्रमाणे मला कधीही दंश करु शकतो हे मला माझ्या पत्नीने पूर्वीच पटवले होते. बहिणीशी दुष्ट वागणारा मी पत्नीपुढे पूर्ण नांगी टाकली होती. आशाताई खूप भोळी होती. तिचे सर्व भाव विश्व व खरे विश्व हा महाल दोन्ही भाऊ व सोन्याभाऊराजे हेच होते. खरंतर कुणी कुणावर असे वाहून टाकावे इतके प्रेम करु नये. नंतर त्याचा त्रास होतो. जीवनाच्या फोटो फ्रेममध्ये एक दोनच व्यक्ती नको. बॅकग्राऊंडही हवीच. अपार प्रेम करु नये. नाहीतर 'त्या' व्यक्तीवर आपण सुख अवलंबून ठेवले व परावलंबीत्वाच्या कल्पनेने फसतो, दु:खी होतो.

आशाराजेअशीच फसली. गढीमाळावर परिसरात महालातील बॅडमिंटन कोर्टमध्ये खेळायला येणाऱ्या मुली बघून मला आशाराजे आठवतात. आशाताई त्यांच्या लग्नाआधी त्या इथे खेळत, पण त्यांचा घटस्फोट झाला, या एका कारणाने आम्ही त्यांना नोकरच बनवले. घटस्फोटीत ही इतकी मोठी शिक्षा असावी. जगावे व जगू दयावे, असे मी भाषणात सांगतो. पण आशाराजेंचे लाडके गाणे होते -

सुन्या सुन्या मैफलीत माझ्या, तसेच गीत मी गात आहे.

त्याच दरम्यान मुलींनाही इस्टेटीत वाटा द्यावा म्हणून कायदा आला. त्यामुळे मी घाबरलो. घाईघाईने खरेतर आधी चौकशी न करता मीच तिचे या अर्धवट वेडयाशी लग्न लावून दिले होते. तिच्यासाठी चांगले स्थळ आले की, मी भेटायला जाई व खोटे नाटे सांगून तिचे किंवा नियोजित वराचे मन कलंकित करी. सुनंदाच्या मृत्यूला सीताराम कारणीभूत होता. हिच्या सामाजिक मृत्यूला मीच कारण आहे. चांगले स्थळ आले की, मी सांगे, ते लोक हुंडा मागतात, ते लोक त्यांची काळी मुलगी माझ्या गळयात मारतील. तू ह्या स्थळाला नाही म्हण, असे सांगून मी च तिला नकार द्यायला लावले. मी तिला डॉमिनेट करीत असे. खानदानाच्या नावाखाली विचित्र घरी लग्न लावून इथून हाकलले व तेव्हा माझा स्वार्थ तिला कळलाच नाही. नाइलाजाने माहेरी परत आली. तसा विचार केला तर नंतर मी तिला टाळणे हे तर प्रॉपर्टीसाठीच केले व आताही

तिला आत्मचरित्रासाठी आठवतोय. चिकटतोय ते पैशासाठीच. एका बारशाच्या त्या कार्याला बरीच मंडळी जमली होती. सीतारामराजेंना मुलगा झाला होता. मी शेरे मारले. बरे झाले. मुलगा झाला. बारशाला मोठ-मोठी मंडळी जमली होती. राजेपाटलांनी खूप पोरी होऊ दिल्या. 'आपल्याला २ मुलगे बरे झाले. ' मी अभिमानाने म्हणालो, खरे तर हे बोलून मी आई-वडिलांचा जन्मदात्यांचा अपमान करीत होतो. आशाराजेंनी व मोठया बहिणीने वसुधाने नेत्रपल्लवी केली.

मला वाटले की ती काहीतरी कुजकी बोलेल. सीताराम टपूनच बसला होता. आताही भांडण करेल. मग आपण दोघे तिचा अपमान करु. हिणवू. ती गप्प बसली, पण तिचा स्पर्श, तिची नजर परकी, आवाज प्रेतासारखा, थंड लागला. तिचे नालायकाशी लग्न लावून मीच तर तिला काही वर्षापूर्वी मारले – आता ती कशी हाल भोगत जगते मला कुठे माहीत आहे व जाणून मला तरी काय करायचे आहे. तिने त्या कार्यक्रमात गाणे म्हटले.

सुन्या सुन्या मैफलीत माझ्या मी तुझेच गीत गाते.

१९ वर्षाच्या बहिणीला संसाराबाहेर काढून भाऊ व मी निर्लज्यपणे दारु पिऊन बरबट खाऊन, स्वत:ला ग्रेट समजत राहिलो. आता तर तुम्हीच सांगा, ती चूक मी आता सुधारु शकतो का? तिचे नशीब! आशाराजे तिचे ती बघेल ही वृत्ती मी सर्वच बहिणींच्याबाबत वापरली. तिच्या प्रश्नांशी मला काय?... थोडी भांडणे लावणे, गॉसिप करणे, सीताराम व दादा व मी कसे श्रेष्ठ हे तिच्यावर बिंबवणे, फसवी छाप मारणे व जमल्यास पैसे हडपणे हाच हेतू आहे व होता. किती लुबाडायचे ते बघू. पुढच्या वेळी जर चांगुलपणा सुचला तर हया पुस्तकाचे काही टक्के कमिशन देईन!

साठेंनी कॉलेजचे जुने मॅगझिन काढले. त्यात आशाराजेंनी कॉलेजात एक लेख लिहिला होता. ह्या लेखातून त्यांच्या अबोल भावनाच व्यक्त झाल्या होत्या. साठेंनी तो मोठयाने वाचला.

## ३ रानफुलाचा राजपुत्र

तशी ही नेहमीचीच गोष्ट आहे. कदाचित ऐकण्यातील किंवा बघण्यातील, नात्यातल्या कुणाची तरीही असू शकते. म्हणजे बघा. राजा-राणीच्या गोष्टी आपण नेहमीच एकतो. राजा राक्षसाशी लढून राजकन्येचा हात हातात घेतो व सर्वत्र अगदी आनंदीआनंद होतो. अगदी एखादयावेळी राजपुत्र. राजकन्या काही काळ एकत्र सुखात राहतात आणि पुढे वेगळया वाटेने जातात तेव्हाही आपल्या मनात एक उदासी दाटून राहतो. आपण डोळे पुसत म्हणतो.

‘भातुकलीच्या खेळामधली राजा आणिक राणी

अर्ध्यावरती डाव मोडला. अधुरी एक कहानी’

पण मी आता तुम्हाला अशा कोणत्याही राजा-राणीची गोष्टी सांगणार नाही. ही गोष्ट नेहमीचीच आहे, पण सांगितल्या जाणाऱ्या गोष्टींपेक्षा निराळी आहे.

एक आटपाट नगर होते. त्यात एक देखणा राजपुत्र राहात होता. त्याच्या डोळयात रत्नदीपाचे तेज होते. ओठात माणकाचे किरण होते. कमरेत म्यान केलेली तलवार होती. अबलख पांढया वारवरुन तो टगबगटगबग घोडा दौडत जात असे. अनेक जंगले, उद्याने, गावे, शहर राजवाडे फिरत असे व अशा प्रवासांत तो अनेक उपवर तरुणींच्या स्वप्नांतही जात असे. जंगलातील, रस्त्याच्या कडेला उमललेल्या रानफुलांनाही तो स्वप्नांचे पंख देत असे. स्वप्ने दाख्वणे हे राजपुत्राचे काम असते. तर पूर्णपणे समर्पित होण्यासाठी उमलणे हे रानफुलाचे काम असते. रानफुलांना घायाळ करीत राजपुत्र बेधुंद बगळा होता. राजाच्या पोटी आल्याने तो राजपुत्र होतो. पण तो राजस असतो का? अगदी नेहमीच्या कथेप्रमाणेच आटपाट नगरीतील राजकन्येला राजपुत्र आवडला व चित्रपटाप्रमाणे राजकन्येच्या आईवडिलांनी राजपुत्रासाठी थाळीत दागिने मांडून शगुन आणला. राजपुत्र व राजकन्येचे लग्न झाले. थाटामाटात त्या लग्नाचा जलसा खूपच गाजला.

रानफुलाशी राजपुत्राने लग्न करावे हे शक्यच नव्हते. राजघराण्याच्या रीतिरिवाजात ते बसतच नसते. ''मग रानफुलाचा बळी राजपुत्र का घेतो? दुनियाके दिवारे तोडकर येणारे हीरो फक्त चित्रपटातच असतात का? प्रत्यक्षात मात्र इमोशनल अत्याचार. ''

गरीब घरची मुलगी राजपुत्रांना करायची नसते. लग्न करताना त्याला तुल्यबळ घरातील, भरपूर हुंडा देणारी, सोन्याने मढून येणारी व थाटात लग्न करुन देणाऱ्या शंभर नंबरी घरातलीच मुलगी हवी असते. मग रानफुलाना तो का दु:खावतो? खरेतर स्त्री पुरुष समानतेच्या काळात हे चूक नाही का? राजाचा मुकुट खरा का खोटा हे कोठे कळते? मुकुट खरा असला तरी प्रेम खरे कोठे असते?

कुठलेही रानफूल कधी बंड करत नाही आणि दुबळया जिवाचे बंड असे कितपत टिकाव धरणार. शिवाय हुंडाबंदी ही कागदावरच असते. हुंडयासाठी लग्न मोडले असा हाकारा आल्यास रानफूल अधिकच उध्वस्त होउ शकते. रानफुलांचा बळी जातच असतो व गोष्टी मागची गोष्ट कुणाला कळतच नाही.

राजा व राणी सुखाने नांदत असतात, पण बळी गलेली रानफुले मूकपणे अश्रू ढाळतात. पहाटेच्या वेळी रानफुलांवर साचलेले दवबिंदू हे रानफुलाच्या अतृप्त स्वप्नाचे रुप असते. राजकुमाराच्या हुंडा घेऊन लग्न करण्याचा आपण निषेध तरी करायला हवा. हुंडाबंदीचे नियम अधिक कडक होऊन त्यावर अंमलबजावणी व्हायला हवी. पाळलेले धूर्त पोपटासारखे राजकुमार पळत रानफुलांकडे का येत नाहीत? राजपुत्र रानफुलाचा का नाही?

रानफुलाचे अश्रू कधी संपणार? हुंडाबंदी खऱ्या अर्थाने कधी होणार? कधी होणार?

साठे म्हणाले, ''ताईंचे लिखाण खूपच छान व गहिरे होते. तिला कोणी फसवले होते का?''

राजे पुढे सांगू लागले. त्यावेळी आशाराजेच्या लिखाणावर टीका होई, पण त्यांनी स्ट्रगलरचा ब्लॉग ओपन केला. तिच्यावर मराठी भाषासुध्दा जमत नाही अशी टीका होती. त्यांनी त्या अपयशाचे ही आवश्यक म्हणून स्वागत केले. स्पीड कमी केला. एक लोकगीत आहे.

आगीन गाडीला कुलूप टोपीवाल्याचा मुलूख,

सरदारसाहेब दारात राणीसाहेब घरात

कायबाई तारीफ, त्यांच्या लवंगा फार बारीक

लोककलेवरील टिप्पण त्यांनी लिहिले. अपार वेदना खूप भावना अनावर झाल्या की आंबा पिकतो रस गळतो तशा त्या लिहू लागल्या. त्यांचे लिखाण भारी होते. ओतू जाणाऱ्या दुधावरची घट्ट साय असावी तसे त्यांचे लिखाण स्निग्ध होते. थांबू नये असेच लिहू लागल्या. पण त्यांच्या लिखाणात कुठेतरी अबोल प्रेम अव्यक्त नाते, वंचना व कोपऱ्यात उभे राहून खुणावणारा मृत्यू दिसत असे. वाळूच्या घडयाळाजवळ उभारलेल्या एक गुप्त खलबत करण्याची खोली होती. तिच्यात गोल जेवण्याच्या टेबलाभोवती वेगळीच गोलमेज परिषद भरवली. त्यात ताईने लिखाण करु नये असे आम्ही ठरवले.

आशाताईच्या पहिल्याच पुस्तकाच्या वेळी आम्ही तिच्यावर खूप टीका केली.

''सासरी नांदली नाही आणि घराण्याचे नाव खराब करते. '' रजनीराजे म्हणाली.

''छतावर उभे राहून कावळयासारखी कावकाव करुन खाजगी गोष्टी बाहेर सांगते'' सितारामराजे म्हणाले.

''मला लिहावेसे वाटते. मला लिहायचे आहे. मला काही सांगायचे आहे'' आशाराजे म्हणाल्या.

''वर्षानुवर्षे समाजात मुलीचे स्थान हेच आहे. स्त्री मुक्तीची चर्चा न करणे आणि शोषण, अत्याचार या विषयावर आवाज न उठवण्यातच स्त्रीचे मोठेपण असते. '' मी म्हणालो. सर्वांचे आवाज चढले होते.

''बेशरम तुला लाज नाही वाटत घरच्या गोष्टी लिहायला?'' सीतारामराजे.

''येते मला लाज येते. मला लाज वाटते कि मी स्त्री आहे. या राजघराण्यातील उपेक्षित दुर्लक्षित आहे. मी या घराची मुलगी आहे. मला लाज वाटते की या समाजाने माझ्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केले. मला लाज वाटते की अशा भावांची बहीण आहे. मला लाज वाटते कि मी अशा गावात

राहते, जिथल्या लोकांची अस्मिता मृत झाली आहे. हे लोक उठाव करायला विसरले आहेत. मुलींचे प्रश्न सोडवण्याऐवजी ते स्त्रीभृण हत्या करीत आहेत. '' सीतारामराजेने पेटत्या समईवर तिचा हात धरला व बोटे जाळली व म्हणाले, ''लिहिशील?'' आशाराजे म्हणाल्या,''हो मला लिहायचे आहें मला सोन्या भाऊनी लिहायला परवानगी दिली आहे. ''

रजनीराजेंनी फ्लॉवरपॉट आशाराजेंच्या अंगावर फेकला. बारक्याबुखया आशाराजे खाली कोसळल्या. कोलाहल व आवाजामुळे महालातील बिछान्यावरुन सोन्याभाऊ राजे लटपटत्या पायांनी उठून आले व म्हणाले, ''तिच्या अंगावर हात उचलाल तर मी वर्तमानपत्रात जाहिरात देईन. माझी दोन्ही मुले, मुलगे वेडी झाली आहेत व या महालाशी व इस्टेटीशी त्यांचा संबंध नाही. ह्या इस्टेटीत तिचाही हक्क आहे. तिला लिखाणाचे, इथे राहण्याचे हक्क व स्वातं«य आईने दिले आहे व मी देत आहे. '' आम्ही सर्व भाऊ, सर्वजण गप्प झालो.

रजनीराजेंनी लाडेलाडे सोन्याभाऊंसमोर हात जोडायचे नाटक केले व म्हणाल्या ''अहो तिच्या हितासाठीच चालले आहे हे. ''

सोन्याभाऊ म्हणाले, ''खाऊन बोक्यासारखे फुगलेल्या तुम्हाला तिच्यासारख्या नाजुक मुलीच्या अंगावर हात उचलायला शरम वाटली नाही?'' रजनीराजे सोन्याभाऊजींच्या जवळ गेल्या व त्यांचा हात हाता घेऊन लाडी गोडी लावू लागल्या. सोन्याभाऊंना त्यांचे अंगचटीला येणे आवडले नाही. त्यांनी तिचा हात झटकला असेही त्यांना उभे रहावत नव्हते. ते खाली पडले. आवाज ऐकून आलेल्या यशोदाच्या आईने व भीमाने त्यांना उचलून त्याच्या व्हिल चेअरमध्ये बसवले. मारहाण करून त्या बिघडलेल्या (?) मुलीला सुधरवण्यात आम्ही यशस्वी झालो. याभ्रमात आम्ही खुश झालो.

आशाराजे जळलेल्या बोटांकडे बघत बसल्या व नंतर त्या सतीच्या समाधीवर जाऊन बसल्या. ''सतीमाई तू एकदाच जळलीस. मी पदोपदी जळतेय. '' अशी मारहाणीची बातमी पसरु नये म्हणून आम्ही खबरदारी घेतली तरीही कुठून कळल कोण जाणे पण वाच्छानींने

कसचेतरी औषध आशाताईसाठी पाठवले पण आशाराजेंनी ते लावायला नकार दिला. सोन्याभाऊसाहेब आशाराजेंना म्हणाले.

''लिहित राहा. मी तुला काही दिले नाही. तुझी सोय केली नाही. तर मी अभागी ठरेन. धुळवड गडीचा किल्ला आईसाहेबांनी तुला दयायला सांगितला आहे. मी तुला काही हक्क मी देत आहे. '' सोन्याभाऊंनी मृत्युपत्र करण्यासाठी वकिलाला निरोप धाडला. ती रात्र विचित्र व आक्रिताची होती.

सोन्याभाऊंच्या महालात मी अपरात्री पोहोचलो तेव्हा वीज गेली होती. खोलीत वीज नसल्याने अंधार होता. अंधारात एकच समई जळत होती. कुणीतरी आल्याची चाहूल लागताच सोन्याभाऊ म्हणाला, ''कोण? अपरात्री दूध आणले? अशाराजेंची बोट भाजल्याने आज त्या येवू शकल्या नाहीत म्हणून तू आलास का आदित्य?आत मात्र ये. ''

मी उत्तरलो, ''आणतो मी. पण खूप अंधार आहे म्हणून मोठी समई लावतो. मोठया समईत भरपूर तेल ओतून मी जीना उतरुन खाली आलो व सतीच्या समाधीजवळ बसलो. वर सोन्याभाऊंच्या दालनात ज्वाळा पेटल्या होत्या. सोन्याभाऊ ओरडत होते. भीमा, आशाताई व इतर नोकरांनी ती आग विझवली. तोपर्यंत सोन्याभाऊंचे तोंड व हात भाजले होते. ''

झोपलेले असताना सोन्याभाऊंच्या बिछान्यात समई पडली व ते बरेच भाजले. ही बातमी पसरली. डॉक्टर काळे आले. त्या गावातील ते एकमेव डॉ. होते पोलिस केस होऊ नये म्हणून डॉक्टर काळेनी इस्पितळात न नेता घरीच उपचार केले. पैशाचे आमिष दाखवले व नंतर जिवाची भीती घालून बाहेर हाकलले काही वेळाने वकीलसाहेब आले होते. त्यांना मी सोन्याभाऊंच्या अस्वस्थ तब्येतीची कारणे सांगून परत पाठविले. जे समजायचे ते वकीलसाहेब समजले.

त्यादिवशी जर सोन्याभाऊंनी मृत्यूपत्र बदलून सर्व घरदार, शेतीची वाटणी समान मुला-मुलींमध्ये केली असती तर... साठे खरेच मी सोन्याभाऊंना मारायचा प्रयत्न केला नाही. पण मला महालावरचा हक्क सोडायचा नव्हता. वाटण्या झाल्या असत्या तर चार बहिणी व दोन भाऊ यांच्यात वाटणी होऊन एखादी खोली माझ्या वाटेला आली असती. सुईच्या अग्रावर मावेल

इतकीसुध्दा जमीन मला कुणाला दयायची नव्हती. बहिणींना चोळी बांगडीचा काही हक्क दयायचा नव्हता. वाटण्या होवू नयेत ही माझी इच्छा होती. पण मी सोन्याभाऊंना मारले.

आशाराजेंनी या महालात कलादालन बनवले असते. आम्हा पैशाच्या भुकेल्या भावांची बहिणींना दयायची इच्छा नव्हती. आशाताईच्या रुपाने बंडाचे निशान रोवले जाऊ नये म्हणून आम्ही आशाताईचा काटा काढायचे ठरवले.

रजनीराजे म्हणाल्या. ''स्त्री ला मारायला ४ इंची जीभ पुरेशी असते. त्यात ही अशी घटस्फोटीत आपण तिची बदनामी करु या व घराबाहेर काढू या! '' माझी बहीण वसुधा हिचे पती त्यादिवशी आले होते. त्यांना मी एक मोठा हिरा देऊन परत पाठवले. नाहीतर बहीणींनी एकत्र येवून वाटा मागितला असता. तो हिरा अपशकुनी होता व राजेज्योतिषांनी तो फेकून दया असे सांगितले होते. वसुधाच्या नवऱ्याला ते माहीत नव्हते. तो खुषीत तो हीरा घेऊन गेला. महालाबाहेर जाताना तो हिरा डोळे वटारुन पाहातो आहे असा भास मला झाला.

''वाच्छानीने त्याच्या विधवा भावजईला भावाच्या मृत्यूनंतर असेच बाहेर हाकलले होते. दोन गुंड उभे केले. ती घाबरली व निघून गेली. '' सितारामराजे म्हणाले,

''राजकारणात यायचा प्रयत्न जेव्हा वाच्छानीच्या विधवा भावजयीने केला तेव्हा वाच्छानीने तिची अधिकच बदनामी केली व मुलांच्याकडे बघून त्या अगतिक स्त्रीने माघार घेतली. '' रजनीराजे म्हणाल्या.

माझ्या पत्नीचा आदर्श स्वार्थी वाच्छानी होता त्यात नवल नव्हते. चुकणारा माणूस नेहमीच दुसरा किती नीच हेच सांगत राहतो. वाच्छानीने भावजयीला असे केले सांगून आम्ही बहिणीवर करीत असलेल्या अन्यायाची तीव्रता व दाहकता कमी करायचा प्रयत्न करीत होतो.

लेखक साठेने सुस्कारा सोडला व म्हणाला, ''पुढे आज सांगता की उद्या येऊ? बाकीच्या बहिणींचे काय झाले? वाळूच्या घडयाळाजवळ वसुधाराजेंची छत्री आहे. त्या कशा वारल्या? रक्तरंजित हिरा त्यांच्या घरी पाठवल्याने त्यांच्या घरी प्रश्न निर्माण झाले का?''

''हो! हिऱ्याचा शाप खरा झाला. वसुधाराजेंच्या सासरी भांडणे सुरु झाली, दुही माजली. त्यांच्या घरची भातुकलीतील राजाराणी वेगवेगळया दिशेने बघू लागली. '' हिऱ्याचा बळी वसुधाराजे ठरल्या याचा आनंदच आम्ही मानला. कारण तो हिरा आमच्या घरी राहिला असता तर आमच्या संसाराचा बळी गेला असता. आमचा डाव अर्ध्यावर मोडला असता. वसुधाराजेच्या मृत्यूबद्दल आदित्यराजे सांगू लागले.

## ४ वाळूचे घडयाळ

बालपणी लपंडावात लपताना वाळूचे घडयाळ ही आशाताईची लाडकी जागा होती. एक व्यक्ती म्हणून त्या दोघी मुली राजमहालातील अदखलपात्र होत्या. आशाताई व वसुधाताई यांची घट्ट मैत्री होतीच! दोघी बहिणी असल्या तरीही हेवेदावे नाही. चिडचीड झालीच तरी पुन्हा दिलजमाई होत असे. एकमेकींच्या दुर्गुणांकडे दुर्लक्ष करुन, शिवाय शक्यतो एकमेकींना धरुन असत व अंतर्मुख होऊन घडयाळासमोर बसून राहात. वसुधाताईलासुध्दा सासरी त्रास होता. तसे त्याकाळी बाकी सासरी फारसे न पटणे हा प्रकार अगदी सर्रास घडत असे. नवऱ्यावरचे प्रेम पक्के असले तर नवरा वेगळे घर करायला तयार होई व प्रश्न सुटत असे. पण बऱ्याचदा नवरा घ्यायला येईल व वेगळा राजाराणीचा ससार सुखी होईल ही कविकल्पना प्रत्यक्षात येतच नसे. आशाराजे घटस्फोटीत म्हणून परत आलीच होती. त्यावेळी वसुधाराजेंच्या ही सासरी धुसफूस सुरु होती. 'मोठे घर व पोकळ वासा. मुलींना लग्नात काही देत नाही. म्हणून वसधाताईची सासू कुरकूर करीत असे. ' राजघराण्यांचे तनखे बंद झाल्याने राजेशाही नावालाच राहीली होती.

भरपूर दागिने असले तरीही ते विकून सण करण्याची हिम्मत आम्हाला होत नव्हती. पण थोरल्या आईसाहेब एकदा सोन्याभाऊसाहेबांच्या स्वप्नात आल्या व म्हणाल्या, ''तिला गोदरेजचे कपाट व जावयाला अंगठी घेऊन द्या व सासरी पोहोचवा. '' सोन्याभाऊ तिला सासरी पोहोचवून आले. सोन्याभाऊनापण ती नको असावाी तिच्या घरी कुरकूर चालूच होती. सुख-दु:खाचा लपंडाव असतोच!

एक दिवस वसुधाताई अपरात्री एकटीच राजमहालाच्या दारात आली. कपडे अगदीच कसेतरी, चेहऱ्यावर मारहाणीच्या खुणा, गळयात काळा मणीसुध्दा नव्हता. दागिने म्हणायला आम्ही तिला फार काही दिलेच नव्हते. मोठे घराणे, खुप काही मिळेल या आशेने मध्यस्थाने त्यांना स्थळ पुरवले व फसवले. जावई भला माणूस होता. पण सासू खाष्ट होती. खर तर आम्ही नुसता दम दिला असता तर चार प्रतिष्ठित बसवून निवाडा केला असता. तर प्रश्न मिटू शकत होता. पण आम्ही आमच्यातच मशगूल होतो. निराधार स्त्रीने कुठल्याही वयांत कुठेच जाण्यांची

सोय का नसावी? आम्हा कर्तुत्ववान पुरुषांना कुणासाठी काही करायची इच्छाच नव्हती. ज्याचे त्याचे प्रश्न जे ते सोडवतील. मला काय? वसुधाराजे परत आली तेव्हा दरवाजावरच्या दरबानाने त्यांना ओळखलेच नाही. पण जुना नोकर होता. त्याने आत घेतले व सतीच्या समाधी जवळ बसवले. पाणी दिले, चहा दिला. एवढया श्रीमंत घरची मुलगी पण तिची त्या राजमहालातील एका कोपऱ्यात पडून राहण्याचीही सत्ता नव्हती.

करुणाष्टक नावाच्या एका कादंबरीमध्ये ८ भावंडांच्या ८ करुण कथा आहेत. जगी सर्व सुखी कोण होते? माझ्या सारखे एखादेच काही! चारचौघीं नाटकामध्ये चार मुलींच्या चार त-हा दाखवल्या आहेत. तसेच आमच्या घरीही चारही बहिणींचे सासरी प्रश्नच होते. माझ्या चारही बहिणी साध्या होत्या. त्यांना नटणे, मुरडणे, पुढे पुढे करणे जमत नसे. खरे तर त्यांना राजकारण करणे जमत नसे. फक्त भाबडे प्रेम करुन आयुष्यभर त्या अयशस्वीच झाल्या. मुरक्या मारणे त्यांना जमत नसे. आम्ही दोघे भाऊ  चतूर होतो. तेवढयास तेवढे वागणे व कुठेही न गुंतणे हे आमच्या सुखाचे रहस्य होते. आमच्या पत्न्या ठीक होत्या. आम्ही  रगेल व रंगेल  बायका तशाच होत्या. वसुधाताई परत आली. त्यांना मी नाइलाजानेच आशाताईच्याच सज्जात राहू दिले. खरेतर मी ह्या महालाचा मालक नव्हतो. पण मी मुलगा होतो व त्या मुली होत्या. ह्या एवढयाच फरकावर मी स्वत:ला ग्रेट वॉरियर प्रमाणे ग्रेट मानून त्यांना तूच्छ लेखत होतो. टेहळणी बुरूजांच्या एका बुरूजांवर दुर्बिण होती. वाऱ्यांनी फिरणारे एक कोंबडयाचे चित्र असलेले धातूचे दिशादर्शक यंत्र होते. चित्र  होती. पुढे टकमक टोक ही उंच डोंगराची जागा होती व बाजूला खोल दरी होती.

सोन्याभाऊराजेचे राजमहालातील सतीच्या समाधीचा चैत्र पौर्णिमेला उत्सव असे आमच्या कुटुंबातील कुणीतरी स्त्री सती गेली होती. तिची समाधी महालातील एका कोपऱ्यात होती. तिथे पूजा असे. या समाधीचे भांडवल करुन आम्ही बहिणींचा अपमान करत असू. दोघी जणी आईसाहेबांचे वाळूचे घडयाळाचे बाजूचे धातूचे कुंपण हाती धरुन काळ बदलेल या आशेने सहन करीत गप्प बसल्या होत्या. व्दाररक्षकांची एक संगमरवरी मूर्ती बाजूला होती. एका

शिलालेखावर काहीतरी लिहिले होते. पडक्या विहिरीतून वाळू काढताना सापडलेली गंगामातेची मूर्ती ही बाजूला ठेवली होती.

आमच्या महालातील वाळूचे घडयाळ ही एक खास ऐतिहासिक जागा होती. पूर्वी लांब झगा घातलेला दाढी वाढवलेला कुणी ग्रीक तत्ववेत्त्या सारखा दिसणारा माणूस म्हणजे त्याची सावली. या जागी वावरत असे अशी वदंता होती. ज्या दिवशी ह्या वाळूच्या घडयाळातील वाळू पडणे काहीक्षण थांबे तेव्हा राजमहालात मृत्यू होई, अशी वदंता होती. दोन काचेची त्रिकोणी ३ वार आकाराची भांडी टोकाकडून एकमेकांवर ठेवली होती व वाळू एका भांडयातून दुसऱ्या भांडयात भोकातून पडत असे. वाळूच्या वजनाने खालचे भांडे भरले की साखळीला धक्का बसून जड भांडे वर येई व वाळू खालच्या रिकाम्या भांडयात पडे. अविरत चालणाऱ्या जन्ममृत्यूचे, काळाचे ते रुप होते. मी त्या वाळूच्या घडयाळासमोर मोठी काच बसवून घेतली त्यामुळे येणारे पर्यटक काचेतून ते घडयाळ बघू शकत. पुढे बांक ठेवले होते. दोघी बहीणी त्या बाकावर बसून त्या घडयाळाकडे बघत असत. जणू काळ बदलेल ही आशा त्यांना वाटत असावी. पडणाऱ्या वाळूचा एक विचित्र आवाज येत असे. कितीही काळ बदलला तरीही मुलींना दिली जाणारी दुय्यम वागणूक जगात बदलते का? ''

''निश्चित बदलेल. आपण आशा करु या मला मुलगी झाली असती तरी मी खूष झालो असतो. '' साठे म्हणाले.

मला कॉलेजच्या कार्यक्रमाला पाहुणे म्हणून बोलावले होते. योगायोगाने आशाराजेंला त्यात बक्षीस मिळाले. कार्यक्रम संपल्यावर घरी पत्नीने विचारले, ''काय गाणे म्हटले तिने?''

''आईच्या गर्भात उमजली झुंजाराची रीत. '' मी उत्तरलो.

रजनीराजे हसून म्हणाल्या, ''आमच्याबाबतीत हे वेगळेच आहे हो. आईच्या गर्भात उमजली श्रृंगाराची रीत. '' आम्ही सर्वजण जोरात हसलो. ताईच्या झुंजार लढाईचा आम्ही फालुदा केला व शृंगाराला त्यांच्या शौर्यापेक्षाही श्रेष्ठ मानले. आम्ही चुकतोय हे कळण्या एवढी बुध्दी

आम्हाला नव्हती. आम्ही आमच्या संसारात खूष होतो. उपभोग घेत होतो. पण बहिर्णीना जीव द्या, सासरीच मरावे, सती जावे सांगत होतो.

मात्र आम्हा भावंडांच्या जीवाचे काही बरेवाईट झाले असते तर आमच्या बायका अजिबात सती गेल्या नसत्या. त्या सतीच्या वेळी रजनीराजे नेहमी म्हणत. ''अहो आम्ही सतीचे सोपस्कर करतो हो पण त्या जुन्या चालीरिती आता कोण मानते. लॉरेल हेस्टिग्ज नावाच्या गव्हर्नरने सतीची चाल बंद केली आहे. हव्याहव्याशा स्त्रिया सती थोडीच जातात. नकोशा स्त्रियांनी जावे. '' त्यांचे अक्कल पाजळणे पाहून सर्वजण गप्प बसत. वसुधाराजेही माघारी आल्या. मात्र सोन्याभाऊंच्या धाकाने त्यांनाही आम्ही कॉलेजात घातले.

वसुधाताई व आशाराजे कॉलेजमध्ये शिकत होत्या. एकदा कॉलेजच्या ट्रीपला दोघींना जायचे होते. मी पैसे घ्यायला कुरकुर करीत होतो. पण शेवटी दिले. कारण सोन्याभाऊंची इच्छा होती. खुशीत जामानिमा करुन मणी करणला ट्रेकर्स असोसिएशनतर्फे दोघीजणी ट्रीपला गेल्या. आम्ही सुटकेचा नि:श्वास टाकला. राजमहालात मोठी दावत ठेवली. अशीही त्यांची काही आम्हाला भीती नव्हती, पण वाच्छानी व इतर काही वरिष्ठ गावकरी त्यांची चौकशी करीत असत. दोघींचे रुप देखणे होते व राजघराण्याचे तेज त्यांच्या चेहऱ्यावर होते. त्यांच्या पुढे माझ्या पत्नीला न्यूनगंड वाटे. त्यांना फसवणे, नादी लावण्याची गावकऱ्यांपैकी कुणाचीही हिम्मत नव्हती, कुणाचाही आवाक्यातील गोष्ट नव्हती. असेही त्या गावठी संस्थानाच्या आसपास सुशिक्षित घरी कुणी चांगले असे पुरुष नव्हतेच. आमच्या पत्न्या हुषार व श्रृंगारीक होत्या. त्याउलट बहिणी मूर्ख भोळया होत्या. दोघी मणिकरणाला गेल्या म्हणून आम्ही दावत झाल्यावर गच्चीवरील शामियान्यातच झोपलो होतो. डोळयावर नशा व धुंदी होती. रात्र सरली की, पहाटे निरोप घेऊन जमादार आला. ट्रीपला दोघींचा अपघात झाला. बर्फाच्या वादळात ॲव्हलॉचमध्ये दोघी अडकल्या आहेत. ''मरु देत'' आपल्याला काय, म्हणून मी फारसा विचार न करता झोपलो. बहिणी हव्या कुणाला होत्या? आम्हा दोघा भावांना तर नकोच होत्या. साखरझोपेतच सूर्य माथ्यावर आला.

संध्याकाळी वाच्छानी आला. त्याचा चेहरा पडला होता. वसुधाराजेंचा बर्फाने काकडून मृत्यू झाला व आशाराजेंचा पत्ता लागत नव्हता. मला सीतारामराजे व रजनीराजेंना खूप आनंद झाला. आम्ही मटन खात बसलो होतो आणि नेमका वाच्छानी आला. ''आशाराजे सुखरुप आहेत व वसुधाराजेचा मृतदेह घेऊन येत आहेत. '' वाच्छानी पुटपुटला आम्ही व्यवस्थित जेवलो. सतीच्या समाधीच्या पलीकडे वसुधाराजेंचे अंत्यसंस्कार केले. त्यांचा नवरा आला होता. खूप रडत होता. ''माझे चुकले, मी आईचे ऐकले. '' म्हणून माफी मागत होता. मेलेल्या पत्नीच्या आठवणी काढत होता. मृत्यूनंतर दु:ख विसरण्यासाठी खारे जेवण केले जाते. तिसऱ्या दिवसानंतर मटन पार्टी ठेवली त्या पार्टीत मी आशाराजेंना म्हणालो, ''तुम्हीच मारलेत वसुधाराजेंना. कशाला गावोगाव भटकायला हवे होते? कशाला ट्रेकिंगची नाटके? तब्येत बघावी, झेपेल तिथे जावे. ''

वसुधाराजेंचा नवरा मला म्हणाला, ''ट्रेकर्स क्लबवर पंचवीस लाखाचा दावा लावू या. तुमच्या मातब्बर राजघराण्यातील मुलगी होती ती! '' लबाड माणूस ह्या हेतूने आला होता तर! आम्ही तिघांनी वसुधाराजेचा नवरा, मी व सीतारामराजेंनी आशाराजेंवर खूप तोंडसुख घेतले. एकोणीस वर्षाची मुलगी बहिणीचा मृतदेह घेऊन आली होती आणि आम्ही मात्र तिचा अपमान करत होतो. तिच्या जागी आम्ही असतो तर कदाचित साफ कोसळलो असतो. पण तिला अपमानीत करायची ही संधी आम्ही साधली.

तिघांनी मिळून ट्रेकर्स क्लबवर पंचवीस लाखाचा दावा लावला. वकीलसाहेब आले होते. त्यांनी दाव्याचे कागद बनवले. ट्रेकर्स क्लब काही पैसे देऊन प्रकरण मिटवत होते. पण आम्हाला अधिक हवे होते. अटकेच्या भीतीने त्या क्लबचे लोक घाबरले. ते दाती तृण धरुन भेटायला आले. ''बर्फाशी झुंजायची यंत्रणा नसताना ट्रेक नेता! तुमच्यावर सदोष मनुष्यवधाचा गुन्हा लावू. '' सीतारामराजे म्हणाले. ट्रेकर्सवाला वाच्छानीला मध्यस्थ घालून काही लाखांवर तडजोडीला तयार झाला. ते काही लाख त्याने पत्नी व आईचे दागिने विकून दिले, पण आम्हाला काय फरक पडत होता. आम्ही तर कमाईकर्ते! आउट ऑफ कोर्ट, दावा मिटवला. आम्ही काही टक्के वाच्छानीला

कमिशन दिले. वाच्छानी गेला. माझी पत्नी रजनीराजे आशाराजेंना म्हणाल्या,''तुम्हीही मरायचे की आम्हाला अजून पंचवीस लाख मिळाले असते. '' त्या रडू लागल्या.

आम्ही पैसे मोजले, ''बघता काय पैसा मिळणार नाही. निघा इथून. '' सीतारामराजे ओरडला. ''मला पैसा नको होता. माझी बहीण हवी होती. '' म्हणून आशाराजे कोसळल्या. वाच्छानी मागे वळून आला. त्याने आशाराजेंना उचलून बिछान्यावर ठेवले. रजनीराजे म्हणाल्या, ''इथ मरायचे कोसळायचे नाटक करण्यापेक्षा तिथेच मरायचे. आमच्या कुटुंबाचे कल्याण झाले असते. '' वाच्छानी कसेनुसे तोंड करुन गेला. इतका लबाड गृहस्थ पण नाटक करण्यात तरबेज होता. घरातल्या दोन संकटांपैकी दोन बहिर्णीपैकी एक परमेश्वरानेच दूर केले. आशाराजेचा काटा कसा काढावा मी व रजनीराजे विचार करु लागलो. आम्हाला ती ब्याद घरी नको होती. सांडपाण्यातील कमळाला कसे वाचवावे ते वाच्छानींला कळेना.

पण तिचे चांगल्या घरी लग्न पण होवू द्यायचे नव्हते. गेलेल्या जीवाच्या मृत्युबद्दल आम्ही कधीही टीपे गाळली नाही. आशाराजे मात्र बहिणीच्या आठवणीत दिवसेंदिवस उदास दिसू लागल्या. त्यांचे व वसुधाराजेंचे एकमेकांवर फार प्रेम होते. पूर्वी एकदा तर आम्ही मुद्दामच त्या दोघींना पडवीत ठेवून पर्यटनाला गेले तेव्हा दोघी एकमेकींचे कपडे आलटून पालटून घालून राहील्या होत्या. एक भाकरी वाटून खाल्ली होती. आशाराजेंची आधीच अशक्त प्रकृती. त्यात बहिणीच्या मृत्यूचे  दु:ख! त्यांची काया खूप खंगत होती. एवढे कमी म्हणून त्यांच्यावर डागण्या दयायला आम्ही दोघे भाऊ होतोच. जगातल्या सर्व शिव्या म्हणूनच भाऊ शब्द असलेल्या असतील का? आज वाटते का केला हा अटटाहास? का वागलो असे? या राजमहालासाठी? कसली बाधा झाली होती? कसला माज होता? बहिर्णीवर अन्याय अत्याचार करुन 'जिंकलो जिंकलो' म्हणून आम्ही नगारे वाजवत गावभर फिरलो. बहिर्णीना आयुष्यातून उठवले व पैसे राखून ऐषोराम उपभोगला. पुरुषी वर्चस्वाचा अहंकार बाळगला. खरे तर ही आमची हार होती. पण गावकरी तोंड मिटून बसले. आम्हाला हे कुणीच कसे सांगितले नाही? मी चुकत नाही बहिर्णीच चुकल्या असे मला वाटले.

जनतेच्या डोळयावर पण पटटी बांधली गेली आहे का? आम्ही चुकलो हे आम्हाला कळले नाही. सोन्याभाऊराजेचे गीत आशाने गायले नाव काढले

नुकतीच कोठे मांजर व्याली. जीव सान कोवळे

काचेवरती तोच जमले, खाया अवेळी कावळे,

संकटाची अशी मालिका, एखादयाला का सोसावी लागते.

उद्या वसुधाराजे व आशाराजेंच्या जागी कुणाचीही, त्यांची बहीणही असू शकते. पण आमच्या घरचा प्रश्न म्हणून बाही लोक षंढासारखे गप्प बसले. आम्हांला बहीणी पोसणे अवघड नव्हते. तसा त्यांचा आम्हाला त्रास नव्हता. मरेपर्यंत दोघीजणी खुषीत राहयल्या असत्या, पण एकीला काळाने ओढून नेले व दुसरी खचली.

खरेतर त्या सोन्याभाऊराजेचे राजमहालात नोकरचाकरांना, आउटहाउसमध्ये मुदपाकखान्यात एखादया खंदकाच्या जवळच्या खोलीत आशाराजेंना आम्ही राहू देवू शकत होतो. पण दुदैवाने आम्हा भावांच्या बायका महाभारतातील शकुनीमामाहूनही अधिक दुष्ट होत्या. त्यांना आशाराजे वाटणी मागतील असे वाटे. त्या दोघा बहिर्णीची जोडी देवानेच फोडली होती. आता उरलेल्या एकीचा काटा काढायला आम्ही सरसावलो. आम्ही चार, आशाराजे एकटी ती आमच्याशी दोन हात काय करणार?

वसुधाराजेंचे अंत्यसंस्कार उरकल्यावर निर्विकारपणे सोन्याभाऊराजे वारतील त्याच दिवशी आशाराजेंना या घराबाहेर हाकलायचे हे निश्चित करुन आम्ही दोघे भाऊ आपापल्या पत्नींबरोबर खुषीत निजलो. एकटया तळमळत रडणाऱ्या बहिणीवर कुरघोडी रचण्यात आनंद मानत होतो.

म्हातारी मेली होती

काळ सोकावत होता

दु:ख कुणाला ही नव्हते

मला वाटते त्या दिवशीपासून राजमहालातून सर्व देव निघून गेले असावेत. वाळूचे घडयाळातील वाळू पडणे थांबले असावे.

महालात उरले अतृप्त आत्मे!

वासनेत लुडबुडणारे

देवांनाही न भिणारे!

जिवंतपणी बहिणीला न सांभाळून मेल्यावर मात्र त्यांचे पैसे हडपणारे! पूर्वजांचा वाडवडिलांचा आत्मा तळमळून तो कुलपुरुष त्या राजमहालातून निघून गेला.

वाळूचे घडयाळ टिकटिकत होते. चित्रगुप्त हिशेब लिहीत होता. मी त्याच्याशी लपंडाव खेळत होतो. वाळूच्या घडयाळातील घटीका, पळे, समय देव मोजत होता. वसुधाराजेंच्या मृत्यूनंतर मात्र ते वाळूचे घडयाळ त्याच्या हिशोबाने मला काही शिकवायचा प्रयत्न करत होता. पण लपून खेळलेला माझा डाव रडीचा लपंडाव होता. पण मला ते कळलेच नाही.

सोन्याभाऊ नंतर राजमहलावर अनितीची काळी छाया पडेल कि काय याबददल काही नातेवाईक पाठीमागे चर्चा करीत होते. पण कुणीही मध्ये पडले नाही. व समोर बोलले नाही. विहिरीजवळील वाळूच्या घडयाळाने टिकटिकणे सोडले नाही. पण मीच त्या टिकटिकीकडे दुर्लक्ष केले. भ्रम पाळणे मला सोयीस्कर वाटले.

जन्माला येऊन उपभोग घेऊन, किडा मुंगीसारखे कणाहिन जगून मी काय केले? बहिर्णींना तुच्छ लेखायला मी कोण मोठा होतो? स्त्रीला उपभोगाची वस्तू मानायला स्त्रीची किंमत कमी होती असे नव्हे, तर माझा दृष्टिकोन हलक्या मनोवृत्तीचा हिणकस होता. वर्षानुवर्षे दाबल्या जाणाऱ्या समाजाला दाबणे व बळी घेणे हीच माझी राजेशाही वृत्ती? बास्टीलचा तुरुंग फोडून बाहेर येणाऱ्यांप्रमाणे जर अन्यायग्रस्त स्त्रियांनी बंड केले तर? पण स्त्रियांना खच्ची करण्यातच आम्ही आमचे मोठेपण मानले. दुर्दैवाने आम्हाला बायका मिळाल्या, त्या ही तशाच! एका स्त्रीने दुसऱ्या स्त्रीशी कसे वागावे हे न समजणाऱ्या! भावाभावांच्या भांडणाच्या अनेक कथा इतिहासात

वाचता येतात पण एका बहिणीला, दुबळया स्त्रीला नेस्तनांबूत करायला कितीसा वेळ लागणार?''

समाजात त्या काळी एकदम बदल झाला. दूरदर्शन आले. संवाद संपला.

ऐहिक सुखामागे धावणारा मी एकटाच उरलो नाही. माझ्याबरोबर बरेचजण आले. एका रॅटरेसमध्ये आम्ही धावू लागलो. वाळूच्या घडयाळाबददल आशाराजेंचे अनेक लेख प्रसिध्द झाले. आशाराजेंचा आवाज उठत होत्या. ''लड, झगड, आगे बढ! ''

त्या वेगवेगळे लेख लिहून जागृती करत होत्या. मला वाटे राजघराण्यातील आमच्या तलवारीपुढे त्यांच्या तीन पैशाच्या लेखणीची काय किंमत असणार? पैसे हवेत म्हणून एका अनाथाश्रमात आशाराजेंची झुंजार लेखणी हिशेब लिहायचे काम करी. मला वाटत असे, कला विकत घेता येते. वारशाने मिळते ते राज्य राजकारण व संपत्ती! कलाकाराला कोण विचारते? तिच्या त्या लिखाणाकडे मी दुर्लक्ष केले. ''स्त्री साहित्याची जमा दलित साहित्यातच करा. ते स्त्रियांवरच्या असमान वागणूकीने झालेल्या अन्यायाचेच तर वर्णन आहे. '' मी म्हणत असे. अभिमानाने माझी छाती फुलून येई की मी पुरुष आहे. मूर्ख असलो तरीही पुरुष आहे व ती हुषार असूनही स्त्री आहे. अब्रु जाणे या भीतीची टांगती तलवार आयुष्यभर डोक्यावर घेऊन वावरणे स्त्रीला भाग आहे. तिला परमेश्वराने नाजूक व सहजपणे बळी घेता येईल, असे बनवले आहे. परपुरुषांकडून विनयभंग होण्याच्या भीतीने तिचे पंख पूर्वीच छाटले आहेत.

माझ्या सुविद्य पत्नीने आशाताईला त्रास द्यायचा नूतन मार्ग शोधला :

भाकर करीन म्हटले तर खायला देईन म्हटले तर, तवा हाय वल्ला बसाया पाट देईन तर अंगण वाळूने खाल्ला म्हणून ती आशाराजेंना जगू देईना! चपला लपवण, पैसे, जेवण न देणे अशाप्रकारे त्रास आशाराजेंना दिला. आशाराजेंनी एका साप्ताहिकात लिहायला काम स्वीकारले. त्याचे त्यांना दीडशे रुपये मिळत असत. त्यात त्या चणे शेंगदाणे पाव खाऊन दिवस काढू लागल्या. सत् असत चा नीती अनीतीचा लपंडाव मी खेळत होतो. एक दिवस वाच्छानी, डॉ. काळे

गावातील एका प्रतिष्ठित गृहस्थासोबत आला व म्हणाला, ''तुम्ही मुलींना खायला देत नाही. ती रस्त्यावर खाते. '' मी समोर टांगलेला हंटर काढला व जमिनीवर आपटत नोकराला फर्मान सोडले, ''आशाराजेंना बोलवा. चामडी सोलतो''

वाच्छानीने माझ्या हातातला हंटर काढून घेत म्हटले, ''त्यांचा दोष नाही, तुम्ही वागणूक सुधारा. आमच्या घरी, पोटीही मुली आहेत. आम्हाला तुमच्या पापात धनी व्हायचे नाही'' तो प्रतिष्ठित मला म्हणाला, ''बहीणीशी नीट वागा! ''

आशाराजे आल्या. तो प्रतिष्ठित म्हणाला, ''चांगल्या माणसाचे चांगले व्हावे, जगण्यासाठी लिहीणे आवश्यक असते बेटा. पण जीवनावर लिहीत जा. गाळ स्थिर खाली बसतो त्यामुळे सर्व ठीक वाटते. वातावरण ढवळून निघाले, गाळ कालवला गेला की, वातावरण दूषित होते. पण खचू नको मनुष्यजन्म काहीतरी करण्यासाठी असतो. भुईला भार बनून उपभोग व ऐश्वर्यात आयुष्य घालवण्यात नसतो. ''

''शिक्षण बंद करु नका. शिष्यवृत्ती घ्या. मागीलदारी कणसे, फळे लावा, झाशीच्या राणीप्रमाणे लढा. स्त्री ही क्षूद्र गोष्ट आहे असे माननाऱ्यांची मला शरम वाटते. मला उद्देशून ते प्रतिष्ठित म्हणाले, ''तिच्या सहनशक्तीला तिची कमजोरी समजू नका. मुलींनाही जीव असतो ती स्त्री आहे. '' ''अशोकवनातील सीता, तिला काहीतरी लिहावेसे वाटते. लिहीते धातुर मातुर'' मी म्हणालो.

''गौतमबुध्द सिध्दार्थ यशोधरेला सोडून गेले. त्यानंतर यशोधरेचे जीवन कुणी पाहिले नाही. सीतामाता राम म्हणतो आपण पण परित्यक्तेला मान देत नाही! डॉ. काळे

वाच्छानी म्हणाला ''हंटरने मारायच्या गोष्टी ही शोभत नाही'' मी गप्प बसलो.

तो गृहस्थ प्रतिष्ठित कार्यकर्ता होता. तो गेल्यावर मी वाच्छानीला म्हणालो, ''मॅनेज करा. त्याला सांगा. आमच्या खाजगी गोष्टीत त्याला नाक खुपसायची गरज काय?''

वाच्छानी म्हणाला, ''आशाराजे गावाची लाडकी मुलगी आहे. चांगली मुलगी आहे. म्हणून ते मध्ये पडले. त्यांना अर्थिक मोह नाही. ''

माझी पत्नी नाचरेपणा करत वाच्छानीसमोर बसली व म्हणाली, ''अहो, टाकलेली बाई वरुन कीर्तन दिसली तरीही ती आतून तमाशाच असते. ''

वाच्छानी म्हणाला, ''शटप. तुम्ही तुमच्या विचारांचे पुनरावलोकन करा. बऱ्याच स्त्रिया शक्य झाल्यास घटस्फोट घेतील इतका त्रास भोगतात व असहय झाल्यावरच तो निर्णय घेतात. बरेच संसार तडजोडीनें चालतात. तुम्ही वारंवार तिला हिणवणे बरे नाही. उद्या तुमच्या पतीने एखादी बाई ठेवली व तुम्हाला सोडले तर. त्यावेळी तुमचीही तीच स्थिती होईल! किंवा तुमचेच मन विटले तर तुम्हाला इथे राहणे नको वाटेल. क्षणात तुम्हींही परित्यक्ता बनू शकता किंवा पती मृत झाल्यास निराधार विधवा बनू शकता. ''

''जात्यातले रडतात सुपातले हसतात. ''

वाच्छानी आपल्यावर फिदा आहेत असे माझी पत्नी म्हणत असे, पण त्या वाक्यांनी तिचा भ्रम निरास झाला. जातांना माझ्याकडे तुच्छतेचा कटाक्ष टाकून तो निघून गेला. स्त्री ला जिंकणे म्हणजे तिचा अपमान करणे हा मला पुरुषार्थ वाटत होते. मी त्या गावातील पहिला नागरिक होतो. ते लोक गेल्यावर माझी पत्नी माझ्याशी खूप भांडली. जणू मी तिला टाकण्याचा संकेत दिला होता किंवा मी अन्यत्र प्रकरण केले होते. मी तिला म्हणालो ''पुरूषांना अधिकार असतो, पण तुमच्यासारखी पद्मिनी कुठे मिळणार? '' ती यावर म्हणाली, ''म्हणजे मिळाली तर तुम्ही करणार? माझ्या घरी ही कथा होताी. मग बाकींच्याकडे काय असेल?''

मी राजघराण्यातील होतो. माझी विचारसरणी हटटी होती. मी ''समर्थ'' होतो. मी जनतेला माझा गुलाम मानत होतो. ऐश्वर्याच्या मस्तीत जगत होतो. बहीर्णीवर अन्याय करत होतो. दुबळया काय विरोध करणार? मी हाताखालच्या नोकरांवरही अन्याय करत होतो. महाल झाडणाऱ्या नोकरांना सुध्दा मी खूप रागवित असे. मी कूळांकडून वसूली करत होतो. रयतेवर कर लादत होतो. माझे वारू अनितीच्या रस्त्याने उघळत होते. काचेमागे कै. आईसाहेबांचे वाळूचे घडयाळ मी लवपून ठेवले होते. वडिलांचा सुयोग्य वारसा मी अडगळीत टाकला. मला माझ्या राजेशाहीचा व सत्तेचा अभिमान चढला होता. दुबळयांवर जोर करण्यात मी मोठेपण मानत होतो.

चित्रगुप्ताचा हिशोब मला पुढे मागे भोवेल हे माझ्या मनातसुध्दा आले नाही. राजमहालातील उपभोगात आम्ही बुडालो. त्या दोघींची जोडी फुटली यातच आम्ही भावंडांनी आनंद मानला. आम्ही लपंडाव खेळलो.

राजमहालातील वाळूच्या घडयाळाला बघायला येणारे व भारुन जाणारे पर्यटक वाळूचा अर्थ समजून संदेश स्वीकारत होते. आम्ही मात्र वाळू हातातून सुटावी तसे सुटलो होतो. बेपर्वा वृत्तीने कसच्या तरी नशेने भारुन धावत होतो! त्या घडयाळावर विजय मिळवायला बघत होतो! शिशुपालाचे शंभर गुन्हे पूर्ण व्हायची श्रीकृष्ण वाट बघत होता. वाळूचे घडयाळ थांबले होते.

लपंडाव मात्र चालू होता. सोन्याभाऊसाहेबांची तब्येत भाजल्यापासून फारच बिघडली होती. मी त्यांच्या मरणाची वाट बघत होतो.

साठेनीं त्या विषयांवरचे वाळूचे घडयाळ नावांचे लिखाण पुढे ठेवले.

## ५ रस्त्यावरची राजकन्या

ती राजकन्या होती, पण राजकुमारी नव्हती. एक दिवस आमच्या प्लॅननुसार रजनी राजेंनी भांडून तिला जेव्हा मी घराबाहेर काढले, तेव्हा मी निर्विकारपणे शांत होतो. मी पत्ते खेळायला जवळच्या गावातील प्रतिष्ठितांचा एक क्लब होता. तिथे गेलो. त्या दिवशी मला ड्रायव्हर मिळाला नाही. व परत मी वाच्छानीच्या गाडीतून आलो. वाच्छानी गप्प होता पण अस्वस्थ होता. बराच वेळ बोलू न बोलू अशी चुळबुळ करुन झाल्यावर मला म्हणाला,

''आशाताईराजे कुठे आहेत?''

मी चकित झालो, तुम्हाला काय करायचे आहे?असे विचारणे माझ्या त्या शांत सदशील प्रतिमेला शोभले नसते

मी म्हणालो. ''घर सोडून गेली. '' वाच्छानीच्या नजरेत कडवटपणा होता. त्याची नजर विचारत होती, ''गेली की तुम्ही हाकललीत. ''

तो म्हणाला, ''चार प्रतिष्ठित मध्यस्त घालून बैठक बसवून त्यांची रहाण्याची चोळी, बांगडीची व्यवस्था करायला हवी होती. कुठ असतील''

''असेल कुठे ही कुळबुडवी गेली'' मी उत्तरलो.

''तुम्हाला जर हे माहित आहे तर तुम्ही त्यांना घेऊन का येत नाही? सोन्याभाऊंसाहेबांचे त्या किती प्रेमाने करत, त्या महालातील पाठच्या छोटया घरी राहण्याच्या त्यांना हक्क आहे. पडू देत कोपऱ्यात. ''

मी गप्प बसलो. मला ती ब्याद नको होती. तो विषय मला संपवायचा होता. घराच्या रस्त्यावर एका पेन्शनरांचा कटटा होता. एकजण पुढे आला व गाडी अडवून तावातावाने म्हणाला,

''आमच्याही घरी मुली आहेत. तुमचे बघून आमचे मुलगे आमच्या मुलींशी असे वागले तर आमच्या मुलींनी कुठे जायचे? तुम्ही चुकता आहात'' बरेचजण होते, पण बाकी कुणीही त्याला साथ दिली नाही की त्याचे विधान उचलून धरले नाही की बोलले नाही. मी म्हणालो,

‘‘धाक हवाच! मी योग्यच वागलो, माझ्याच खानदानी रक्ताचे, कडक शिस्तीचे रक्त आहे. ’’ मी मंद हसल्यासारखे दाखवत त्याच्यावर मोहीनी घातली व मायावी भाषेत म्हणालो.

‘‘तिच्या हितासाठीच मी हे करीत आहे. ’’

वाच्छानी म्हणाला, ‘‘कुणी त्यांचा बेघर स्थितीचा गैर फायदा घेतला तर....... हे कुठले हिताचे कारण तुमचे, बलात्कार झाला तर त्या उध्वस्त होतील. ’’

तो पेन्शनर म्हणाला, ‘‘तुमची बहीण म्हणून तुम्हाला लाज नसेल पण एक स्त्री म्हणून आईसाहेबांची लेक म्हणून, तिची काळजी घ्यायला हवी. आम्ही पोलीस केस करु?’’

वाच्छानी खूपच अस्वस्थ दिसला. माझी बहीण होती. मी हाकलली, मला काहीही वाटत नव्हते आणि यांना काय पडली आहे. मी स्थितप्रज्ञ होतो. मला जनाची न मनाची पर्वा नव्हती. दुसऱ्या दिवशी क्लबमधील मिटींग मध्ये वादावादी चालू होती.

मी मानभावेपणे म्हणालो. ‘‘भांडू नका समजूतीने घ्या, अब्रूदार लोक आपण’’

कामटे कुजकट पणे म्हणाला. ‘‘स्वत:च्या घरात बघा! अब्रूदार म्हणे. तुमच्यापेक्षा तर झोपडपट्टीतील लोक पण सुसंस्कृत असतील. बहीणीवर अत्याचार करुन ऐष करणाऱ्या तुमच्या सारख्यांना खरेतर दगडाने ठेचायला हवे’’ अर्थात निर्विकार वृत्तीच्या त्या लोकांमध्ये त्याला कुणीही सपोर्ट केले नाही. अशा समाजाचा तो एक फायदा असतो. हे लोक ते कुणाच्या भानगडीत पडत नाहीत.

लूट गयी बहार, दिलसुख सुख मुरझाये, म्हणून कुणी मेले तरी ही? त्यामुळेच तर माझ्यासारख्यांचे मनसुबे व षडयंत्र यशस्वी होतात.

परत येताना पुन्हा वाच्छानीने विषय काढला. जणू त्याला काहीतरी विशेष खास. from horses mouth बातमी हवी होती किंवा मोठेपणा दाखवायचा होता. ‘‘आशाराजेंना माहीनपूरच्या घरी ठेवा. नाहीतर हॉस्टेलवर ठेवा पण... ’’ मला ते चालले असते म्हणा! पण सीतारामराजेंना त्या महीनपूरच्या त्यांच्या मालकीच्या महालातही नको होत्या. खरेतर सर्वच

इस्टेट सोन्याभाऊंची होती. त्यातील आमचे स्वकष्टाने आर्जित काहीही नव्हते. पण त्याची काटेकोर वाटणी सोन्याभाऊंनी केली होती. शिवाय आम्ही स्वत:ला पुरुष म्हणून हक्क बहाल केला होता. मला आठवते मी त्यांना घराबाहेर जा म्हणालो तेव्हा त्या म्हणाल्या,

''मला मारुन टाका, कापून टाका, पण घराबाहेर काढू नका, मी कुठे जाऊ?'' मी त्यांना बाहेर काढून दरवाजा बंद केला त्या घरातील पाळलेले माझे इमानी नोकर साप चावल्याप्रमाणे गप्प बसले. त्या रडत होत्या व तिथे वाळूच्या घडयाळाजवळ बसल्या. मी खिडकीतून ओरडलो, ''जीव द्या, विहीर वाट पाहाते आहे. मारा उडी, कुणालाही तुम्ही नकोच आहात. '' नोकर कुजबुजत होते. पण मी कुणालाही न जुमानणारा पुरुष, नोकरांना काय दाद देणार?

मी शांतपणे झोपलो. सकाळी दरवाजावर थाप पडली. मला आनंद झाला. वाटले आशाराजेंच्या मृत्यूचीच बातमी घेऊन कुणी तरी येईलच, तेच आले असतील. पण वाच्छानी होता. शोधक नजरेने बघत होता. इतका नीच असूनही त्याला मध्येच सभ्यपणाची का भरते येई. मला समजत नसे.

थोडा वेळ बसून म्हणाला, ''आशाराजे कुठे आहेत'', विचारु लागला मी त्याला कटवले. जाता जाता तो म्हणाला, ''त्यांना मी कुठेतरी शाळेत शिक्षिका म्हणून लावतो. त्यांना वाऱ्यावर सोडू नका. ''

बंदिनी स्त्री ही बंदिनीरुपे बहिणीची माया देई

सासरी सर्वस्व देई माहेरा सोडूनी जाई

तिला घेऊन एक स्त्री मुक्तीवाली बाई उषाताई सितारामराजेंकडे गेली. त्या एका रात्री जोरदार भांडणानंतर मी तिला निघ का म्हणालो? घराबाहेर का काढले याचा त्यांनी जाब विचारला. सोन्याभाऊंनी महीनपूरची इस्टेट सीतारामला दिली होती. तिला मी आनंदपूरच्या महालातून घराबाहेर काढल्यावर ती उषाताईबरोबर मोठया दादाकडे तक्रार घेऊन गेली! महामूर्ख! मीही तिच्या पाठोपाठ हजर झालो. कोर्टकचेऱ्या केल्या तर उगीच त्रास नको, तिला

भावनेला आवाहन करुन आलो. नाटक करून ती कटकट मिटवता येते. कोर्टकचेऱ्या केल्या तर त्रास होतो. मोठा भाऊ तर महा लबाड होता. तो दारु पिऊन हॉलमध्ये बसला होता.

''माझी पत्नी व मुलगा यांच्या व्यतिरिक्त मला काही देणे घेणे नाही. '' त्या कार्यकर्तीला मी म्हणालो, ''आम्ही बघतो, तुम्ही जा! हे तिच्या हितासाठी करीत आहोत. आम्ही जेवून बोलू, तुम्ही या. '' त्या गेल्यावर दोघांनी आम्ही भावांनी दारु ढोसली, मटन भाकरी ढोसली,तिला जेवण घे सुध्दा म्हटले नाही. मोठया भावाची बायको तिच्या माहेरचे लोक आले होते म्हणून त्यांच्यात दंग होती. तिला आम्ही नको होतो. म्हणजे मी चालणार होतो कारण मी पुरुष होतो. पण तीच्या घरी आशाराजे नको होती. कारण तरुण मुलगी सांभाळणे अवघड असते. माझी लुच्च्या वृत्ती मला कामी यायची. मी खोटी स्तुती करुन भावांकडे लाळ घोटेपणा करुन माझे पाय रोवले होते. ती उपरी होती. आम्ही जेवलो आशाराजे मात्र उपाशीच बसून राहिली.

हे माझे घराणे! खानदानी पण मिरवणारे! दुबळया वर अत्याचार करणे ही आम्हा भावांची नीती होती हे आमचे संस्कार होते. खरेतर आईवडीलांचे संस्कार चांगले होते. पण बायको घरात आली व आम्हाला तिने पार पार मनापासून बदलवले. नवल म्हणजे सर्वांनाच आशाराजेंची एक प्रकारची जेलसी वाटायची. त्यांच्या विचारांचा राग यायचा. तीस वर्षात आईने घडवलेला सदगृहस्थ, लग्नानंतर फक्त गृहस्थच उरला. माझे संस्कार तक लादू होते.

Jealousy thy name is human

सीतारामभाऊ हलकट होता. म्हणजे माझ्यापेक्षाही जास्त स्वार्थी होता. आशाताईला वाटेल ते बोलला. ''मी नोकरी पकडली आहे. ''मी परीक्षा झाल्यावर ऑफिसमध्ये क्वार्टर मागून घेईन. जोपर्यंत मला घरात राहू दे. '' ती म्हणाली.

''महालात हक्क नको, मला सज्जात पडू द्या. इतक्या मोठया जगात मी १९ वर्षाची मुलगी कुठे जाऊ?''

त्यावेळी एका डायरीत लिहिलेले कात्रण मी साठेंना दिले. ते वाचू लागले.

## ६ राजमहालातून रस्त्यावर

दर आठवडयाला रविवार येतो तसे दु:ख जीवनात येणारच पण ६ वार दु:ख १ वार सुख नशीबी का यावे, पुण्याने आई-वडील मिळतात, पसंतीने व नशीबाने जीवनसाथी, तरीही सुख जीवनसाथ्यावर असते. जीवनाचा अर्थ की त्याच्यातही पुण्य असते. टेंडर उघडावे तसे जे भरु ते मिळते.

बाळाने पहिला श्वास घेतला. तेव्हा आई वडिल जवळ असतात.

शेवटचा श्वास घेतात तेव्हा मुलांनी जवळ असायला हवे. आईचे डोळे ओले ठेवण्यापेक्षा आठव की तू बाळ असताना तुला बिछाण्यातही ओल्या ठेवत नव्हते. जीवनाचा अर्थ तिने समजावला. तिच्या सहवासात अधिक कळला उमगला, समजला. सत्यकथेत लिहायला सोनेरी भूतकाळ नसला तरी प्रेम मुबलक असते. बालपणीचे हक्काचे नाते पुढे तरुण वयात मैत्रिणीचे होते तर संधिप्रकाशातील ५० + वयात थोडेसे प्रगल्भ व अगतिक होते. मृत्युचा अर्थ ओळखून संघर्ष करायची उमेद संपते. सकारात्मकता येते. पण ती पर्याय नाही म्हणून त्या उलट तरुण वयात हिम्मत असते आतून येणारी ऊर्मी, डोळयात छमछम नाचणारी स्वप्ने धीट बनवत असतात. मग आपण ा लटकून लोंबून रहातो मुलांना! कारण क्षितिज दिसते व ते गाठणे शक्य नाही हे कळते.

स्त्रीचे भावविश्व शोधतांना काही अनेक अंगी तर काही एकांगी रुपे असतात.

अपेक्षाभंग, पराभव, दुरावे, दु:ख, मृत्यू, मुक्ती व साधे सोपे सुख अशी स्त्रीची रुपे पाहिली. कपडे दागिणे एवढेच विश्व असलेली स्त्री ही पाहिली. खरे सांगते अशा स्त्री चा मला हेवा वाटला. अस्वस्थ करणारी भावना मला झोपू देत नसतांना फिल गुडमध्ये वावरणाऱ्या खाण्यापिण्याच्या पाटर्यांत व गॉसिप्समध्ये खुष होत्या. माझ्या मनात वाटे किती सुखी या दु:खाची भाषा न कळलेल्या. माझ्या अस्वस्थ मन:स्थितीत मला भूतकाळातील काही मूल्य मदतनीस ठरली. नाहीतर वर्तमानातील महानगरातील संवाद सुसंवादी वाटत नव्हता. महानगर असो कि खेडे, कष्ट करणारी स्त्री करते थकते. व दुसरी न करणारी मजेत राहते हा असंतुलित भाग मला छळतो. एकटेपणात लढणारी मी माझ्या अटळ मी पणात नायिका रुपाने परिवर्तित

होते उध्वस्त होऊन न दाखविणे अवघड असते म्हणून मी लिहिते. मी महरि होते (घरवाली) त्याची महरी झाले (मोलकरीण) एका वेलांटीने माझ्यावर आभाळ कोसळले. काही जिंकलेल्यांचा सन्मान होतो तेव्हा न जिंकलेल्यांमध्ये न सांगता येणारा न्यूनगंड अपरिहार्य असतो. स्पर्धा टाळता येत नाही. पराजयसुध्दा व नैराश्य टाळता येत नाही. शांत मन आतून उध्वस्त असते. निराश असते. अबोल मनात उदासी असते. राग येतो, पण राग कुणावर काढणार? पूर्वी स्वत:चे डोके भिंतीवर आपटावेसे वाटायचे. आता वाटते, फसवून राजरोस फिरणाऱ्यांसाठी आपले डोके का फोडायचे?

काही घरी विधवा व माघार परतीर्णीनाही मान मिळे. पण माझ्या नशिबी नव्हते. आपण नकोसे ही भावना नकोशी असते. पण काही जणांना इतरांना ही भावना देण्यात आनंद वाटतो. काही काळ पण विश्रांती नशीबी नसते व ग्रुप करुन बुलींग करणाऱ्यांना टाळणेही नसते. नोकरी सोबती नसते.

मला संध्याकाळ झाली की आठवे, झोपाळयाच्या कडया कुरकुरतील, रामरक्षेचा आवाज येईल. पाटी पेन्सिली घेऊन ओटयावर बसलेली मुले हिशोबाच्या शिळोप्याच्या गप्पा मारणाऱ्या स्त्रीया कानोसा घेत चुगल्या करणाऱ्या आज्या, भाकरीचा वास आठवे. एकटेपणात फक्त पुस्तकेच मित्र होती.

आई दादांची आम्ही  मुले होतो. पिल्लू रडते. पण वेगळी वाट शोधते. अचानक मृत्यू आल्यावरही इतर लोक जगतातच. हळवे पिल्लू रडते रेंगाळते. बाकीची पटापट उडाण भरतात. चक्र चालूच राहते. अहंकारी नवीन येतात. माणूस संपतो पण अहंकाराचा वारसा पुढची व्यक्ती होते. सद्‌गुणांचे तसे का नसते? मनातील संस्कार, संतचरित्रे, वाचलेली चरित्रे, सोबत होती. पण तरीही मी एकाकी होते. गाव संपेपर्यंत गाव पुढे आपली वेगळी वाट होती. दिवे दिसेनासे झाले. मी कडेकडेने त्या शुकशुकाटात कुणी माझा गैर फायदा घेऊ नये म्हणून लपत जपत बाहेर पडले. वाट पायाखालची होती. पण आज वेगळी वाटत होती. पुन्हा या वाटेवर येणार नव्हते. येणे जमणारही नव्हते.

राजेंनी बहीण राजघराण्यातील मुलगी बेघर झाली होती.  जगायला काय लागते? छप्पर? माणसे? शरीर?साधे आयुष्य सुंदर असते? पण कधी? कधी कधी?

हो कधी कधी? आपण कोण? असेच कुणीतरी काही वर्षे

मुक्कामाला आलेले प्रवासी! हातातून निसटून गेलेले आयुष्य?मोह संपला! नाती संपली!

पाण्याच्या कुंडापाशी पण तिचे नशीबात वेगळे लिहिले होते. एक शाळेतील शिक्षिका उषाबाई तिला तिच्या घरी घेऊन गेली. खरेतर बाईला बाईची ईर्षा का असते? पण काही कारणाने उषाबाई नी तिला नेले. शोध घ्यायला कुणी येईल याची आशा नव्हती. घरगुती भाऊबंदकीची भांडणे खेडयापासून राजापर्यंत सर्वत्र असतात.

ती नकोशीच तर होते.

मुलगी नकोशीच असते. हे सत्य कानाडोळा करुन स्वत:ला ग्रेट मानणाऱ्यांबददल मला कणव येते. कुठल्याही क्षणी त्यांच्यावरही ही वेळ येऊ शकते. अशा वेळी त्या काय करतील? पण आज त्या तिला हसत होत्या. तिने पोलीसात जावे का? पण कसे? तिथे कुणावर विश्वास ठेवायचा?ती मुलगी होते. तिथे मुलगी सुरक्षित असेल का?

काही दिवस तिने जेवण वर्ज्य केले. जगले तेवढे खूप झाले. आता बास! पण मरण आले नाही. लढायला हवे होते ह्या संघर्षाला नाव म्हणजे भगवत् गीता, भाऊ बंदकी. मी जगलो याची मला लाज वाटते. तिला मरायची आत्महत्येची हिम्मत झाली नाही. म्हणून अपराधी वाटे. ह्या शरीराची या अस्तित्वाची शरम वाटे. उषाताईच्या या आश्रमात तरुण मुलगा वारला म्हणून बेचैन झालेल्या एक आजी तिला भेटल्या. त्यांना चिकटली. त्यांनी तिला पंखाखाली घेतले पण हळूहळू त्या तिला डॉमिनेट करु लागल्या. आश्रमातही दुही माजली. जगण्यापेक्षा मरणे खूप सोप्पे असते. पण ती जगत होते. ती उषाताईबरोबर महिनपूरला राजमहालात गाऱ्हाणे घेऊन गेली.

मी भावाकडे परत आले. अगदी वाटले तर पोलीस केस करायची ठरवली. एका स्त्री हक्क संरक्षण समितीच्या बाई उषाताई तिचेबरोबर होत्या.

राजे सांगू लागले. जेवणाच्या टेबलावर आम्ही बरोबर खात होतो. ती उपाशी समोरच्या गणपतीच्या फोटो फ्रेमकडे बघत बोलत होती. जगात जर देव असता गणपती असता तर फोटोतून बाहेर येऊन त्याने आम्हाला पोटात त्याचा एक दंत खूपसून मारला असता. डायरीचे पान अर्धवट होते.

त्या प्रसंगी ती खूपच लढली. अजूनही तिची उपाशी फिकट, बारकी बुरकी खांदे पाडून चालणारी व हसली तरी कुठल्याही अंधुक क्षणी, कोसळेल, रडेल अशी वाटणारी आकृति आठवते. माझ्या मित्रांकडे, नातेवाईकांकडे भेटून तिने काही दिवस महालात राहू द्यावे म्हणून विनवणी करण्याचा खूप प्रयत्न केला. तो प्रयत्न आधारासाठी होता. पण तिला ती राजमहलची हवेली हडप करायची आहे असा प्रचार मी केला व ते लोक विकलेलेच होते. जी लढाई ती जिंकली पण त्या सुंदर भाबडया आत्म्याने कच खाल्ली त्या गावठी संस्थानांपासून त्या कलापूर्ण नीतीहीन कोरीव दालनातून स्वार्थी लोकांतून तिने अंग काढून घेतले. तिचा त्या सांस्कृतीहीन संस्थानातील रस संपला. एक स्वतंत्र आशाताई तयार झाली होती.

प्रश्न तिचा होता तरीही मी ओरडलो. ‘‘आमच्या बायकांना काही हवे की नको? की त्यांनी सती जायचे. तू आलीस म्हणून तर बदनामी होईल. ’’

‘‘जेव्हा पुरुष माणसे बोलतात तेव्हा गप्प बस. ’’ सीताराम म्हणाला.

‘‘आमच्या बायका आमच्या माघारी सती जातील आणि तू बघ कशी? तुझी पहिली सासू भेटली होती. ’’ खरा लबाड हा सीताराम  खोटे बोलण्यात त्याचा हात कुणी धरणार नाही. सर्व सुख आहेत, पैसा आहे. सर्व आहे. पण विकृती कुजके बोलण्याची आहे. ! तरीही सुखी माणसाचा सदरा म्हणून त्याचा शर्ट सहज न्यावा. त्याला तीन कपाटे सदरे भरुन आहेत सुध्दा. तरीही वृत्ती नीच आजही आहे.. कुणाचेही हित याला कधी बघवलेच नाही.

शिक्षण - मजा करण्यासाठी

दुकान - वेळ घालवण्यासाठी

पाटर्या ट्रीपा - पैसा उधळण्यासाठी

वाढदिवस - स्वत:भोवती दिवे ओवाळण्यासाठी आहे.

रक्तदाब, डायबेटीस सर्वांनाच होते. पण याला नाही. मस्त शेठासारखा चेहरा फुगलाय, गोड बोलेल. पण कधी सुरा पाठीत खुपसेल याचा नेम नाही. मुलींना तूच्छ लेखण्यात नंबर वन.... सिताराम म्हणाला.

''तू प्रत्येक घरी जाऊन सांग, मला लग्न करायचे आहे. माझा घटस्फोट झाला आहे. '' आशाराजेंचा घटस्फोट याने खूपच आनंदाने घेतला. ती नांदू नये अशी नव्हे. पण ती सुखी होऊ नये अशी आमची इच्छा होती. राजकारणी व भाऊबंदकी जाणणाऱ्या खानदानी घराण्यातील मुलीला तिचा सख्खा भाऊ सीताराम असे सांगेल हे खरे वाटणार नाही. पण तो असे सांगत होता. तेव्हा ते का? हे न कळण्याइतकी आशाताई प्रगल्भ होती. मनातल्या मनात मी त्याची तुलना इतर भावांशी केली. बहिणीलाही विकायला तयार होणारा दलाल! मी ही नीच होतो. पण माणूस होतो. हा मात्र नराधमच होता. देवकी व कंसाचे भावा बहीणींचे खूप प्रेम होते, पण देवकीचा पुत्र श्रीकृष्ण तुझा वध करेल अशी भविष्यवाण झाल्यामुळे कंस दुष्ट बनला. पैसा वाईट असतो. पैशासाठी रक्त रक्ताला विसरते. सीतारामभाऊ पुरता चतूर होता. त्याचे व्यक्तिमत्व आकर्षक दरारा वाटणारे होते. आशाताई महीनपूरला राहणारच नव्हती. पण क्रूर सल्ला त्याने दिला. प्रत्येक घरी असे सांगून लग्न होते?' आशाताईने विचारले.

हयाने आयुष्यात कुणालाही सांभाळले नाही. हा काय तिला सांभाळणार होता. पण तिचा काटा काढण्यासाठी तिचा कुणीतरी गैरफायदा घ्यावा म्हणून त्याने ते सुचविले. तिच्यावर कुणीतरी बलात्कार करुन खून करावा पण वाटणीदार नको. जय हो! ''सोय लागते. '' सीताराम निर्लज्यपणे म्हणाला. ती कसनुशी होऊन बसली होती. दोन्ही सुना डोळयावर पदर घेवून मानभावीपणे माना डोलवत होत्या. स्वत:च्या संसारात पूर्णपणे त्या सुखी असूनही व स्त्री असूनही तिचा प्रश्न त्या जाणू शकत नव्हत्या. खरे तर ती चालू व चतुर असती तर या दोघींच्याच भावांचा हात धरुन ह्यांच्याच घरातले संसार माडू शकत हाती. पण तिच्यात ती नीचवृत्ती नाही हे मी जाणून

होते. त्याही होत्या. नाहीतर ती सासरीच व्यभिचार करुन राहीली असती. तिला आम्ही महालातील त्या घरी ४ महिने राहायची परवानगी दिली. अर्थात तिला अपमानीत करायची संधी आम्ही सोडली नाही.

''हे बघ अशी तशी माणसे घरी आली नाही पाहिजे, माझी बायकोही तिथे राहील कधीमधी. ''

खरेतर तिच्यापेक्षा माझ्या बायकोकडेच अशीतशी माणसे येण्याची शक्यता जास्त होती. व काळजीही होती. पण गळयातल्या ४ काळया मण्यांच्या आड ते चाले. ती विवाहित होती. तिला वाटेल तसे वागायची मुभा होती. पण ताई घटस्फोटीता! तिला कितीही चांगली वागली तरीही नावे ठेवणे तिचा पाण उतारा करुन वाभाडे काढणे, अपमान करणे व तिच्या अपमानात आनंद मानणे हा आमचा छंद होता. मग परक्यांचे काय? डोक्यावर पदर घेतलेल्या आमच्या सुना खरेतर अगम्यच होत्या, पण सौभाग्यवती होत्या.

मीच स्वत:च्या तोंडाने आशाताईच्या चारि«याबददल बोलू लागलो. चारि«य या शब्दात गूढ व काल्पनिक अर्थ निघतो. कुणीही कधीही कुणाबरोबर कुठेही आशाताईला पाहिले नसेल पण

भाऊराजेच बोलतो म्हटल्यावर लोक संशय घेऊ शकतात. म्हणून मीच वेडेवाकडे अर्धवट संशय पेरण्यासारखे सांगू लागलो.

ती नोकरीला जाऊ लागली. रजनी राजे शेजारी गप्पा मारायला गेल्या किंवा आशाताई कामाला गेल्या की आशाताई त्रास देते म्हणून रडायचे नाटक करीत. ''का! बरे त्यांनी आमच्या दोघांच्या खोलीत येऊन झोपावे. हा आमचा छळ आहे. ''

शेजारची बाई म्हणाली, ''वाईट एकदम वाईट! जी बाई नवऱ्याकडे नांदली नाही त्या अतृप्त बाईने तुम्हाला त्रास द्यावा, हे वाईट आहे. '' आशाराजे जे कथितरित्या वागतात ते कुणीही न बघता खरेखोटयाचा शहानिशा न करता ही बातमी सर्वत्र वाऱ्यासारखी पसरवण्यात आमचा स्वार्थ होता. कुठेतरी कोपऱ्यात काळपुरुष हसत होता.

''आम्हाला मुली नकोच होत्या, ह्यांना ही बहीणी नकोच पण चिकटगुंडी आत्महत्याही करत नाही. '' रजनीराजे ''सासरी जळून मेली असती तर बरे झाले असते'' शेजारीण म्हणाली. त्याच आठवडयात शेजारणीची मुलगी चौकात अचानक कुठल्याशा अपघातात वारली. ती शेजारीण तरीही राजमहालातील मंदिरात येई. पण ती आशाताई बददल वाईट बोलणे टाळत असे. हा महाल कसला मोहमयी होता. चौसष्ठ खांबाची आरास होती. वैभवाची कमान होती. रानझाडांचे सैनिक त्यांचे इतके आकर्षण वाटावे? किंवा महालाला त्याची कथा सांगायची आहे. म्हणून तो लोकांना बोलवतो.

चाळीतल्या लोकांना त्या महालाचे खूप आकर्षण वाटे व त्यास्वार्थासाठी ते लोक आशाराजेची बदनामी करण्यात आम्ही करीत असलेल्या गुन्हयातील मूक भागीदार होऊ लागले. ''काय सांगावी घरची गोष्ट, चादरीने झाकावी म्हणून सुरुवात करुन आम्ही धादांत खोटे सांगू लागलो. ''

आशाराजेपेक्षा माझ्या पत्नीचेच चारि«य संशयास्पद होते. कित्येक वर्षे मला ती घटस्फोट देईल असे वाटे. पण ती कदाचित त्या राजमहालाच्या राणीपदाच्या मोहानेच टिकली. राणीपदासाठी मला कुणीतरी दुसरे मिळेल असे तिला वाटे.

रजनीशी लग्न ठरल्यावर कुणीतरी राजमहालात निनावी घाण पत्रे पाठवीत असे. ही मुलगी घाण आहे. ती सेकंडहॅण्ड आहे. अशा अर्थाचे ते असे. रजनीराजे च्या कॉलेजमधील भानगडींबददल त्यात बरेच काही लिहीलेले असे. पण विघ्न संतोषी लोक राजघराण्यातील संबंधाबददल असे काही लिहीतात म्हणून मी दुर्लक्ष केले. तरीही आजपर्यंत माझ्या ही मनात तो संशय उरला. आशाराजेला व कै. आईला हे माहित होते. पण त्यांच्या मनाचा खरा खुरा, स्वच्छ मोठेपणा की त्या कुणालाही हे बोलल्या नाहीत. जेव्हा मी राजमहालासाठी इस्टेटीसाठी १९ वर्षाच्या आशाराजेला घराबाहेर हाकलून काढले तेव्हा तर ती किती चिखलफेक करु शकत होती. पत्र दाखवू शकत होती. गावातल्या ४ लोकांमध्ये पंचायत बोलवून घालून निवाडा करु शकत होती. आमची बदनामी करु शकत होती पण ती गप्प बसली. अन्याय झाल्यावर मुलींना तोंड न

उघडण्याचे संस्कार केले जातात हे बरे आहे. माझ्या बायकोबददल आलेले ते पत्रच ती सर्वत्र दाखवून महालात पाय रोवू शकत होती व म्हणूनच कोर्टात जावू शकत होती. विरोधीपक्षाकडे किंवा एखादया स्त्रीमुक्ती संस्थेकडे जावू शकत होती. त्यामुळे त्यानंतर काही दिवस ताईला राजमहालात रहायची परवानगी दिली.

आशाराजे राजघराण्यातील असूनही आमच्यासारखे नीच भाऊ आपल्यासाठी पैसे खर्च करणार नाहीत हे जाणून होती. सुनंदाताईला हुंडा न देऊन सासरी मरु देणाऱ्या या घराण्यात स्वत:ला राजकन्या समजण्यात काही अर्थ नाही हे तिने जाणले. म्हणूनच तर तिने तिच्या कॉलेजच्या मासिकात राजपूत्र व रानफुल लेख लिहीला होता. तिने स्वत:ला रानफुल समजावे हा तिचा नम्रपणा होता.

## मंदीचे वर्ष

राजकन्या रानफुलाचे आयुष्य जगली, राणी - सम्राज्ञी - दासीचे काम करत होती.

गोदावरीचे पाणी होते. समुद्राकडे  वहात होते. नोव्हे. २००१ नंतर २००८ सालचे मंदीचे सर्वात वाईट वर्ष आले. पैसा म्हणजे माया! टॅण्जीबल म्हणजे प्रगट असा ॲसेट्स ऐवजी मानसिकतेवरच रिसेशन, मंदी अवलंबून आहे. पूर्वीपेक्षा सर्वचजण श्रीमंतच झाले आहेत. पूर्वीपेक्षा कामगार व्यापारी मध्यमवर्गीय नोकरदार सर्वांकडे पैसा खुळावतो आहे. अमेरिकेतील बॅंकेने मंदी फार आहे म्हणून गृहकर्ज कमी केला व क्रेडीट खर्चात कर्ज आकसन आले.

शेअरबाजारातील, घरांमधील सोन्यामधील पैसा ही रोकड नव्हे ती रक्कम मानली जाते. खरेतर संकटकाळी पैसे परताव्यात मिळतांना त्यांनाही घर असतेच. गाढवाच्या पाठीवर सोने ठेवा. काय उपयोग? खर्च व वाढत्या महागाईला आळा बसवण्यासाठी पैसा चलनात आला पाहिजे. १९७६ मध्ये देशाची लोकसंख्या कमी झालेली होती. २०१६ त वाढतेय

लोकल करन्सीची नोटांची किंमत कमी झाली तर लोक रुपी ॲसेटस नको म्हणतील अशी वेळ आली होती. ताई एका छापखान्यात नोकरीला लागली. राजघराण्यातील मुलगी पण आम्ही तिला तिच्या पायावर उभी राहण्यासाठी घराबाहेर हाकलले वर फिल्मी स्टाईल मध्ये ‘घे भरारी’ म्हणून पाठीवर थापही मारली. पण ही थाप दु:खावणारी होती.

तिच्या मनातली स्वप्नाळू मुलगी तिच्या लेखातून दिसत असे. मी तुझेच गीत गात आहे अशी डोळयांनी हसणारी आपल्यावर प्रेम करणारी, भातुकली मांडायला उत्सुक, डाव मोडला म्हणून घायाळ, ती मुलगी तिच्या कथांतून झिरपून वाचकांच्याही मनात शिरु लागली. आशाताईचा एक वाचक, चाहक, वर्ग तयार होऊ लागला. ’’

तिच्या मनातली मुलगी बागडू लागली. चित्रपट परीक्षणाचे एक काम तिला मिळाले. मी तुझेच गीत गात आहे असा कालम ती लिहि‘एक दूजे के लिए ’ चे खूप सुंदर परीक्षण तिने लिहीले.  वाहवा मिळवली.

त्या कोवळया हळव्या वयात सहजीवनातील खाचखळग्यांची जाणीव तिला नसणे स्वाभाविक होते. माझे बहिणीवर प्रेम असते तर मी तिला खूप जपले असते. अपण आम्ही दोघे भाऊ बहीणीच्या बाबतीत फारशे हळवे किंवा काळजी करणारे नव्हतो. तसा विचार केला तर स्वत: पलिकडे आम्हाला विश्वच नव्हते. ताईच्या लिखाणाला मात्र एक हेवा वाटावा अशी झळाळी व पोत चढत होता. काळपुरुष हसत होता. काळाचे वाळूचे घडयाळ कालकुपी हसत होती. साठे म्हणाले मधूर दंश या त्यांच्या कांदबरीत काही वाक्ये आहेत ती अशी..

गाव मागच्या मागे पडला. पूर्वीच्या मैत्रिणी आठवल्या, जुन्या नोकऱ्या आठवल्या ज्याची तुलना होणे शक्य नाही. विसरुन जा, विसरणे सोपे असते का? जन्म जातो पण त्या विसरता येत नाही. त्याच त्या जखमा किती काळ चिघळत रहाणार? त्याच त्या दु:खद अत्याचाराबददल किती बोलणार? पण ज्याला बाण लागलेला असतो तो घ्यायाळ असतो त्याला विसरता येत नाही.

सोडेल बाण त्याला, कसे कळावे. हदयात रुते ज्याच्या, त्यालाच दर्द ठावे.

तडजोड म्हणजे काय? तर म्हणे ती वाट विसरुन पुढे जावे. पण काही वाटांवरुन पुढे निघून आल्यावरही माणूस मागे वळून पाहतो. अश्रू पुसतो पण वळून पाहतोच. गाडीच्या गतीमध्ये असे काय असते की विचार गती घेतात व उलटया दिशेने पळतात, भूतकाळात जातात –

हर कदमपर उधर मुडके देखा.   उनकी महफिलसे हम उठ के आये.

नोकऱ्या सोडल्या, कंपन्या बदलल्या कधी प्रगतीसाठी कधी गाव मागे पडले व दुसऱ्यां गांवी आले म्हणून. त्याची महफिल चालूच राहीली. त्यांचा थाट, त्याची पहाट, त्यांची ती आरसे, महालातील कुजबूजीची सम गाणी आठवली. रातराणीचा गंध, मारण्याच्या रागा ताना, सरगम, आलाप, दीप रंगाचे उत्सव, त्याची महफिल सजत होती, बहरत होती, रंगत होती. त्याच्या ऐश्वर्याला बहर आला होता. सन्मानाचे डंके त्याच्या नावाने झाडत होते. त्यांची पूजा, त्यांची आरती, त्याचीच चर्चा त्याच्याच गोष्टी, प्रत्येक पा ऊ ल पुढे जातांना मागे ओढत होते. राहीले ग दूर घर माझे गीत गात आहे मी वेदनेचे

प्रत्येकाचे एक रुपरंगाचे तरंग रुप असते. व त्याच लेव्हलवर तो लिहू शकतो.

भूली हुई यादों मुझे इतना न सताओ, अब चैनसे जीने दो! असे तेच ते किती घोटणार, रडून रडून किती रडणार! उतू जाणाऱ्या दुधाची साय बाहेर पडली व खूपच दर्दभरे लिखाण घडले. आता मला चैनसे जीने दो. म्हणून त्यांना वेगळे लिहा. संपादकाने दम दिला. पण मागणी नुसार लिखाण येत नाही. चैनसे हमको कभी आपने जीने न दिया.  माझ्या मनात एक अपघातात जखमी झालेली मुलगी चढते. ती चढली की  तिची गाणी ऐकवत बसते. संवाद करते. मी तुझेच गीत गात आहे मला जे सांगायचे आहे ते मी लेखनातून व्यक्त करते. कुणाला वाचूनही दाखवते. कुणी हसते, कुणी नावे ठेवते. एक स्फुल्लिंग आहे व चेतवावा लागेल. त्यासाठी प्रयत्न करते आहे. यश देवाच्या हाती. एखादया डावानंतर क्षणभर विश्रांती असे म्हणून थांबते. वाटते असे बरेच दिवस काही स्फुरले नाही. प्रतिभा गंजली की काय? काही अतिशय उच्च साहित्यमूल्य असलेल्या लेखकांचे वाचले कि वाटते असे आपण त्यांच्या मानाने अगदी सामान्य लिहीतो आणि मग मी हिरमुसली होऊन बसते. निराश होते. उन सावलीचा खेळ चालूच रहातो. साने गुरुजी हे माझे आवडते लेखक आहेत. मी गीत गाते आहे पण काही काळ चमकून नंतर आपण निनावीपणा च्या अंधारात गुंतून जाऊ ही भीती वाटते. पोटासाठी नोकरी करावीच लागते. पण लिहीणे हा माझा छंद आहे. ब्रेनस्टॉर्मींग झाले कि मी लिहीते लिहायचे म्हणून नाही तर ती माझी गरज आहे म्हणून. मेड टू ऑर्डर लिखाण मला जमत नाही असे नाही. पण या विषयावर लिहा सांगतातच लिहीणे मला हॉटेलमध्ये डोसा ऑर्डर करुन बनवण्यासारखे वाटते. अर्थात, काही शब्द असे असतात की त्या शब्दांच्या गंधाने भारुन मी लिहीते. उदा. रानफुले, ती वाट, ती वळणे, तो गंध व अचानक निनावी सुंदर फुल दिसणे त्या विषयावर मग लिहावेसे वाटते.

रानफुलांची हाक येते व मदतीला धावून येते अनामिक प्रेम! मनात दडलेले.

साठे म्हणाले कामावर असताना नेहमी वाटायचे लिहावे. कधी वाटे मस्तपैकी कादंबरी लिहावी. त्या खास कार्यक्रमाच्या ध्येयासाठी रोजचे नोकरीचे काच नकोत. निवांत रम्य निसर्ग सानिध्यातील एखादया ऐतिहासिक वाडयात जावे. तिथली हवा श्वासात भरावी. राज्याच्या

सरदारांच्या पदस्पर्शाने भारलेल्या त्या कातळांवर पसरावे त्यांचा स्पर्श जाणून घ्यावा. पण ४ दिवस फुरसत मिळायचे वांदे होते. आता तुमच्या हया लिखाणामुळे माझी ईच्छा पूर्ण होत आहे.

लेखकाला पोट भरायला पैसा लागतो व तो हवा तर नोकरी करावी लागते. स्ट्रगलरची अनेक वर्षे पोटाच्या आगीसाठी वाया जातात व देश उत्कृष्ट साहित्याला मुकतो.

साठेंना आदित्यराजेंनी गावाबाहेरच्या शंकराच्या मंदिरात नेले. जरा विसावू या वळणावर असे एक कात्रण साठेंनी दाखवले.

## ७ जरा विसावू या

''तुजविण शंभो मज कोण तारी. '' म्हणत पायऱ्या कशाबशा चढल्या आणि फतकल मारली. छातीत धडधडत होते. दम लागला होता. क्षणभर डोळे मिळले. डोळयासमोर शंकराची मुर्ती आणली आणि डोळे उघडले समोर निळे शार आकाश पसरले होते. मध्येमध्ये पांढरे करडे राखाडी आकाशी चंदेरी ढग तरंगत होते.

रोजच्या धक्काबुक्कीच्या आयुष्यातून पाच मिनिटे तरी वेळ काढून ह्या मंदीराला जरुर भेट द्या. गर्दी नाही, धावपळ नाही. खंडया उठ, विडी पेटव असा आवाज करणारा खंडया पक्षी. कुठेतरी ओरडणारी, कोकीळ, झाडांची सळसळ एक छानपैकी वाद्यवृंदच जमलेला असतो.

कितीतरी दिवस आपण नोकरीचे हजेरी पत्रक पकडण्यासाठी केलेल्या पळापळी. कुठे निवांत गेलोच नव्हतो जरा विसावू या वळणावर म्हणत बसूया.

पूर्वी म्हणायचे, माणसाच्या घडयाळाच्या शोधाने हृदयविकार त्याच्या मागे लागला. तसा मोबाईलचा शोध लागून मेंदूचा ताण मागे लागला असे मला वाटते. अर्थात यात शास्त्रीय आधार नाही. पण छान वाटते

,,,,,,,

या लेखानंतर शंकर मंदीराचे भाग्य उजाडले. पर्यटक त्या मंदीरात गर्दी करु लागले. पर्यावरणाचा एक कार्यक्रम कव्हर करायला आशाराजेंना संपादकांनी पाठवले. नैसर्गिक गरजा पूर्ण व्हाव्यात. पण हाव नको. हा विचार आपण विसरलोच आहेत. भस्म्या रोग झाल्याप्रमाणे टेकडया कापून खडयात भराव घालून, समुद्र मागे हरवून नाले गटार व नदया बुजवून आपण बेफामपणे बांधकाम करत सुटलो आहोत. सुनामी, जलप्रलय, भूकंप, Global Warming कडे दुर्लक्ष करुन आपली वाटचाल चालूच आहे.

ही वाटचाल प्रगतीकडे आहे अशी आपली भ्रामक कल्पना आहे. पण या प्रगतिच्या वाटेवर पर्यावरणाचा ऱ्हास आहे.

पर्यावरण दिन येतो, एक दिवस पर्यावरणाचा, बाकी ३६४ दिवस, वर्ष ओरबडण्याचे, पर्यावरणाच्या नावाखाली नाटुकली, नृत्ये बसवणे, जेवणे व कचरा करुन निघून जाणे हे 'निसर्ग वाचवा आंदोलना' चे रुप नसावे.

७ मार्चला महिला दिन होतो. त्या दिवशी महिलांच्या प्रश्नाकडे लक्ष वेधावे. सर्व दिन -दिवस प्रबोधन करणारे व्हावे. एका स्त्रीचे दुसऱ्या स्त्रीशी नाते कसे असावे तिच्याशी तिच्या ओझ्यांशीसुध्दा संपर्कात असावे.

१८/०४/ ला जागतिक वारसा दिन साजरा होतो. त्या दिवशी त्या विशेष दिवसाचे प्रयोजन करण्यात असा अर्थ असतो की त्या दुर्लक्षित गोष्टीकडे लक्ष द्यावे, त्या उत्सवाने जागरुकता यावी. मार्च २८ ला जागतिक वसुंधरा दिन असतो. त्या दिवसाबददल विषयाबददल चर्चा व सुसंवाद व्हावा त्या प्रश्नाकडे लक्ष वेधावे, टोप्या, पिना, पेन व पुस्तिका विकून पैसे मिळवणे किंवा त्या कार्यक्रमात राजकीय हेतू साधणे योग्य नव्हे. वर्षभर दुर्लक्षिलेल्या गोष्टींना एका दिवशी मान देवून आपण तारांकित करतो. त्या विषयावर चर्चा करुन प्रश्न सुटत नाही. त्यादिवशी काहीतरी निवेदन तयार करावे व द्यावे निश्चय करावा. झाडे लावावी. करमणूक कार्यक्रमांनी feel good वाटणे व from rag to riches ने आनंद मानने. लोककलांचा समान वारसा हवा, पण सत्याकडे डोळेझाक नको. वातावरण बदल वर चर्चा हवी. त्यादिवशी मिडीयाने त्या विषयाकडे लिहून ध्यानाकर्षण करावे व वर्षभर त्या विषयी काम होते का ते ही बघावे. तशा योजना आखाव्या, एक डायरी घ्यावी व पुढच्या वर्षी त्यातील काय काय साध्य झाले हे बघावे. झाडे लावली पण जगवली का? किती जगवली? दरवर्षी त्याच त्या खड्डयात वृक्षारोपण केले जाते व सेलिब्रिटीचे फोटो त्या वृक्षारोपणात येतात. झेंडावंदनाची जागा असावी तसे झाड लावायची जागा असते? ज्यांना पर्यावरण जागृतीचा विचार असतो त्याला हक्क किंवा विशेष स्थान नसते. लेखक मनाने विचारांनी श्रीमंत असतात. पण आर्थिकदृष्टया यथातथाच असतात!

गर्भाशयात पहिल्या स्त्री गर्भाची हत्या झाली. तेव्हा कुणीही कधी विरोध केला नाही. उलट मुलगी नको हा अहंकार समाज बाळगत होता. मुलगी झाली म्हणताच त्या बाळाच्या आई पासून

घरचे सर्व नाराज व्हायचे. मुलीचे नाव नक्षत्राचे ठेवा, सत्तावीस नक्षत्र आहेत हो. नंतर दुसरीला मुलगी झाली, नदीचे नाव ठेवले की म्हणायचे नद्या शंभर आहेत हो. मुलगा झालेली स्त्री म्हणायची माझा सूर्यकांत, माझा अदित्य, सूर्य तो..... शंभर सूर्य थोडीच असतात.

पथनाटये होऊ लागली. स्त्री च्या थोडयाशा श्वास घेण्याची ती सुरवात होती. मुलगी झाली हो नाटकातून त्यावेळी स्त्री मुक्तीचे वारे वाहताना दिसू लागले. मला उगीचच ताई इस्टेट मागेलसे वाटू लागले. गैरसमज हा नात्याचा शत्रू असतो व असेही माझे ताईवर कधीही प्रेम नव्हतेच. ती माझ्यापेक्षा वरचढ आहे याची असूयाच होती. सोन्याभाऊ साहेबांचीच आम्ही मुले. पण किती वेगळी होतो. प्रगतीचे एक नवे रुप आहे ई-पेपर! मोबाईलवर येणारा इ-पेपर न कोई पेपर हवा न्यूजपेपर! म्हणजे फक्त प्रगती ज्या मूठभर लोकांपर्यंत पोहोचली त्यांना इ-पेपर मिळेल. पण वर्तमानपत्र सर्वसामान्यांपर्यंत पोहोचेल. ह्या इ-पेपरला विरोध करु नका. पण सामान्यांचा वर्तमानपत्र डेली न्यूजपेपर बंद करु नका. तसाच साध्या सामान्य माणसांच्या आयुष्यात येणारे प्रेमळ नाते बहीणीचे ते बंद करु नका.

साठेंनी लिहायला घेतले. एक नवीन लेख दिला.

माझ्या गोदावरीचे पाणी ह्या पुस्तकाच्या जन्माची ही गोष्ट. हृद्यातून रक्त टिपकल्या शिवाय उत्तम कविता बनत नसते. गोदावरी वाहती झाली. गोदावरीचे पाणी मुंबई महासागराकडे वाहू लागले. आकाशवाटेने श्रावण आला नाही. तरी पण मनात श्रावण येतो. कारण गोदावरीच्या नदीकाठी माझे बालपण गेले. मौल्यवान वस्तू जिथे सापडते ती जागा जशी आयुष्यभर आठवत राहते तसे मौल्यवान वस्तू जिथे हरवते ते क्षण ती वास्तू आयुष्यभर बेचैन करत राहते.

दक्षिण काशी - गोदावरी ही दक्षिण भारतातील सर्वात मोठी व पवित्र नदी आहे. गौतम ऋष्र्षींनी ही गंगा आणली म्हणून तिला गौतमी गंगा असेही म्हणतात. गोदावरी नदीच्या काठावर नाशिक पैठण व नांदेड ही तीन प्रमुख शहरे आहेत. ह्या नदीमुळेच नाशिक धार्मिक केंद्र बनले आहे. तेथे मंदिरे गोपूरे धर्मशाळा व संस्कृतिचा सुरेख संगम आढळत असे. पैठण शहरास प्रतिष्ठा

नगरी किंवा नाथांचे पैठण म्हणतात. दक्षिण काशी म्हणतात. पैठण जवळच जायकवाडी धरण असून ह्या धरणातून औरंगाबाद परभणी बीड नांदेड येथे पाणी पुरवठा होतो.

गंगेचा प्रवाह अंगावरुन गेल्याने गाय जीवंत झाली. गो-दावरी असे या नदीचे नाव आहे. गोदावरी व कादवा यांच्या संगमावर नंदूर माध्यमेश्वर पक्षी अभयारण्य आहे. गोदावरी नदीचे पाणी तीर्थ म्हणून वापरतात. कारण त्याने पित्त रक्ताचे आजार, कुष्ठरोगाचा नाश होतो व भूक वाढते. सिंहस्थ पर्वणीत सर्व नदया समुद्र क्षेत्रे अरण्ये व आश्रम गोदेच्या ठिकाणी निवास करतात असे ब्रम्हांड पुराणात म्हटले आहे.

कुंभमेळयात स्नान करायचे, गोड पाणी गंगेचे, कुष्ट जाते अंगीचे, स्नान करता गोदेचे, मन उमले सीतेचे

असे म्हणत एक भिकारी सकाळी सकाळी पावा वाजवित येत असे.

कुंभ चलो रे भाई, तुम भी चलो रे भाई, पुण्या कमालो भाई!

गोदावरीचा उगम त्रंबकेश्वर येथे ब्रम्हगिरीवर झाला. महाराष्ट्राच्या प्रगतीत गोदेचा फार मोठा वाटा आहे. ह्या नदीला प्रवरा, मुळा, वर्धा, वैनगंगा, प्राणही इंद्रावती व शबरी नदया मिळतात. शबरीसंगमावर भद्राचलम जवळ हीचे पात्र खूपच मोठे होते. त्रिंबकेश्वर कुशावर्त गोवर्धन जनस्थान प्रवारासंग निवासपूर ही तीर्थे प्रसिध्द आहेत. गोदावरीच्या विसिष्ठ वैनतेय व गौतमी या ३ प्रवाहामध्ये उमलापूर येथे थंडीमुळे फक्त रविवारीच स्नान करतात.

साठे सांगू लागले. आशाराजेंबरोबर लिव्ह रिलेशन बद्दलच्या एका शिबिरात मी हजर होतो. रुप बिलोरी उतरले की स्त्री नको? का? अर्थात या लेखात सभ्य सुसंस्कृत कोंडी झालेली समजूतदार स्त्री म्हणून नाईलाजाने ती करुन स्वीकारणारी स्त्री विचारात घेतली आहे. भावनिक खच्चीकरणाची हतबलता सहन करायची शक्ति स्त्रीमध्ये कमी असते. शरीरांची लढाई आधी मनात लढली जाते. मानसिक हिंसाचार पुढे युध्दाकडे नेतो. स्त्री च्या मनात द्वंद उठले तर ती प्रगती करु शकणार नाही. अजूनही खेडोपाडी शहरात फसणाऱ्या मुली आढळतात. कधी बेजबाबदार पुरुष शेपूट घालून पळतो.

एकटया पडलेल्या स्त्रीवर सशावर झुंड तुटून पडते तसे निराधार स्त्री वर झडप घालणारे पुरुष त्यांना पुरुष फक्त शारीरिकदृष्टयाच म्हणता येते. मी कसाही असो घरात श्रेष्ठ असे समजत असतात. कुणी नोकरही मालकिणीकडे त्या नजरेने पाहतो. कारण तो स्वत:ला स्त्रीपेक्षा श्रेष्ठ समजतो कॉलसेंटर मधील मुलींवरचे अत्याचार काय सांगतात?

करिअरहीन, उच्चपदस्य स्त्रीला तुच्छ मानतात. मग काय लीव्हइन रेग्युलर केल्यावर, अनेक बेब्यो पण अगतिक अनेक बंद दरवाजे महासागराच्या दिशेने उघडणारे स्त्री चे जगणे हैराण करणारे तयार होतील. नको लीव्हइनची संस्कृती भारतीय नाही.

लीव्ह इन रिलेशनशीप भारत छोडो, चले जाव ही संस्कृतीच्या स्वातं«याची लढाई आहे.

आशाताईच्या मनात नेहमीच एखादी कविता किंवा कथाघोळत असे. त्या कल्पनेत वावरुन ती वास्तवाची कटूता पचवायचा प्रयत्न करीत असावी. आम्हा भावांची लबाडी ओळखूनही दुर्लक्ष करीत असवी. विवाह म्हणजे विशेष वागणूकीचा हक्क किंवा निर्वाह असतो मग निभावून न्यायचे ते. मग नाते म्हणजे काय? न आते ने ते ते येत नाही ते ताईच्या बाबतीत भावंडांचे नाते तिला खडडयाकडे विनाशाकडे नेत होते.

रजनीराजे म्हणाल्या, ''ह्या शेजाऱ्यांत अर्थ नाही. खून झाल्यावर मेल्यावर साथ द्यायला येता. बेल बजाओ आंदोलन तरी करावे पण छे! ह्या बुळया माणसांकडून आशाच नाही. उद्या माझ्यावर वेळ आली व सितारामराजेंनी हा महाल बळकावण्यासाठी मला बाहेर काढेल तरी हे नातेवाईक गप्प बसतील. महालाची कागदपत्रे व तुमचे मृत्युपत्र करुन ठेवा. '' मी हो म्हणालो. आशाराजेंवर अन्याय करणाऱ्या रजनीराजे यांना मात्र स्वत:वर वेळ जर आली तर या रितीने न्याय आठवत होता.

रजनी राजे माझ्या मृत्यूची वाट पाहात होत्या. माझ्या मृत्यूनंतर जगायची हाव त्यांना होती. घरी सण होते. खंडोबाच्या टाकांची पूजा होती. पाहुणे जमले होते. रजनीराजेंनी आशाराजेंचा अपमान केला.

काय ताइराजे दिवा धरायचीसुध्दा एक पध्दत असते. माणूस दिवा धरतो तो प्रकाशाचा स्तंभ आधाराला मिळावा म्हणून. पण दिवा नीट धरला नाही तर हात भाजतो. दिवा हातातून गळून पडतो. तुम्हाला जनरीत कळलीच नाही. तुळस लावायचे दिवस गेले आता. घरोघरी बाटल्यांत भांडयात मनी प्लांट लावताता. दरवाजा जवळ भिंतीला धरुन किंवा मोठया झाडाला धरुन मोठया पानांचा मनीप्लांट असतो.

रजनी राजे वहिनी ताडताड बोलून निघून गेली.

मी अवाक बसून राहिले

घरातील एक नोकर मोलकरीण आत आली. मोलकरीण, ''बघा बाई कशा बोलतात हो'' म्हणू लागली. पण मी तिला गच्चीत रजनी राजे वहिनीबरोबर चहाडया करताना पाहीले होते. अर्थात मी बोलो न बोलो, राजे असे बोलले असे बेमालूम खोटे बोलण्यात ती तरबेज होती, आपले असे नशीब कि आपल्याला कधीच नोकर धार्जिणे नसतात. दुसऱ्या दिवशी कंटाळा आला. एकटीला रहायचा तरुण स्त्री ला नवरा हवा म्हणून रजनीराजे निघून आली. ती जाताना सोन्याभाऊदादाराजे खूप रडले. माणूस खूप पक्षपाती असतो. एखादयात का गुंततो व वेडा होतो सांगता येत नाही. कुठलीही सेवा न करणारी रजनीराजे वडिलांची लाडकी होती. ती गेली म्हणून सोन्याभाऊ दादाराजे टीपं गाळत बसले की आता आपण जगणार नाही म्हणून रडत होते.

बाजूच्या बंगल्यातली एक चुगलखोर शेजारीण गप्पा मारायला बसायला आली. ही नसली तर मी मुलांकडे गेलो असतो म्हणून सोन्याभाऊ दादाराजे तिच्याजवळ रडू लागले. आशाराजे शांतपणे झाडांना पाणी घालत होते. सितारामराजे व त्यांची पत्नी व रजनराजे वहिनी नेणार नाही हे सोन्याभाऊ दादाराजे दादांना माहीत होते. फक्त आनंदपूरच्या महालातच सोन्याभाऊंची जागा होती. दोन्ही मुले लबाड होती. तरीही त्यांचा ओढा मुलांकडेच होता. मुलांकडे स्थान नाही. याचा सोन्याभाऊ दादाराजेना कमीपणा वाटत होता. रात्री सोन्याभाऊ दादाराजे आजारी पडले.

आशाराजेनी त्यांचे कपडे बदलले. १९ वषाची मुलगी ती तिच्या वडिलांचे पुरुषांचे शरीर तेही केवळ शरीर म्हणून बघून त्यांचे हागणे-मुतणे काढत होते. तिला पुरुषांचे आकर्षण नव्हतेच. पण जे शिल्लक असेल नसेल ते ही त्या काळातील सेवेने मरुन गेले. वडिलांचे केस कापणे, दाढी करणे ही त्या करु लागल्या.

आशाताईने त्यावेळी लिहीलेले एक नियत कालिक, पत्र व कागद साठेंनी आनंदाने दाखवला.

## ८ किल्ल्याचे बुरुज कोसळले.

झुंबरांना मालीन्य चढले, काळजाचे दु:ख माझे टांगले. शब्दाच्या रांगोळीतून देवळाच्या घंटांमधी देवळातून वाजले. जुन्या गोधडीचे जीर्ण पदर विरले, उरली फक्त लक्तरे विस्कटलेली रांगोळी उध्वस्तखोरे पैशावरुन वितुष्ट, वादविवाद महत्वाची वस्तू हरवणे, गाडी चुकणे अशा घटना प्रत्येकाच्याच आयुष्यात घडतात. प्रामाणिक नोकर फक्त चित्रपटातच मिळतात. चतुरपणे वादविवाद टाळून मनमुटाव करुन भांडणे मिटवणारे वरिष्ठ ज्येष्ठ नाटकांतच असतात.

प्रत्यक्षात लोकं इतरांचा तमाशा एन्जॉय करतात. लोक म्हणजे तरी कोण?

आरसा पहावा पाण्यात नखरा करावा मनात
फुगडी खेळू फुगडी मामा घेतील लुगडी
फुगडी खेळू दणदण रुपये वाजवू खणखण
मामा आति अति श्रीमंत याची मुलगी एकदम चंट
सूर्य मंदीरातील रथ होता तो क्षण बिळामध्ये संथ होता
आठवडी बाजारात माल होता जत्रेमध्ये जाण्याला ताल होता
भाऊ तेव्हा भावखाऊ नव्हता. भावंडांमध्येही साधेपणा होता
स्वप्नांना माझ्या पंख होता पर्यावरणांचा डंका नव्हता.

भांडण होऊ नये म्हणून काय करायचे? सहनशक्ती वाढवायची, चार भिंतीतील भांडणे तिथेच ठेवायची. प्रेमा ऐवजी द्वेष नको, दुसऱ्याचा विचार करा, प्रेम हा स्थायीभाव असल्याने आपण स्त्रिया एकत्रितपणे माणसे जोडू अथवा तोडू शकतो. पूर्वी समाजात त्या अकारण उभ्या अबोल्याच्या, दुराव्याच्या, दुर्लक्षाच्या भिंती नव्हत्या. आता आपण खामोश झालो. शिक्षणाने बोथट झालो. जो समाज प्रश्नांना घाबरतो, प्रश्न झाकतो ते सोडवणार कसे?

जर बोलले तर? मला काही सांगायचेय, पण कसे बोलू, काय बोलू? मी एकटी पडेल. जरा लिहून बोलून समाजात योग्य वाटेवर जाण्यात फरक पडणार असेल तर बोला, प्रेरणा द्या. पूर्वी पाणवठयावर एकी होतो. दलित चळवळ अशीच पुढे आली. इतिहास आपण सारे घडवू या!

तुम्हीपण या चळवळीत सामील व्हा. भूक बळी किसान आत्महत्यात जागृति करा, तुम्ही इतरांशी वागाल तसे मुले वागतील. खरे संस्कार हवे, आदर्श हवा. बारीक सारीक मुददे हवे म्हणून मोठा मुददा सोडून देता येतो का? सर्व क्षेत्रातून एक समान धागा संवेदन क्षमतेचा प्रगतीचा समाधानाचा संस्कृतीचा असतो. आशाराजेंनी बऱ्याच कविता म्हटल्या. काही इतरांच्या काही त्यांच्या होत्या.

स्वत:ची क्षमता, मोकळे आकाश
मी एक पक्षिण आकाशवेडी
अशी झेप घ्यावी असे सूर गावे
ढगांचे अबोली भूरे केशरी रंग
माखून घ्यावे अंगावरी
प्रयत्न करुन यश आले नाही तरी
हसून घ्यायचे स्वत:वरी

दूरदर्शनची नशा आहे. त्याने मनात भिंती बांधल्या बाई नवऱ्याला सांगते काम कर पण हिने काय मिळवले? भांडण! वीस वीस तास काम करणाऱ्या स्त्रीया गुलाम डबलशिफ्ट करणाऱ्या? मी मिळवती? कि घालवती? Life is slow process it will take time. परीणाम, चर्चा व लेख एकच दिवस वाढदिवस असतो पण तो नावाचा असतो. पटवणे, शिका. जगी बोलबाला होवो न होवो, प्रयत्न करीत रहा. बक्षिस हवे म्हणून अडकलात तर कलेचा पक्षी उडून जाईल. एका मुलीने नृत्य केले.

काळी पोतमणी घे, बाळाला ताईत, काजळ घे
ये ग शुभा बीबा घे, तुझ्या लाडक्या छबीला झुबा घे
मीरा ये, तारा ये, तुझ्या गोधडीला सुई, दोरा घे

साठेंनी पुढचा लेख दिला.

## ९सगळे ठिक आहे.

काही लेख वाचून अनेक विचार मनात येतात ते न लिहीता बुडबुडयाप्रमाणे जिरुन जातात. लोक विचारतात. इतकी वर्ष तुम्ही का लिहिले नाही. मला पण कधी नवल वाटते. इतके दु:ख, इतकी निराशा वेदना मी इतकी वर्ष कुठे दडवून ठेवली होती. दाबून ठेवली होती. आता स्फोट होऊन बाहेर पडावे तसे हे विचार बाहेर पडताहेत. गहने बनवाओ, गहने तुडवाओ, साडीयोंके सेलमे, ड्रेसके सेलमे जाओ यापुढे स्त्री चे रुप असते हा विचार कधीही कोणी केला नाही. मला माझे विचार मांडायची संधी दिली गेली. मी पुन्हा कदाचित इतके मनमोकळे लिहू शकणार नाही. (स्त्री म्हणजे आखूडशिंगी बहूदूधी म्हैस. तीला स्वत:ला अंघोळीला वेळ मिळाला नाही तरी चालेल पण तीने नोकरी करावी, पक्वान बनवावे, आवाज न करता मरावे. )

पुन्हा मला एवढे विषय एवढी संधी एवढे विचार लिहीता येतील की नाही हे सांगता येत नाही. लिहीता लिहीता कधी कधी रस्ता चुकला म्हणून ठणकावणारे टीकाकार मित्रही हवेच ना! पराभूतांना उज्ज्वल भविष्याची आस दाखविणारे साहित्य मी वाचू लागले.

नैराश्यावर उपाय म्हणून आपले दु:ख लिहून काढा असे मी वाचले होते. पण मी लिहीले तेव्हा मनाच्या गहराईतील अनेक विचार बाहेर आले. वयोमानाने विसरलेल्या काही घटना बाहेर आल्या. पूर्वी एका लेखात मी संपूर्ण संपून जाईन अशी भिती मला वाटायची. आपण कशा कशाला घाबरातो ना! कायम निगेटीव्ह विचार मांडते म्हणून मला निराश करण्याऱ्या लोकांनी कधीही हा विचारच केला नव्हता की अफूच्या धुंदीप्रमाणे आपण बाळगलेली धुंदी, पैशाच्या, यशाच्या सत्तेचा कैफ, पैशाचा खोटा आधार अध्यात्माचे खांब कमी पडत आहेत. कुठेतरी सामान्य माणसे, अनेक लेखक निराशेच्या गर्तेत जातात कारण हात आपल्याला सावरायला कमी पडताहेत. आपण पामर एका क्षणी यांना आपल्या मुखवटयाच्या फसवेपणा कळतो. कायम दुलक्ष करुन आपण काळाला सोकावत असतो. इतरांचे प्रश्न म्हणून दुर्लक्ष करतो व तो प्रश्न

आपल्यावर येतो तेव्हा मदतीची अपेक्षा करतो. मैत्रिणींनो तुम्हीही तुमचे विचार लिहा. मी तुमचेच गीत गाते आहे  मग पहा किती विचारांचे तरंग पाठोपाठ उघडतात.

प्रत्येक विचार नवीन असतो. शिवाय सामान्य माणसाचे सामान्य विचार प्रातिनिधीक ठरतात. लपवून लपवून आपण आपली दु:ख किती काळ लपवणार? घराचे दार बंद करुन सूर्याला उगवण्यापासून थांबवता येत नाही. प्रगती सूर्यासारखी असते.  मी मिळवती ह्या अभिमानाबरोबर गाठोडयात बांधून आलेले हेवे-दावे, द्वेष, अपमान, असमानतेचे दु:ख आपण कायम वाहतो. घर संसार नोकरी सर्वत्र आपण उत्तम पातळी मिळावी म्हणून प्रयत्न करतो. व एक दिवस कळते हे सर्व फसवे होते.

सर्वच जण पाठीमागे प्रत्येकाबददल वेगवेगळे बोलत असतात. टीका करतात ही अशी संस्कृति फक्त मालिकात व सिनेमातच नसते. पूर्ण समाजात असते. त्याचेच प्रतिबिंब साहित्यातही दिसते.

कुछ तो लोग कहेंगे, लोगों का काम है कहना
मन शुध्द तुझे तुज रे गडया भिती कुणाची
तू उचल लेखणी, साथ होईल तुला रे शब्दांची

अर्थात म्हणणे सोपे असते पण फसवणूकीने शरीरावर परिणामही होतोच.

गणपतीला २१ दुर्वांची जुडी वाहतात. तशी ही २१ सुमने मी माझ्या लाडक्या वाचकांना समर्पण केली. साठेंनी सर्व सुमने दाखविली

## १० सरणार कधी रण

**'आयुष्य म्हणजे रणांगण'** अशी उपमा दिली जाते. पण आयुष्या रणांगणाहून निराळे हवे. सुंदर शांत. पण होते काय? अहंकाराची भांडणे, माणूस दुसऱ्या माणसाशी भांडून दु:खी होतो. माणूस भांडला नाही तर सुखी होईलच असे नाही. पण अधिक दु:खी होण्यापासून जरुर वाचेल. लहान घरे, लोकल गाडया, पाटर्या हया सर्व ठिकाणी खूप आनंदाच्या क्षणीही भांडणं काढून रंगाचा बेरंग करुन आनंद नष्ट करतात किंवा यादवी युध्द सुरु करतात. आधी आत पहा. म्हणजे अध्यात्म असे मला वाटते. मौलिक अध्यात्मिक मोडतोडीतून माणूस आध्यात्मा कडे वळतो. हुरहुर वाढते व मनशांतिचा शोध घेतो. मी पाषाण मी पालथा घडा वर्षानुवर्षे कठोर अनुभवांनी जगाने शिकवलेली दुनियादारी मी शिकू शकले नाही. शब्द ओलांडून अर्थ काढला नाही. रस्त्यातील ४/५ खडयांतील मोठया खड्डयात किंवा एकमेव खड्डयात माझा पाय जातो. माझ्या मनात असतो रात्रीचा अंधार अनेक काजव्यांनी उजळू शकत नाही. मग मला भर उजेडात कसे होत असेल? शुभशकुनाच्या रेषा वाहून तातात व चक्रव्यूहाप्रमाणे गोंधळवतात. डायरी लिहावी, म्हणजे लिहीते. पण भरकटत जाते. डायरी म्हणजे कुणा अनाम वाचकाला उददेशून लिहीलेले दीर्घ पत्र असते. मनात दडलेल्या त्या कुणालातरी लिहीलेले असते.

जो कधीच आला नाही, जो कधीच अस्तित्वात नव्हता. प्रतिसादासाठी लिहू नका, म्हणतात. मग प्रतिसाद महत्वाचा असतोच. माझे लिखाण कसे असते जुनी गोधडी, बेस्वाद जेवण, शिळे पक्वान, अंगभरुन वस्त्र पण जुने! समुद्राप्रमाणे खारे पाणी व तहान, गूढ जीवन असे, मला पैसा कुठे वाचवावा कळले नाही. तसे खर्च करायचेही कळले नाही. तसे लिहावे कि न लिहावे असे माझ्या लिखाणावर प्रश्नचिन्ह येते. अस्तित्वाचे, झळाळींचे प्रतिमेचे प्रश्न उटतात. नारळाच्या फांदया तोडल्यावर नारळ जसे बोडके वाटेल तसे आयुष्य त्या कुणा वाचका वाचून बोडके असते. काही काळ अपयशाने नैराश्य येते. पण खचून न जाता माणसाने पुढे पुढे जायचे असते. हातातून सुटण्या संधी हाती उरली कळकलेली चांदी गप्प बसून श्वास कोंडते हृदयात अडकलेले निखारे.

चित्रपट परीक्षणाचा एक कागद सार्ठेनी दिला. हा देश संस्कृतीसाठी प्रसिध्द आहे. त्यावेळी हीन चित्रपटांनी समाजात वाईट प्रवृत्ती आणल्या. चित्रपटातून संदेश घेण्याऐवजी अशिक्षितांना अभिरुचीपूर्ण करमणूक समजत नसल्यामुळे चित्रपटातील वाईट गोष्टी व अनैतिक प्रकार कसे स्वीकारले जातात ते मीरा रोड च्या घटनेवरुन कळले. इंटरनेटवर माहीतीचे महाजाल असतांना इंटरनेट चा उपयोग अंगठा छाप माणूस त्या कारणासाठी करतो ह्यावर देशाची प्रगती म्हणावी की दुर्दैव म्हणावे? हक्कांची खेचाताणी व क्षूद्र फायद्यासाठी, अहंभावासाठी भांडणे व व्यभिचार या पायऱ्यांनी चित्रपट वर वर चढत रहातो व नीतीमत्ता खाली खाली जाते. प्राजक्ताची फुले कोमजण्याचे कुणी दु:खच करत नाही व उलट प्राजक्ताचे झाड लावणेच बंद करते. स्त्रीभूण हत्या यातून सुरु होतात का?. आज हा माझा शेवटचा लेख आहे. त्यामुळे मी माझ्या मित्र-मैत्रिणींना सांगते - तसेच हे गीत मी गात आहे.

## ११ रिकामा कोपरा

सोन्याभाऊसाहेबांचा मृत्यू झाला. आशाराजे अनाथ झाल्या.

खरे वारसदार सीतारामरावराजे  व मी आदित्यराव आलो, प्रेत उचलले गेले. फारसे कुणी रडले नव्हते. फक्त तीच आशाराजे पोरकी निराधार झाली होती. तो रिकामा कोपरा उरला, वडील वारले, भावांना आनंद झाला. ती मात्र उध्वस्त झाले. माणूस गेला. दहा दिवस दिवा लावला व आठवण जागवली. वडिलांच्या मृत्यूनंतरचे तेरावे झाले. आहुती झाली. भटजींनी मंत्र म्हटले. घरात उदकशांती झाली. भटजींनी पैसे कनवटीला बांधले. शिधा उचलून पिंड अंगणात विसर्जित केले. ते गव्हाचे व तांदूळाचे उंडे खायला अनेक कावळे व पाणपक्षी टिंवटींव करीत धावून आले.

सर्वजण घरी आले. आमचे वडील गेल्याला फक्त तेरा दिवस व दहा तास झाले होते. आशाराजेंचा आयुष्यातील एकमेव आधार संपला. बाकी नातेवाईक होते. भावंड होती. पण भक्कम असे वडिलांचे छत्र हरपले. तरी तसेच जीवनगीत ती गात होती.

जगने छीना मुझसे मुझे जो भी लगा प्यारा

सब जीता किया मुझसे मै हर दम ही हारा

आकाशका सूनापन मेरे तनहा मन में

अंगणातील नळावर पाय धुवून आशाराजे ती नारळाच्या पाशी असलेले तुळशी वृंदावना जवळ बसून राहील्या. आत जायला हिंम्मत होईना. मृदपाकखान्यातील घरातून साबूदाण्याची खिचडी केल्याचा वास येत होता. वहिनीराजे जोऱ्यात हसण्याचा आवाज आला. पाठोपाठ भाऊ दिलखुलास दाद देताना दिसला. पाहुण्यांची पांगापांग झाली होती. ज्याला त्याला स्वत:चे विश्व असते. चुलत बहीणींच्या मुलांच्या परीक्षा होत्या. त्या गेल्या. मामामामी निघून गेले. ती पूर्वीही एकटी होती, पण घरात एक पुरुष माणूस होता ज्याचे तीला संरक्षण होते. मृत्यू म्हणजे नक्की काय? कालपर्यंत तो राजा असलेला माणूस ते साम्राज्य सोडून जातो. न सांगता न पूर्वसूचना देता? कालपर्यंत ते याच बागेत हिलचेअरवर खुर्ची टाकून लूकलुकत्या डोळयांनी रस्त्यावरुन जाणारे येणारे पै पाव्हणे निरखून बघत. खेळणाऱ्या मुलांच्या खेळाचा मन:पूर्वक आनंद घेत

बसलेले ते सोन्याभाऊदादा आता तिथे नव्हते. पण तिच्या व्यतिरिक्त कुणालाही फरक पडला नव्हता. का पडावा? ८० वर्षाच्या म्हाताऱ्याच्या मृत्यूचे त्यांना दु:ख असायचे कारण नव्हते. भातुकलीचे डाव मोडतात, मैफल सुनी सुनी होते.

''माझ्याच पोटी येतील दादा. मी त्यांची लाडकी होते''

रजनीराजे सांगत होती, ''मला दुसरा चान्स घ्यायचा आहे. दोघा भावंडांचे प्रेम निराळेच असते. '' स्वत:चे भावाबरोबर पटत नाही. माझ्यात व भावांत भांडणे लावते पण रजनीराजे ला मात्र २ मुले हवी होती. कारण भावंडप्रेम. म्हणजे नऊ महीने रजनीराजे गरोदर म्हणून कौतुक व पुढे सहा महिने बाळंतीण म्हणून बसून राहणे. सर्व सेवा करुन घेणार व आशाराजेंना म्हणणार, ''तुम्हाला काय कळणार बाळंतपण किती अवघड असते?''

दुर्दैवाने तिलाच इतके का मारावे?

पण निदान रजनीराजे च्या बाळंतपणामुळे आशाराजेंना एक वर्ष ह्या घरी रहायला मिळेल व सोबतही होईल याचा त्यांना आनंद वाटला असावा.

वडिलांच्या मृत्युनंतर आशाराजे जास्त खचल्या. असेही त्यांच्या प्रत्येक लिखाणात मृत्यूचे सावट असे. तेराव्याच्या जेवणाला कुणालाही दु:ख नव्हते. जणू तो जलसा होता. पार्टी होती. आम्ही आशाराजेला गायचा आग्रह केला गेला. तिने म्हटलेले गाणे मला आजही आठवते.

सुन्या सुन्या मैफलीत माझ्या

तुझेच गीत मी गात आहे.

पाहुणे गेल्यावर आशाराजे समाधीजवळ जाऊन बसल्या. मी दालनात आलो आता मी मालक होतो. पूर्ण उंचीच्या आरशात उभे राहून राजाचा वेष घालून दागिने घालून मी खुषीत हसलो. आता राज्य माझे होते. वर्तमानपत्रात जाहिरात देवून मी तुम्हा मुलांना इस्टेटीपासून दूर करीन ही धमकी आता सोन्या भाऊ पूर्ण करु शकणार नव्हते. मी खुदखुदलो. सोन्याभाऊराजेच्या फोटोवर मृत्यूची तारीख लिहिताना मात्र खूष झालो होतो. नुकतेच वाच्छानीचे लग्न झाले होते व तो मॉरिशसला गेला होता. आता आशाराजेंना नैतिक आधार दयायला कुणीही नव्हते. आता राज्य माझे होते. कुठले तरी गाणे मी ओठातल्या ओठात पुटपुटत राहतो.

आयुष्य म्हणजे सुख! भाव सुख भोगत केलेली निर्वाणयात्रा मी किती भाग्यवान!

त्याच वेळी सतीच्या समाधीजवळ आशाराजे रडत होत्या.

सुन्या सुन्या मफलीत माझ्या..............

पैसे अडके, दाग दागिने आम्ही भावांनी कधीच हडपले होते. घर, प्लॉटस्, जमीन नावावर करुन घेतली होती. वयाची लिहाज न ठेवता हा कोपरा तुमचा ही ३ X ६ ची कॉट तुमची. बाकी तुमचे राज्य खालसा झाले असे आम्ही सोन्याभाऊंराजेना म्हणालो होतो. वडिलांची तब्येत बिघडल्यावर सहया करुन घेवून त्यांची तनखा, पेन्शन आम्ही काढून आणली होती. आज हा थाट त्या व्यक्तीच्या जीवावर होता. सोन्याभाऊराजेसाठी कुणाजवळ २ अश्रूही नव्हते. आशाराजेंनी त्यावेळी कसे दिवस काढले असतील? लवकरच रवानगी महालाबाहेर होणार होती. वकील मृत्यूपत्र घेऊन आले होते. धूळ माळगढीचा महाल आईसाहेबांनी आशाराजेंच्या नावाने केला होता. माझा संताप झाला.

मी उसासा सोडला. गार हवा सुटली होती. चंद्र बरोबर अर्ध्या भाकरी सारखा दिसत होता. चंद्राच्या प्रकाशात वृंदावनाजवळचा तो सोयरसुतकाचा दिवा होतो जो उठून दिसत होता. मनाला सांगूनही मन घरात जायला तयार नव्हते. कुणाबरोबर तरी दु:खवटा म्हणून ४ दिवस जायला हवे होते. खूप चहा प्यावा अशी तल्लफ आली. पण मला त्या महालात घरात जावून चहा करुन घेण्याची इच्छा नव्हती. आशाराजेंना कशाचाही हक्क नव्हता. खरेतर मुदपाकखाण्याला आज सुटटी होती. पण मी काजू खाऊन मजा केली. हातातून कळ आली. सकाळी गल्लीतल्या साळकाया व माळकायांनी तिला दु:खवटयाची अंघोळ घातली. डोळयात शिकेकाई घालून आग झाली. केस तुटले? हे कसले सोपस्कर? अंघोळ घालणे? का शोधले असतील असे संस्कार? मी उठून गाडी काढली व रडत असलेल्या आशाराजेंना सोबत घेतले गाडी समुद्राच्या दिशेने चालू लागली. आशाराजेंना समुद्रावर निराधार सोडून परत यायचा माझा बेत होता.

चंद्राच्या कलेवरुन अष्टमी असावी असे वाटले. समुद्राला अर्धीच भरती होती. आम्ही रेतीत दोघे बसलो व पायाने कळ मारली. आणि जाणवले की हातपाय सणसण करतायत. गरम वारा व लाटांचा आवाज वेगळा वाटत होता. उगीचच डोळयात अश्रू आले. मरताना सोन्याभाऊदादांना कोण आठवले असेल? कुणाचा चेहरा आठवला असेल? वडिल मरताना, मरणकाळ जवळ आला कळल्यावरही घाण वाटते म्हणून जवळ न जाणाऱ्या आम्हा भावांचा कि

अर्ध्यात साथ सोडून गेलेल्या आईचा की अविवाहित, प्रौढ एकाकी मुलीचा? लग्नाचे वय उलटून गेल्यावरही स्त्रीला समाजात समाज कंटकांपासून धोका असतोच. मग सोन्याभाऊदादा तिला असे असुरक्षित सोडून का गेले? तरीही मरतांना त्यांना मुलांच्याच मांडीवर न मेल्याचे दु:ख झाले असेल का? मुलगी फक्त त्यांना सेवा करण्यासाठीच हवी होती का? मुलीच्या मांडीवर त्यांनी प्राण का सोडला? आशाराजेंना तिथेच सोडून मी गाडीतून घरी आलो.

आशाराजेंजवळ पैसे नव्हते. भेलवाला त्यांच्याकडे विचित्र नजरेने बघत होता. मी गाडीत बसताना ऐकले. तो त्याना म्हणाला, ''ताई आता भरती येईल, पाणी भरेल, जोरात लाटा येतील, घरी जा. ''

''मला घर नाही, माझे कुणी नाही'' ती पुटपुटली. तो दूर जाऊन त्याच्या इतर मित्रांना काही सांगू लागला आणि मला जाणवले. दादांच्या नंतर त्यांच्याभोवती घिरटया घालणाऱ्या गिधाडांपासून तिला स्वत:ला वाचवणे खूप अवघड जाणार आहे. म्हातारा माणूस असेपर्यंत किंमत नसते. वडील महालात पडले होते. त्यांची किंमत आशाराजेला होती. पण इतरांना नव्हती. आम्हाला खोली रिकामी हवी होती. छोटासा तो व्हरांडा ती जागा रिकामी झाल्याचा आनंद मोठया वहिनीला झाला. मला त्या निसर्गनियमांची घृणा वाटली. तोंड कडवट झाले. मी गाडी चालू केली. आशाराजेही उठून मला गाठण्यासाठी चालू लागल्या. त्या भय्याने त्यांना विचारले, ''नोकरी करायची काय? मात्र रात्रपाळी करावी लागले?''

पिवळे दात दाखवत तो हसला. आशाराजेचे वडील मरुन तेरा दिवस झाले होते. पण सर्वांच्या लेखी ती एक शरीर होते. उपभोगासाठी लालसावलेले लोक जणू माझ्या वडिलांच्या मृत्यूची वाट बघत होते. पण भाऊ उपयोगी नाही हे सर्वजण जाणून होते. त्या पाय ओढत चालू लागल्या. कोपऱ्यावर नात्यातला एक माणूस (माझ्या वहिनीचा भाऊ पार्टे) भेटला. म्हणाला, ''चला खारे जेवण जेवू या! चव येईल. '' त्याच्या तोंडाला दारुचा भपकारा आला. मी नकार देवून गाडी चालू केली. तो माझ्या वहिनीचा भाऊ पार्टे आशाराजे बसल्या होत्या त्या दिशेने गेला. त्याची आशाराजेवर फार वर्षे नजर होती. पण मी दुर्लक्ष केले. मला बहीण मरेल तर बरे असे

वाटत होते. माझ्या वडीलांनी पार्टेला, त्याच्या आईला विधवा झाल्यावर बहीणीप्रमाणे सांभाळले होते व काही वर्षे महालात इतरांप्रमाणेही मुले आमच्या घरी आश्रिताप्रमाणे वाढली होती. आज याच दादाराजेच्या मुलीकडे वाईट नजरेने बघतांना त्याची नजर फुटत नव्हती! वा! काय थोर कुळ! किती महान लोकं! मला दैवाची चीड आली. आशाराजे घराकडे चालू लागले. भेळवाला भैय्या पाठोपाठ धावत आला. त्यांनी साडीचा पदर घट्ट पांघरुन घेतला. जवळ येत तो. भेळवाला म्हणाला, ''पैसा दूँगा, अगले महीने बताया तो भी चलेगा।''चालत चालत ती घरी आली. फाटकापाशी पावले थबकली. बागेतील झोपाळयावर भाऊ वहिनी हसत खिदळत होते. फक्त बाहेरच्या जगाची असुरक्षिततेची भीती वाटते म्हणून ती घरात गेली. खरे तर ते घर तिचे नव्हते. ती माणसे तिची नव्हती.

वहिनीराजे म्हणाली, ''एखादा बीजवर स्वीकारा आता तुम्ही, नाहीतर कुठेतरी अन्यत्र रहायला जा. आम्हाला हा महाल, हे घर विकायचे आहे. ''

ती गप्प बसली. आत गेली, पूर्वी दादा (वडील) झोपायचे तो कोपरा रिकामा होता. आता तिथे दादा कधीच दिसणार नव्हते. तिला भडभडून आले. भावाने तिची जुनी जीर्ण ढेकळे आलेली गादी त्या कोपऱ्यात टाकली व म्हणाला ही खोली व ही जागा आता तुझी, दादा ह्या कोपऱ्यात जास्ती दिवस नव्हते. आणि हो कुठेतरी महीलाश्रमात स्वत:ची सोय लाव. राजघराण्याचे हे घर हा महल विकायचे आहे. तुम्ही अपशकुनी इथे राहीलात तर सेव्हनस्टार हॉटेल करायलाही जमणार नाही.

त्या कोपऱ्यातल्या त्या जागेवर ती झोपली व विचार करु लागली असावी. मरताना माणसाला कुणाची आठवण येत असेल? दादांना कुणाची आली असेल? आतल्या खोलीतून हसण्याचा आवाज व बांगडयांची किणकिण ऐकू येत होती. ती मात्र अस्वस्थपणे बोट मोडत छताकडे डोळे लावून बघत होते. खिडकीतून अर्धा कापलेला चंद्र दिसत होता. तिच्या आयुष्यासारखा. अर्धा अपूर्ण, अर्धा पूर्ण, गोंधळलेला. तिला प्रश्न पडला असावा कि उद्या जायचे कुठे जायचे. त्यापेक्षा झोपेतच मरण यावे. दादाराजेना एक लाडकी लेक होती. जिच्यासाठी त्यांनी

जगायला हवे होते. ती रडत होती, ''मला कोण आहे? हांडे नावाचा बीजवर सांगून आला होता. खानदानी म्हणे. ''

बीजवराला हो म्हणावे?

मी आदित्यराजेंनी आशाराजेंना त्यांच्याशी लग्नाची गळ घातली.

''त्याला माझ्यापेक्षाही मोठी मुले आहेत. कसा घ्यायचा निर्णय?''

''प्रस्थान कुठे करायचे?'' रजनी राजे दरवाजाकडे बोट दाखवून म्हणाल्या.

''माझी वाट कोणती? तिची वाट कोणती? मुलींना स्वत:ची दिशा नसावी?

लग्न करुनच तिचे जीवन सार्थक होते का? माझे घटस्फोटाने उध्वस्त जीवन पुनर्विवाहाने सार्थक होईल. '' आशा राजे म्हणाल्या

तिने लग्नाला होकार दिला. पहिला डाव दुर्दैवाने मोडला. बीजवराशी तिचे लग्न झाले तर निदान सुरक्षीतता मिळेल असा विचार करून मोहोर झडून गेलेल्या एका वृध्दाच्या गळयात तीला मारले गेले तर प्रश्न मिटेल. सासरी व नवऱ्यानेही कधी फारसा सन्मान केला नाही तरी चालेल. चार चौघात दिसायला आयुष्य सुरळीत दिसत असले की झाले. कित्येक मुली अपघातात मरतात. पण आपल्याला तेव्हाच कळते, नंतर कळते की नवरा मारायचा, सासू छळायची. माहेरच्यांनी परत पोहोचवले होते बदनामी होते म्हणून.

खरं तर हा वाडा कायद्याने विकता येत नव्हता. आशा राजेला आम्ही सद्‌भावाने कोपऱ्यात पडू दिले असते तरी चालले असते. आयुष्य काय कसेतरी चालू राहते व कसेतरी संपूनही जाते. पण तिला पर्याय नव्हता. ती हो म्हणाली. दुदैवाने, सुदैवाने तो वर हांडे त्याच आठवडयात दारु पिऊन येतांना खडयात पडला व त्याचा पाय मोडला. त्याला सेवा करायला बायको आणायची घाई झाली. त्याला खानपान नर्सिंग सेवा करायला राजघराण्यातील मुलगी नको होती. त्याने अगदी गरीब घरातील गावातीलच मुलगी केली. ती लग्नाच्या संकटातून सुटली पण आम्ही भावांनी तिला महाल राजमहल सोडायला सांगितले. आशा राजे ती १९ वर्षाची होते कुठे जाणार होते?ती हॉस्टेलवर रहायला गेली.

एकदा आशाराजेने लग्नाचा वाईट अनुभव घेतला होता. तिला आता लग्न करायचे नव्हते. पण तरुण मुलीला एकटे रहाण्यात खूपच धोके असतात

Men look such woman with anticipition & women with suspician

आशाराजे हॉस्टेलवर आली. गोष्टी वेल्हाळ नावाच्या एका वर्तमानपत्रात सहसंपादकाची नोकरी सुरु केली. तिचे राजघराणे ते  आयुष्य मागे टाकून ती असुरक्षित सामान्य मुलीच्या आयुष्याचा अनुभव घ्यायला निघोली. राजघराण्याच्या राजमहालातही आशा राजे परकी व उपरीच होती. बंदिनीच होती.

हॉस्टेल मध्ये ती रमली. जे घर सोडून त्या आल्या ते त्यांचे नव्हते. तिथे त्या नोकर होते. सोडल्याचे दु:ख व्हावे व आठवणी काढून रडावे असे त्या घरात कोणी नव्हते. काही दिवस रेंगाळली तर त्यांना भावांनी विहीरीत ढकलले असते. व आशा राजे कुमारी मंदीर, आशा राजे परित्यक्ता मंदिर बांधून भाव खाल्ला असता. खानदानी शब्दाची नशा चढलेले आम्ही लोकं काय वागलो असतो याचा नेम नाही. आशा राजेंचे करियर हॉस्टेलवरच झाले. पर्याय नाही म्हणून किंवा कुणीतरी आवडले म्हणूनही असेल नाजूकपणाने, हळूवारपणाने त्यांनी राजमहालातील आयुष्य सोडून नविन वैचारिक आयुष्य सुरू केले. उषाताईच्या त्या घरगुती चाळीतील हॉस्टेलमध्ये ती चांगली रमली. वातावरण कौटुंबिक होते.  आशा राजेंबद्दल काही बातम्या कानी पडायच्या. त्यांचे आयुष्य नक्की कसे होते. याबद्दल काही कळले नाही. साठेंनी आशा राजेंची हस्तलिखित डायरी पुढे ठेवली.

## १२ ‘माझे मन तुझे झाले’

मी आशाराजे व ही माझी डायरी. लग्न हा प्रत्येकाच्या आयुष्यातील खाजगी असलेला सार्वजनिक प्रश्न असतो. मुलगी वयात आल्यापासून आणि मुलाला नोकरी लागल्यापासून मुलाचे/मुलीचे लग्न कधी करता? हा प्रश्न तुरळकपणे किंवा सातत्याने कानावर पडू लागतो. मी जवळजवळ पंचवीस वर्षांची झाले. पण मला लग्न करावे अशी तीव्र इच्छा कधी वाटलीच नाही. लग्न हया विषयावर मी प्रतिक्रिया सुध्दा सावध व संयमशीलपणे देत असे. कधी कधी मला वाटत असे माझ्यात सर्व काही सामान्य म्हणजे नॉर्मल असेल ना!

लांब कुरळे केस वाऱ्यावर उडताना फ्रॉक सांभाळत मी उभी असतांना राजबिंडा हातात तलवार असलेला परिकथेतील राजकुमार घोडयावर बसून येणार व जवळ येऊन पाय मुडपून उभ्या असलेल्या आपला हात हातात घेऊन लग्नासाठी विचारणार ही स्वप्ने काही दिवस कधी कधी पाहिलीही गेली. पण तशी मी अंमळ अरसिक नॉनरोमॅण्टीकच होते. फुलांचे सुगंधाचे वेड होते. पण कधी हातभर गजरे केसावर माळून व किलोभर पावडरचा थर तोंडावर फासून, पायात पैंजण, साखळी,चाळ बांधून लहान मुली जशा लाजतात तशी मी कधीही लाजले नाही. त्यामुळे मी लग्न हया प्रकाराबद्दल उत्सुक नव्हते. पहिले लग्न झाले मोडले भातूकलीचा डाव उधळून मी परत आले. पुन्हा डाव मांडण्यात रस नव्हता.

घरी ८० वर्षांचे वडील होते आणि त्यांना सांभाळायला मी होते. भाऊ वहिनींना वडिलांची सेवा कटकट वाटत असे. त्यामुळे वडील असेपर्यंत त्यांनी कधी माझ्यावर लग्नाचा विषय काढलाच नाही. मलाही त्याबद्दल कधी जलन झाली नाही. मोठा मित्रमैत्रिणींचा परिवार पुस्तके, टी. व्ही. यामुळे मला लग्नाची असोसी कधी वाटली नाही. बरोबरीच्या मैत्रिणींची लग्ने झाली. त्यांना मुले झाली. अगदी माझ्याहून लहान मुलींचीसुध्दा वरात गाजू लागली. दुपटया लंगोटयांचे व शेकशेगडीचे वास आजूबाजूच्या घरांतून येऊ लागले आणि उषा आई अस्वस्थ झाली. जो भेटेल त्याला माझ्यासाठी स्थळे बघा सांगू लागली. गरज आहे, पण सोय नाही. अशी परिस्थिती

लग्नाबाबत बऱ्याच घरी होती. पण कुठून तरी काहीतरी मार्ग निघून सर्वजणी मार्गी लागल्या. माझी मात्र वरात अजून निघाली नव्हती. उषाआई व मावशी माझ्या मैनेचे कसे होईल म्हणून डोळयाला पदर लावत असत. मी मात्र लग्न नाही म्हणून झुरत नव्हते की लग्न हवे म्हणून रडत नव्हते किंवा लग्न नको असेही म्हणत नव्हते. मात्र मला नक्की काय हवे हे ही सांगू शकत नव्हते. कदाचित वडीलांची सेवा करुन शरीर किती नश्वर असते हे मला जाणवत असावे किंवा आयुष्याकडून माझे मागणेसुध्दा फार नसावे. लग्न ही प्राथमिक गरज आवश्यक बाब नव्हती. पण रोजीरोटीच्या व सुरक्षिततेच्या प्रश्नांची ती ढाल होती.

सोन्याभाऊराजे वडील भावाला म्हणायचे मी मेल्यावर हीला कोण बघणार. तू हिला स्थळ बघत जा. भाऊ मला वेळ नाही वगैरे कारणे सांगून तेव्हासुध्दा टाळत होता. उषा आईनेच मग मामांना सांगून कुठल्या तरी विवाह विषयक मासिकात जाहिरात दिली. एक स्थळ सांगून आले. मुलगा बिझनेस करतो वगैरे वर्णन होते. मुलगा बघायला आला. ठीक होता. ताबडतोब लग्न करुया म्हणून मागे लागले. उषा आई म्हणाली मामांना पाठवते. मी पण म्हटले. जाऊ दे कुणाशीतरी करायचेच तर हा ठीक आहे म्हणून हो म्हटले. मामा त्या मुलाच्या गावी माहीती काढण्यासाठी गेले. दिलेल्या पत्त्यावर घर शोधणेही अवघड होते. घर कसेतरीच होते. घरात तारेवर बायकी कपडे सुकत होते. फर्निचरच्या दुकानाचा पत्ता नव्हता. तर तो मुलगा शहरातून रॅक, टेबल, खुर्च्या आणून खेडयांमध्ये विकत असे. गोऱ्या रंगाने व आकर्षक रुपाने आकर्षित झालेली कुणीतरी स्त्रीसुध्दा त्या घरी राहत होती. लग्नासाठी जाहिरात देणारी मुलीची आई आहे म्हणजे मुलीला वडिल नाहीत व भाऊ आला नाही म्हणजे लक्ष घालत नाही. त्यामुळे आपण फसवू शकतो या भावनेने त्या मुलाने ती खेळी रचली होती. उषा आई मी व मामा या प्रसंगानंतर फारच हबकलो. आगीतून उठून फुफाटयात पडण्यापेक्षा आपण प्रौढ कुमारिकाच बऱ्या असे मला वाटू लागले.

त्यात एक दिवस उषा आईचा झोपेतच मृत्यु झाला.  त्यांच्या मुलाने ते चाळ वजा हॉस्टेल तोडले. मी आशाराजे दुसरीकडे जाऊन नोकरी करीन तरच पोट भरु शकेन, अशी वेळ आली. मी नवी नोकरी पकडून नोकरी करणाऱ्या महीलांच्या वसतिगृहात आले.  मला इतके दिवस वाटले नव्हते, पण आता मात्र वाटू लागले की एकटे राहणे अवघड आहे. गंगा नावाची रूममेट होती, पण मेल्यासारखी झोपायची. रात्री एकटीला खूप भीती वाटत असे.  मोरीवर टॉयलेटला जायलासुध्दा दार उघडायची भिती वाटत होती.  नोकरी नवीन होती.  पण माणसे खूपच चांगली होती.  त्यामुळे मी नोकरीत खूपच रमले.  रात्र मात्र खायला उठायची.  माझा स्वभाव कपडे, दागिने खरेदी करणे, गॉसिप करणे असा कधीच नव्हता.  त्यामुळे संध्याकाळ अंगावर येत असे.  मग मी शोधून शोधून कुणातरी मैत्रीणीकडे जाई नाहीतर देवळांत जाई.  विणकाम, भरतकाम करायला मी सुरवात केली. लिखाण चालूच होते. चांगले लिहिणाऱ्यांने एखादे वाईट लिहीले की त्याची प्रतिभा संपली अशी ओरड होते. लेखक साहित्यिक मृत्यूला घाबरतो

माझ्या ऑफिसमधल्या सुप्रिया नावाच्या मैत्रिणीला मुलगा झाला.  बारशाला सर्वजणी जाणार होत्या.  बहुतेक सर्व मैत्रिणी विवाहीत होत्या.  व 'मेरा घर मेरे बच्चे आणि सास भी कभी बहू थी' हया प्रमाणे सूगृहीणी होत्या.  मी आशाराजे कौतुकाने चर्चा ऐकत असे.  त्यांच्या संसार सुखाचे समालोचन, ईगल्स आय किंवा थर्ड पार्टी अॅनॅलीसीस करीत असे.  अर्थात बारशाला जायला मला ऑकवर्ड वाटत होते.  बाकीच्या लेकुरवाळया सवाष्णींमध्ये मी कधी जाऊ?  माझा कुणी अपमान केला तर? पण संध्याकाळ खूपच एकाकी वाटू लागली.  शिवाय सुग्रास जेवण मिळणार होते. पोटासाठी माणूस लाचार होतोच. त्यामुळे मी त्यातल्यात्यात बरी साडी नेसली व सुप्रियाकडे गेले.  माझ्याकडे ना चांगले कपडे होते ना दागिने.  पण दुनियादारीसाठी वेळ मारुन न्यावीच लागते.

बाळ छान गोरे गोरे निळया डोळयांचे होते व चैत्र महिन्यात जन्मला म्हणून चैत्रपालवी नाव ठेवले.  फोटोग्राफर बोलावून फोटो काढण्याचे किंवा डीजीटलने फोटो घेण्याचे ते दिवस नव्हते.  सुप्रियाचा भाऊ चंद्र फोटो काढत होता.  फोटोंच्या सेंटरमध्ये बऱ्याच ठिकाणी मी होते.

सुप्रियाचा भाऊ ऑफिसात फोटो दाखवायला आला व तिने माझी ओळख त्याच्याशी करुन दिली. त्यानंतर प्रत्येक कार्यक्रमाला अगदी किरकोळसुध्दा सुप्रिया मला बोलावू लागली. तिचा भाऊ आमच्या गावाजवळच्या वेगवेगळया देवळांना भेट घ्यायच्या निमित्ताने येत असे. अगदी सुप्रिया ऑफिसातून सुट्टीवर असली तरीही तो ऑफिसमध्ये येऊन प्रसाद देत असे. मला कधीकधी भीती वाटत असे की हा काही मंत्र तर टाकणार नाही ना! आणि नंतर मला माझ्या अंधश्रध्देचे हसू येत असे. मोहिनी मंत्राची ही सुरुवात तर नसेल?

एकदा मला ऑफिसमध्येच फणफणून ताप भरला. सुप्रिया मला हॉस्टेलवर सोडायला आली. मी औषध घेऊन झोपले. तापात ग्लानीत मला सोन्याभाऊ, आई, दादा दिसत होते. मी गाढ झोपले. झोपेतून उठल्यावर हॉस्टेलची एक मैत्रिण म्हणाली, ‘तुला भेटायला मित्र आला होता. डबे ठेवले आहेत. ’ मला हसू आले. मला तर कुणीच मित्र नाही. त्याने फळे, अंजीर, मिठाई, दूध व शिरा आणला आहे. मी ते डबे ओळखले. सुप्रियाकडे मी ते डबे बऱ्याचदा पाहीले होते. शांतिनिकेतन बॅगमध्ये व्यवस्थितपणे खाऊ रचला होता. त्या तापात मी पंधरा दिवस हॉस्टेलच्या बाहेर पडले नव्हते. खूप अशक्तपणा आला होता. आजारपणात तर माणूस खूपच हळवे होतो. मला एकाकी वाटू लागले. रामाने खाऊ दिल्याने बाहेर न पडताही भागत होते. मी बरी झाले. ऑफिसमध्ये पंधरा ऑगस्टची पूजा होती. सुप्रियाचा भाऊ राम आला. मी प्रसाद वाटायला बसले होते. तो हळूहळू थोडक्यात म्हणजे चेंगटपणाने बुटाची लेस, मोजे काढत होता व मला म्हणाला, ‘‘मला हात धुवून मग पूजा करायची आहे. ’’ ‘‘आत जाऊन हात धुवा’’ मी
‘‘इथून जाऊ का मी.’राम

हळूहळू तो माझ्या बाजूने चालत गेला तेव्हा मला वाटले हयाचे पाय किती सुंदर आहेत. महाभारतात कर्णाचे पायांचे वर्णन केले आहे. हयाच्यासुध्दा आईचे पाय सुंदर असतील का? कुंतीमातेचे पाय खूप सुंदर होते असा उल्लेख रणजित देसाईंच्या मृत्युंजयमध्ये आहे. मला वाटले मी हयाच्याबद्दल एवढा विचार का करते आहे? मी विचारात गुंतले. सुप्रिया म्हणाली, कसला विचार चाललाय? व हसली.

हळूहळू शिरा ठेवलेली पिशवी माझ्याजवळ ठेवून प्रसाद घेऊन तो गेला सुध्दा. मी बघतच बसले. पुढच्या सोमवारी कलिंगड घेऊन रामस्वारी माझ्यासमोर हजर झाली. माझी दुसरी मैत्रीण म्हणाली माणूस चतुर आहे. आखीव, रेखीव योजनांनी येतो व तुझ्या पगारावर नजर दिसते.

बायकांच्यासुध्दा हृदयाकडे जाण्याचा मार्ग पोटातून असतो वाटते! नीरा म्हणाली, दोन रुपयांच्या कलिंगडात करोडपति पोरगी गटवायचा विचार दिसतो. मला एकदम टयूबलाईट पेटल्यासारखे वाटले.

''हं म्हणजे थोडी थोडी पूॅंजी खर्च करुन याला खर्च नाही करायचा तर इन्व्हेस्ट करायचे आहे. ''

पुढच्या आठवडयात तो फळे घेऊन आला तेव्हा मी ओळखले, हा स्वार्थी दिसतो. ''खाऊ देऊन मिठाईचे दुकान लुटायचा विचार दिसतो आहे. '' मी आज खाऊ नको वगैरे कारणे देऊन त्याला परत पाठवले. पण आठवडाभर मला त्याची आठवण येत होती. रस्त्यात कलिंगड दिसले की त्याची आठवण, त्याच्या पिशवीसारखी पिशवी दिसली तरी आठवण आणि मी ओळखले त्याची इन्व्हेस्टमेंट त्याच्या नावाने झालीच आहे. चोर पावलांनी स्वारी माझ्या आयुष्यात शिरली आहे. पुढच्या वेळी खाऊ घेऊन तो आला. मी खाऊ ठेवून घेतला. खाऊ खाण्यासाठी नाही तर त्याला भेटण्यासाठी मी आतुर झाले. साधारण जानेवारीत त्याने मला आशाराजे लग्न करशील का विचारले. मला भिती वाटत होती. अनामिक भिती मला अक्राळ विक्राळ रुप धारण करुन घाबरवू लागली. नुसते रहावे तरी एकटेपणाची भिती! कुणी लग्नाचे विचारतो तरी भिती! कुणी भेटला तरी अस्वस्थता, नाही आला तरी अस्वस्थता! काय झालेय तरी काय मला? लग्न म्हणजे तरी काय तडजोडीची भिती, तोडफोडीची भिती! एकटेपणाची भीती व दुसऱ्याशी जुळवून घेण्याचीही भीतीच! लग्न म्हणजे एक हुरहुर! एक सुख! एक बंद लिफाफा! एक मस्त उसासा! एक सुंदर पुस्तक, एक अनभिज्ञ रस्ता रोज रोज हॉस्टेलच्या दारात उभ्या त्या बाओबाब वठलेल्या वृक्षाकडे निरखून पहायची मला सवय लागली. काही वर्षांपूर्वी रुबाबदार डेरेदार तो आम्रवृक्ष पूर्वी

किती बहरलेला होता.  कोवळया पालवीने व आम्रफुलांनी सजल्यावर डोहाळ जेवणाच्या दिवशी स्त्री जशी दिसते तसा दिसत असे.  नेमाने मी त्याला पाणी घालू लागले.  एकटेपणाने आयुष्य कसे घालावे असे एक पुस्तक मी विकत घेतले.  त्यात झाड लावावे, पक्षी पाळावे, असे उपाय होते.  पक्षी पाळायला हक्क नव्हता. झाडे लावली. पाणी घालण्यात अर्धा तास जाई.

बाओबाब वृक्षाची तरीही पिवळी पाने जीर्ण होत होती. वरुन खोड काळे पडले होते. सर्वांना वाटले आता हे झाड मरणार.  मी झाडाचाच विचार करीत उभे होते.  तोच रस्त्यावर करकचून ब्रेक लावून गाडी थांबवण्याचा आवाज झाला.  कुठल्यातरी अपघातात स्त्री जखमी झाली होती व गाडीच्या बरोबर खेचत पुढे आली होती. साडीमुळे तीला बसची पायरी चढायला त्रास झाला व ती बस सुरु झाल्याने पडली.  बघ्यांची गर्दी जमली. कुणीही पुढे येत नव्हते.  मी पुढे जाऊन तिला पाणी दिले.  व जवळच्या काळे इस्पितळात नेले. आनंदगावच्या, सोन्या भाऊसाहेबांना ज्यांनी औषधोपचार केला त्यांनीच इथे इस्पितळ सुरू केले होते.  तिचे नातेवाईक नवरा धावत आले. त्यांच्या ताब्यात तिला सोपवून मी हॉस्टेलवर आले.  डॉक्टरांना मी ओळखत होते.  पण त्यांनी ओळख होती तसे दाखवले नाही.

वाटेत पुन्हा डॉक्टर काळे दिसले पण लबाड माणसे ओळख दाखवत नाहीत तसेच बघून न बघितल्यासारखे दाखवून निघून गेले.  मला काही अपघात झाला तर कोण येईल? बेवारस म्हणून रहावे लागेल आणि बेवारस म्हणून प्रेताचीही विल्हेवाट लागेल. मी सुध्दा त्या बाईसारखीच प्रवाहाबरोबर खेचली गेले, जखमी झाले.  बघे बघत राहीले. लग्न म्हणजे काय? शरीरा पलिकडील मन की मनाभोवतीचे शरीर? सुखामागचे दु:ख की दु:खामधील मधुर?  प्रेम म्हणजे काय? विश्व व्यापून सोडणारा तो लबाड काळा मेघ?  पृथ्वीवर पाणी बरसवून तृप्त होणारा मृत्यु स्वीकारणारा काळा ढग? आत्मा की अनुभूती? सहवास की आभास? टीचभर शरीरातील वीतभर मन? स्वप्नांच्या पेटाऱ्यातील कोपऱ्यात लपलेले काहीतरी? आकर्षण, समर्पण की फक्त पण! सहकार की संहार? प्रहार कि प्रवाह? मित्रमैत्रिणी, सोबती, सर्वजण थोडावेळ भेटतात

हळहळतात व निघून जातात. राजघराण्यांची भाऊबंदकी नको म्हणून हिची सारखी कटकट हे कारण देवून साथ सोडतात.

मी स्वत:च्याच आयुष्याला घाबरु लागले.  आरशाच्या प्रतिमेला बघून मला स्वत:ला इतरांच्या डोळयात कीव, नकोशी वासना, दया दिसू लागली. फेब्रुवारीत माझे हॉस्टेल दुसऱ्या मॅनेजमेंटकडे स्थानांतरीत झाले आणि आम्हा सर्वांनाच दुसरीकडे सोय लावा सांगितले गेले. अनपेक्षितपणे मिळालेल्या हया नोटीसने मी हबकलेच.  एखादयाचे नशीबच खडतर असते.   मी अन्य मनस्कपणे मी देवळात जाऊन बसले.  रात्र पडल्यावर हॉस्टेलवर पुन्हा आले.  दारात स्वारी उभी होती.  शांतिनिकेतन बॅगमध्ये खाऊ व गजरा होता.  क्षणभर मला प्रसन्न वाटले.

''हे बघ मी फुलासारखा जपेन तुला माझ्याशी लग्न कर.  तू काळजी करु नकोस.''  तो

मी ''विचार करीन''

हॉस्टेलमधली रुममेट गंगा झाडाच्या बुंध्याच्या कटटयावर बसली होती. ती म्हणाली, ''रामला हॉस्टेल तुटणार कळलेले दिसतेय.  तुझ्या गैरसोयीचा किंवा असहायतेचा फायदा घेऊ इच्छितोय. ''

मी तिला म्हणाले,''शेवटी आयुष्य म्हणजे तडजोडच असते. ''

'' मी तुला सांगते, मला बघायला आले तरी दहा जणांत मला नक्की नवरा कोण तेही कळले नव्हते.  तुला त्याचा थोडा सहवास मिळाला.  थोडे गुणदोष कळले. पुन्हा जुगाराचा एक डाव खेळून बघ, कर लग्न! एकटी आयुष्य कशी काढशील?  ती.

''मला लग्नाची रीस्क वाटते. '' मी.

''लग्न का करावेसे वाटते. ''ती.

''मला अंधाराची भिती वाटते. '' मी.

''का लग्न नको. '' ती.

''मला घटस्फोटाची भीती वाटते. '' मी.

ती मला म्हणाली ''जेवण झाल्यावर आपण गच्चीत हया विषयावर बोलू या. ''

मी आंब्याच्या झाडाला पाणी घातले. जीर्ण पिवळी पाने खाली पडली होती. नवीन येत नव्हती. होती ती मातीत मिसळली होती. धुळीखाली बुडत होती. आम्ही गच्चीवर गेलो. बाजूच्या प्लॉटमधील, लमाणी लोकांचे पाले पडले होते. बलुत चुलाण्यावर भाकरी भाजत होते. त्यात रातराणीचा गंध मिसळत होता. कुठूनतरी अगरबत्तीचा वास येत होता. त्यातच बाजूच्या नाल्याचाही दुर्गंध मिसळत होता. तरी मंद चांदणे होते व पूर्ण चंद्र होता. त्यामुळे रात्र गहीरी वाटत होती.

ती म्हणाली, हे वातावरण मला लग्नासारखे वाटते.

म्हणजे लग्नाळू लग्न करावेसे वाटते? - मी.

''नाही लग्न म्हणजे काय हे सांगायला मला हे वातावरण योग्य वाटते. उदाहरण म्हणून घ्यायचे आहे. हे बघ जर माणसाच्या नशीबी बुडणे असेल तर तो खडडयातसुध्दा बुडतो व तरंगायचे असेल तर समुद्रातसुध्दा तरुन जातो. लग्न हा जुगार असतो. ''- ती.

''मग लग्न केलेच पाहिजे असा आग्रह का असतो?'' - मी.

''मी माझी गोष्ट कुणालाही सांगत नाही. कारण रडल्याचे सहानुभूतीचे नाटक करुन त्याच दु:खाची बातमी चघळली जाते. पण मी तुला सांगते. '' - ती.

''तुमची इच्छा नसेल तर नका सांगू. माझेसुध्दा मन हल्ली दु:ख ऐकायलासुध्दा भिते. ''- मी.

गंगा पदराला तोंड पूसत माझ्याजवळ येऊन बसली. जाड शरीरयष्टीची धापा टाकत चिडत चालणारी ती मला एकदमच केविलवाणी वाटली.

''ऐक. माझे लग्न झाले तेव्हा काही दिवस खूप आनंदात गेले. मी नोकरीवर जायला लागले. भल्या पहाटे उठून ऑफिसला जायचे व परत रात्री याचे. एकदा ऑफिसमध्ये खूप डोक दु:खायला लागले म्हणून लवकर घरी परत आले. लॅचने दार उघडले. बेडरुमचे दार लोटलेले होते. मी म्हटले स्वारी लवकर आलेली दिसतेय. मी दार ढकलले आणि मला आभाळ

कोसळल्यासारखे वाटले. नवरा साडी घालून, दागिने घालून आरशासमोर बसून बायकी आवाजात गाणी म्हणत होता व मला खरे सांगू काहीच कळले नाही. त्या महिन्यातच तो परागंदा झाला. त्याला वाटले मी त्याचे रुप लोकांसमोर आणेन. पण मी कधीही कुणाला काहीही सांगितले नाही. सासरच्यांनी मलाच दोष दिला. माहेरी आले. तिथेही मलाच दोष मिळाला. भावाला सांगितले तर तो म्हणाला ही खोटेच बोलते. गावभर सांगत सुटला माझीच बहिण गंगा वाईट आहे. तो नॉर्मल आहे. त्याला दुसऱ्या बाईला हिच्या नवऱ्यापासून मुलगा झाला आहे. मुलगा होणे हे सत्य असेल की नाही माहीत नाही पण त्याच्यापासून झाला नसावा हे सत्य आहे. हे असे भाऊ असतात. सरळ हॉस्टेलवर रहायला आले. '' गंगा रडू लागली.

मी म्हणाले ''हिन्दी सिनेमातच दिसते ते असे त्याला भाऊ बहीणीचे ते प्रेम म्हणतात. प्रत्यक्षात भाऊ म्हणजे निव्वळ शब्द असतो. वैरी असतो का? तुला माहीत आहे त्या कोपऱ्यातल्या सात नंबरच्या खोलीतल्या मुलीचे लग्न झाले ते! कितवे असेल?''

मी ''मला माहीत नाही. '' - मी.

गंगा सांगू लागली. '' वयाच्या वीसाव्या वर्षीच तिचे पहीले लग्न कॉलेजात शिकत असतांना प्रेमविवाह झाला होता. सासरी गेली. सासरी शेळयामेंढया खेडयातले घर होते. शेतात संडासला जाणे. अंघोळ उघडयावर करणे. ती परत घरी आली. तिच्या आई वडीलांनी तिचे दुसरे लग्न करुन दिले. तो मुलगा आर्मीत होता. अतिरेक्यांशी दोन हात करतांना वारला. तिच्या भावाने तिचे तिसरे लग्नासाठी स्थळ पहायला सुरुवात केली. तेव्हा ती अठ्ठावीस वर्षांची होती. परदेशातल्या एका मुलाशी इंटरनेटवरुन लग्न जुळले व झाले. तिची तिथेही फसवणूक झाली. ती परत आली तेव्हा गरोदर होती. भाऊ प्रॅक्टीकल होते. तिचा गर्भपात केला व विमान प्रवासाने गर्भपात झाला असे सांगितले. तिचे चवथे लग्न आता झाले. ते आणि आपले भाऊ फरक बघ! ''

''लग्नाचेही बघणे होईना. असे काही नशीबाने झाले असते तर विहीरीत ढकलले असते. '' मी

''लग्नाला घाबरु नकोस. '' ती

‘‘लग्नाला घाबरते की नशिबाला घाबरते मलाच कळत नाही. ’’ मी

‘‘चल जाऊ या. कामावर जायचे आहे. ऑफिसात कुणीही मदत करत  नाही. मला चिडकी म्हणतात.  पण पुरुषांनी दोन हात दूर रहावे म्हणून धारण केलेली ती चिडकी इमेज आहे माझी. ’’ - ती म्हणाली. मी हसले.

हॉस्टेलमध्ये हीचे सरकले आहे अशी चर्चा लोक करीत असत.  मला तोच संशय आला. पण ती म्हणाली ‘‘तू माझी पार्टनर’’ रुम पार्टनर पण आयुष्याच्या पार्टनर प्रमाणेच म्हणजे व. पु. काळेंच्या कथेसारखी मैत्रिण होय. तुला सांगते लग्न म्हणजे चुलाण्यावरची भाकरी - पोटाची सोय’’ - ती.

लग्न म्हणजे रातराणीचा मादक गंध लग्न म्हणजे भाकुरी. तर प्रेम म्हणजे कस्तुरी. लग्न म्हणजे अगरबत्तीचा सुवास म्हणजे पवित्र बंधन त्यात मिसळणारा हा नाल्याचा दुर्गंध महणजे हेवेदावे, भांडणतंटे, तडजोड! त्यातला जो गंध त्याक्षणी तीव्र उग्र ठरतो तसे वातावरण वाटते.  तसे जी भावना तीव्र असते तसेच लग्न त्यावेळी वाटते  - मी.

लग्न म्हणजे अशी चांदणी रात्र! चांदण्यांप्रमाणे आयुष्यात येणारे लोक पण तरीही त्यांच्या अस्तित्वानेही एक प्रकारे अपूण्रता वाटते. चंद्र आला की आकाश भरते.  आयुष्यात जोडीदार मिळाला की परिपूर्ण वाटते.  अर्थात ते मनाचेच फीलगुड असते.  माझा घटस्फोट झाला.  मी नोकरी पकडून हॉस्टेलवर आले, इथेच मरणार - ती.

‘‘मला घटस्फोटाची भिती वाटते. ’’ मी.

‘‘स्वतंत्र विचारी व्यक्तिमत्व जेव्हा एकमेकांवर आदळतात तेव्हा वाद होतात.  कधी विकोपाला जातात. परदेशात घटस्फोट खूपच कॉमन आहेत. ’’ ती.

‘‘घटस्फोटात दोष स्त्रीलाच दिला जातो. ’’ सप्तपदी नावाच्या हो व. पु. काळेंच्या कथेत एक वाक्य आहे.  वधूच्या साडीचा पदर वराच्या उपरण्याशी बांधतात.  कंटाळा आला की वर उपरणे टाकून देतो.  तो संबंध तोडतो.  बायको टाकून देतो.  स्त्रीला मात्र साडीचा पदर बांधलेला असल्याने ती गोष्ट अवघड जाते व जणू ते तिचे वस्त्रहरणच असते. - मी.

‘‘जगरहाटी आहे. अपघाताच्या भीतीने माणूस घरात बसतो का?’’ - गंगा म्हणाली.

आयुष्य स्वीकारायला हवे. राजे दादांची झाशीची राणी आहेस तू! चला आता झोपू या. विचार कर. फायदया तोटयाचा हिशोब मांडू नकोस. समजा तराजूच्या दोन तागडयात मापी वजनी हिशेब होत नाही. एकीकडे पुरुष व स्त्रीचे आकर्षण हिशोबात धरता येत नाही. तराजूच्या दोन तागडयांमध्ये एकीकडे स्त्री घातली ना तरीही पारडे पुरुषाचेच जड राहते. निसर्गाने तागडे चुकीचे बनवले आहे. परमेश्वरच काटा मारतो. घाटयाचा सौदा स्त्रीच्या नशिबी कायमचाच आहे’’ ती म्हणाली. गंगा पुराणामुळे मी थोडी सकारात्मक झाले. गंगा असल्याने ती गोष्ट अवघड जाते व जणू ते तिचे व मला फीलगुड असे होते.

शेवटी एक दिवस मला रामने ऑफिसात फोन केला. बऱ्याच दिवसांनी त्याचा आवाज ऐकून बरे वाटले. नाहीतरी माझी काळजी घेणारे जगात कोण होते? कुणीतरी वाट पाहते म्हणून जगण्यात मौज असते. बाकी एकटा पक्षी गाऊन गाऊन गाणार किती. उडून उडून उडणार किती? थव्यात उडाण जमून जाते. जोडीत गीत उमलून जाते. पुढच्या रविवारी मला भेटायला राम पुन्हा आला व म्हणाला ‘‘स्पष्ट नाही सांग. मी इतर मुली बघायला सुरुवात करतो. ’’ मला राग आला. मी आशाराजे होते उत्तर दयायला अनकानी करु लागले. पण शेवटी ‘‘नाही’’ म्हणाले. डोळयात जखमी वेडया कोकरासारख्या दु:खावलेल्या भावना घेऊन तो गेला. पंधरावीस दिवस मी विचारात गढून गच्चीत बसले होते. पण मला निर्णय होत नव्हता. आणि मला आठवले अरे उद्या २० फेब्रुवारी त्याचा वाढदिवस आहे.

मी अर्धा दिवसाची सुट्टी काढली. बस पकडली व त्याच्या घरी पोहोचले. अंधार पडू लागला होता. पक्षी किलबिलाट करत घरटयाकडे परतत होते. गाईच्या गळयातील घंटांचे आवाज ऐकू येत होते. कुठे कुकरच्या शिट्टयाही ऐकू येत होत्या. त्याच्या घराला मोठे कुलूप होते. मी म्हटले चला परत रात्रीच्या गडद अंधारापूर्वी निदान गावातल्या नातेवाईकांकडे तरी जायला हवे. मी खाली मान घालून त्या पायवाटेने चौकापर्यंत चालत आले. रस्त्यावरच्या दिव्याखाली तो दिसला. मला बघताच त्याचा चेहरा सोळा वर्षांच्या टीनऐजर मुलाप्रमाणे उजळला.

‘‘मी माझ्या नातेवाईकांकडे आले होते. म्हटले भेटावे. ’’ मी चाचरले.

‘‘खोटे बोलता येत नाही तर बोलू नये. ’’ तो हसत म्हणाला.

‘‘मी रहायला त्यांच्याकडेच जाणार आहे. ’’ मी जीभ चावली

‘‘डोळयांना लपविता येत नाही’’ तो चष्मा नाकावरुन वर उचलत म्हणाला.

‘‘वाढदिवसाच्या शुभेच्छा. ’’ मी रामला

त्याला खूप आनंद झाला. त्याने त्याचे घरी नेले. घर दाखविले. चहा केला. व पंधरा मिनिटांनी नातेवाईकांकडे मला पोहोचवले व म्हणाला ‘‘सकाळी तुला ट्रेनमध्ये बसवून देईन म्हणजे तुझे ऑफिस बुडणार नाही. ’’ सकाळी भल्या पहाटे तो आला. बहुतेक रात्री झोपलाच नसेल. मला तरी कुठे झोप आली होती? गाडीत मला बसविले. ‘‘रविवारी येऊ’’ तो. ‘‘कशासाठी’’ मी नजर चोरत विचारले. लिंबाच्या झाडावरचे गोंधळाचे निर्णय चोरणारे भूत पुन्हा माझ्यात शिरले. ‘‘माय गॉड अजूनही अवघड वाट आहेच का?’’ तो रागावल्यासारखे दाखवत म्हणाला.

‘‘सुप्रियाकडे येणार का?’’ मी रामला विचारले

‘‘हो लग्नाची तारीख ठरवू या. ’’ - तो स्पष्टपणे म्हणाला.

‘‘दोन रुपयांचे कलिंगड घेऊन एक कोटीचे मिठाईचे दुकान नावावर करायची तारीख ठरवायची का?’’ मी रामला कुचकटपणे विचारले.

‘‘हो पुन्हा तुझा मुड बदलायचा’’ तो.

गाडी सुरु झाली. घाटातून दुडूदुडू धावू लागली. कशासाठी पोटासाठी आवाज करु लागली. आजूबाजूच्या घरांतून कुठूनतरी आवाज येत होता. ट्रान्झिस्टर मध्येमध्ये लागत होता. ‘‘तुझको चलना होगा नदिया चले चले रे धारा चंदा चले चले रे तारा’’ एक वेळ होती माझा निश्चय होता की लग्न करायचे नाही आणि लग्न न करता रहायचे ठरविलेली मी आज असे म्हणत होते माझे मन तुझे झाले, तुझे मन माझे झाले.

तर बहुतेक लग्नांची ही सारांश कहानी बहुतेक सारखीच असते.  सुफळ संपूर्ण! मनामनांची गोष्ट. माझे मन तुझे झाले ती गोष्ट, तुमचे मन त्याचे झाले ती गोष्ट, आदम आणि ईव्हची गोष्ट, ईंद्राची व अप्सरेची गोष्ट, दोन मनांच्या मिलनाची गोष्ट, कांदा भाकरीच्या जोडीची गोष्ट, बेसावधपणे केलेली सावध गोष्ट, जाऊ दे

एक मात्र सत्य आहे माझे मन तुझे झाले.

................

आशाराजेचे लग्न झाले खुषीतले दिवस भुर्र उडाले.  आशाराजेचे नोकरी फास्ट लाईफ सुरु झाले.  मुलगा झाला. माहेरची आठवण यायची पण ती दाबावीच लागायची. काळ खुषीत गेला. २० वर्षे झाली. त्यावेळेसचे आशाराजचे मासिकांमधील लिखाण माझ्या मनात दडलेल्या माहेरच्या आठवणीबद्दल असे.

## १३ वाटेने माहेराच्या धावत मन जाते.

कामवालीने पैसे उसणे घेतले व म्हणाली, ‘बाई माहेरी जायचे आहे.  आई आहे तोपर्यंत माहेर असत.  पुढे कोण विचारेल?’ ती गेली पण मनाची तार झंकारत राहिली. विवाहित स्त्रीचे वय काहीही असो ती कुठलेही काम करणारी असो तिचे माहेरचे प्रेम अतूट असते.  आई असताना मायेच्या पखरणीचा तो पदर असतो.  वडिल असतांना डोक्यावर छत, छत्रछाया असते. काही कारणाने दोघेही वारल्यावरही माहेरची ओढ असतेच ती का? बहीण भावाला ती सांगते : सांगावा धाड, माहेरी बोलव, चार दिवस तरी माहेरपण कर.

नको साडी चोळी मी शब्दांची भूकी
माहेरचे आमंत्रण आता भावाच्या हाती
भाऊबीज म्हणून चालेल तुळशीचे पान
माहेरच्या वाटेवर मी होते लहान
माहेरच्या भेटीची लागते तहान.
सासरी तिन्ही सांजेला माहेरची सय येते.

घाल घाल पिंगा वारा माझ्या परसात, माहेरीच्या सुवासाची कर बरसात. आईवडिलांना गृहीत धरुन माहेरी होणारे लाड त्यांच्या माघारी उरत नाहीत.  बरोबरीच्या भावाबरोबर पटते, पण वहिनीबरोबर पटवून घ्यायचे प्रयत्न करावे लागतात.  ते यशस्वी होतातच असे नाही.  भावजयीला सांगावे लागते.

अग अग वहिनीबाई        भांडू नको उगी आज
नदीच्या पलिकडे        जागा साडेतीन गज

पूर्वी आईच्या काळातले माहेरपण थेट स्वयंपाक घरातले असते.  आई वारली, वडिलांच्या काळातले माहेरपण माजघरातच उरते.  त्यानंतर भावाचे राज्य येते. त्यावेळी पडवीतच माहेरपण होते व कसेतरी वाटाण्याच्या अक्षदा लावून माहेरवाशीणीला वाट दाखवली जाते. भाऊ सुखी राहावा म्हणून वहिनी कशीही वागली तरी चुगली चहाडी न करता मूग गिळून बसावे लागते. माहेर हवे तर सासरचा मोठेपणा सांगावा लागतो व सासरी माहेरपणाच्या आनंदाचे वर्णन खरे असो किंवा नसो तोंडभरुन करुन माहेरची लाज राखावी लागते.

भाऊ जरी आपले, भावजयी दुसऱ्यांच्या

गोडी गुलाबाने रहा, मर्जी राखा दोघांच्या

वहिनीला नणंदा नको असल्या तर ती पाहुणे आल्यावर फुगून बसते, आजारी पडते व कुरबूरत म्हणते, भाकर करीन म्हटलं तर तवा वाळूने खाल्ला. बसा बसा म्हणावे तर पूर्ण घर वल्ला. सुज्ञ स्त्री ओळखून घेते.

आई वडिलांच्या काळात खाल्ले दूधही

भावजयीच्या राज्यात ताकावरही सत्ता नाही!

नाराज होऊन माहेरहून सासरी परत येताना लेक म्हणते,

सासरी आले कुंकवाची चिरी घेऊनी,

माहेरी आता जेऊ म्हणे ना कोणी फारशा मजबूत न उरलेल्या त्या माहेरवाशीण या नात्यात ती तडजोडी पलिकडे पोहोचली तरी सासरी येताना कावरी बावरी होते.

आई असेपर्यंत, आई मागेमागे फिरायची 'जेव खा' म्हणायची.  आता तिच्या माघारी मला जेव म्हणायला कोणी नाही.  मी  ईतकी अभागी होते की तेव्हा मला कळलेच नाही की किती मोठा ठेवा माझ्या जवळ आहे.  बऱ्याच जणांना आईवडील हे किती मोठे धन आहेत हे खूप उशिरा कळते.  मीही त्यातलीच!

जगात सख्खी भावंडे पण स्वभावाने व रुपाने किती निराळी असतात.  आता भाऊ मी दिसताच पूर्वीप्रमाणे खुशीने टुणकन् उडी मारत नाही.  दोन पैशाचे बुट्टीचे बाल खाण्यासाठी व

पन्नास पैशाच्या बनपावसाठी आम्ही एकमेकांचे होमवर्क करीत असू आता मात्र त्याला माझी गरज नाही. चोरुन ब्लॅंकेटखाली लपून पूर्वीप्रमाणे कथा वाचत नाही. आता त्याला त्या दिवसाच्या आठवणी काढून डोळयातून अश्रू गळेपर्यंत हसणे पूर्वीसारखे जमत नाही. एकदा खूप पाऊस आल्यावर आम्ही दोघी बहिणींनी सायकल डोक्यावर आडवी घेतली होती. व त्या सायकलीवर भावाला बसवून घरी आणले होते. आता नातेसंबंध त्याच रितीने पुढे नेले जात आहेत. सर्व स्त्रियांचे तसे नसावे म्हणूनच त्या गातात रुणझुणत्या पाखरा जा रे माझ्या माहेरा.

त्याकाळी बिनाकाच्या गीतमाला ऐकायची परवानगी मिळावी म्हणून आम्ही भावंडे आईला शिकेकाई कुटू देत असू. आईने दादांना मस्का मारावा म्हणून गंगेवर भेळ खायला न्यावे म्हणून बागेतील कुंदाचे आईसाठी गजरे व हार दादांना करुन देत असू. आंबे व चिंचा घरी ढीगभर असतांना आम्ही भावंडे आंबे व चिंचा पाडायला उंडारत असू. पाहूणे आले की त्यांच्याबरोबर आमची जत्रा गावभर फिरे. मंदिर, नदी, देवळे, घाट, डोह, खडक सर्व भोज्ज्यांना शिवून आम्हालाही कृतार्थ वाटे. पाहुणे गेल्यावर आई हुश्श करुन घर आवरे तेव्हा आम्ही भावंड खूप रडत असू. पूर्वी पावसात भिजायला, वाळूचा किल्ला करायला, आकाशकंदील बनवायला भाऊ सोबत असायचा. शेवग्याच्या शेंगा पाडायला, जांभळे, पेरु तोडायला व सर्व ओळखीच्यांकडे पोहोचवायला आम्ही गावीर फिरायचो. त्या शरीराला विश्रांतिच नसायची. हडकुळी व कृश शरीरयष्टीची आम्ही भावंडे अविरत ॲक्टीव होतो. ते गाव बदलले तरीही त्या गावी हरवलेले बालपण आम्ही काही काळ शोधत होतो.

मन है के जा बसा है, अन्जान उस नगर में
कुछ खोजता है शायद, खोई हुई डगर में

या गाण्यात मला फक्त एकच सुधारणा सुचवावीशी वाटते. जो तुम ना आ सके तो मुझे ख्वाब में बुलाओ च्या ऐवजी जो तुम ना आ सके तो मुझे याद भी न आओ। अशी मला भावाला विनंती करावीशी वाटते. ते गाव परकं झालं की माणसं बदलली. तेच ते आंगण मग नाचता का

येईना. कधी मध्यरात्री जाग येऊन वाटते गणित कुठे चुकले? हातचा घेतला हे चुकले की हातचा घेतला नाही तिथे चुकले. आता वृध्दाश्रमांत राहणाऱ्या एक म्हाताऱ्या मामी आठवतात. रात्र रात्र त्या बहिणींच्या बाळंतपणात बाळ सांभाळायच्या. तेराव्या वर्षी विधवा झालेल्या त्या स्त्रीला कुठले माहेर कुठले सासर! नवरा वारल्यावर सती गेली नाही म्हणून त्यांनी त्या काळी समाजातील टोमणेही खाल्ले होते. मतलब संपल्यावर त्यांची रवानगी घराबाहेर झाली. त्या नेहमी गप्पा मारताना माहेरच्या ओव्या गायच्या.

आईच्या माघारी सोडले गाव, माहेरचे आता नुरले नाव माहेर म्हणजे काय? भातुकलीचे खेळ, बाहुली, बांगडया, फ्रॉक, मैत्रिणी यांचे एकत्रित चित्र? बंद लिफाफा बाहुला बाहुलीचे लग्न एक वचन एक वचन वंचना, एक भ्रामक प्रतिमा, एक कल्पना. मामी म्हणायच्या - भावाला लेकी झाल्या बहिणी विसरला. लोकसाहित्यात स्त्रियांना पारखे झालेले माहेर त्यांच्या शब्दांत दिसायचे. तसा विचार केला तर स्त्रीच्या आयुष्यात माहेर अस्तित्वातच असते का? कि एक लग्न होईपर्यंत रहायची जागा? सर्व काही ठीक असेल तोपर्यंत माहेर! काही बिनसले की शुक्रवारची कहानी सुरु होते. संकटकाळी माहेरची पारख होते. बहीण सुखात असेपर्यंत सगळं ठीकच असते. बहीण दु:खात आहे म्हणताच न जाणो जबाबदारी यायची म्हणून तिला टाळले जाते. दागिन्यांनी मढवून गाडीत येणाऱ्या बहिणीला धावत जाऊन स्वागत करणारा भाऊ अडचणीत मात्र दार बंद करतो. ते घर वडिलोपार्जित असले तरीही तिथे तिला हक्क नसतो.

माहेरहून सासरी येतांना वाटते
वाटेत माहेराच्या धावत मन जाते
गुलाब जाई जुई मोगरा फुलवितो
सासरच्या वाटेवर मात्र काटेच काटे
माहेरच्या नावाने हुंदका दाटे, स्त्रीचे घर नेमके कोणते?

सासरी येताना आठवतात, मागे पडलेले ते मुक्काम, ते गाव, ती माणसे, त्या गल्ल्या! पुन्हा कधी जायचे याचा हिशोब करुनच तर आपण बाहेर पडतो. पुढचे आमंत्रण घेऊन! माहेरहून

परत येताना स्त्री ठरवते की पुन्हा कधी जायचे? सासरी आल्यावर नवरा स्वागत करतो ते आपले घर जणू सांगते.

अग अग शेजीबाई येई जरा अंगणात

झाली पुरे भातुकली झेप घेऊ या गगनात

मोठी झालीस आता दाब हुंदका घशात. पाळण्यातल्या लेकराला घे पदरात.

नवरा म्हणतो एवढं काय वाईट वाटून घ्यायचे. इथे आंबे खा, इथे मजा कर. काळाबरोबर पुढे जायचे असते. 'माहेर संपल्यावर आपणच कुणाचे तरी माहेर व्हायचे असते. माहेरच्या कक्षा रुंद करायच्या असतात. ' पुरुषांना काय कळणार माहेर काय असते? माळ तुटताच मोती पसरावे तशी भावंड सर्वत्र विखरुन जातात. आईच्या माघारी ते घर संपतं. त्या गावी गल्लीबोळात हॉटेलं असतात जेवता येते, राहता येते पण माहेर मात्र हरवते. कुठेतरी तुटत राहते पण सांगता येत नाही.

सांगायला सगळे ठीक असते पण वाटेने माहेराच्या धावत मन जा

## १४ हरवेन मी

किती दिवस झाले मी आजारी आहे. नक्की आठवत नाही पण तीन महिने नक्कीच झाले. आधी ताप नंतर अनामिक त्वचेचे दु:खणे, मग अशक्तपणा असहय प्रतिक्रिया दवाखान्यातील वाऱ्या. एक महिना उलटला. वाटले कामावर जावे म्हणून त्या दिवशी कामावर जाऊन पाहिले. रोजची ती लोकल पण आज जास्तीच भरली होती. रोजचेच स्टेशन खूपच असहय वाटत होते. दोन गाडया सोडल्या पण तिसरीत दारात कधी तरी लटकलेच आणि अचानक एक उलगडा झाला. माझ्या हा आजार कदाचित मला असाच जन्म मरणाच्या सीमा रेषेवर तर लटकवत नाही ना बरे वाटणे न वाटणे. काही दिवस जाताच पुन्हा आजारपण येणे.

कधीही आजारपण आले की नवरा नेहमीच म्हणतो मानसिक आहे. सासू म्हणते शरीराला व्यायाम हवा. लोकल ट्रेनचा डबा प्लॅटफॉर्मच्या किती टोकाला असतो व दिवसभर किती चालले जाते हयांना कोण सांगणार आणि सांगून ऐकणार कोण? व्यायाम करायला तुम्ही वेळ द्या. मी करते तर म्हणे पहाटे पाचला उठून कर. रात्री झोपायला बारा वाजतात. पाचला कसे उठायचे तर म्हणे ''ईच्छाशक्ति हवी झोप कमी करायची. '' नोकरी करुन दिवसभर बिझी राहते. थोडक्यात काय माझा जगायचा हक्क मी घालवला आहे. माझा झोपण्याचाही घालवायचा आहे. माणसे असा विचार का करतात? नोकरीत मला काय झोपायचा पगार मिळतो? की स्त्रीला पाच तासाची झोप पुरते? कधी ताप म्हणून घरी राहील तर म्हणे तू घरी आहे. रंग देऊन घेऊ घर आवरुन घेऊ. सासू म्हणजे सारख्या सुचना आणि सुन म्हणजे सुचना नको मला जाणवतेय माझ्याच शरीरातील काही पेशी मला ओळखेना झाल्या आहेत. माझ्याच घरचे लोक मला राबवण्यापलिकडे माझी चिंता करत नाहीत. स्वार्थाचा कॅन्सर हया धरी पसरतो आहे. डॉक्टर म्हणाले, ''व्यायाम करत जा''मी म्हणाले. '' श्वास घ्यायला वेळ नसतो.''

डॉक्टर म्हणतात मनावर फार अवलंबून असते.

मी मैत्रिणीला म्हणाले, ''तुम्ही मनोविकार तज्ञाला दाखवा. ''

तेव्हा ती म्हणाली होती, ‘‘ तो तज्ञ माझ्या घरच्यांवर उपचार करेल का? मी बादलीभर औषधे खाल्ली तर नवरा अंगावर ओरडला की पाय थरथरतात. येता जाता कुणी कुणाला याला त्याला लाथ मारावी तसे ॲब्युजीव्ह वागणे सहन करावे लागते? मी कशी बरी होणार? खाऊ म्हटले जेवणाच्या टेबलवर बसले की वसवसा खेकसायला सुरुवात होते. तू हे कर, तू ते कर. हे लोक काय करणार तर पेपर वाचणार व गॉसीप करणार. आणि मी काय करायचे ते ठरवणार. मैत्रीण घरी भेटायला आली होती. ती रडत सांगू लागली, नवरा म्हणतो ‘‘तू मुलांना शिस्त लावली नाही. ’’ तुम्ही लावा ना मग! स्त्रीला आपले आयुष्य नसते का? पुरुष स्वार्थी असतात की माझ्या नशिबी आलेले लोक स्वार्थी आहेत. मागे पडलेले लोक चांगले होते की मागून आलेले लोक मतलबी आहेत? की सर्वच माणसे तशीच होती. माझे डोळे आता उघडले.

माझ्या सर्व आजारपणाच्या चाचण्या चालू होत्या व थोडी विश्रांती मिळाली असती तर चालले असते. पण त्यावेळी सासू गावी निघून गेली. गेल्या त्या गेल्या. त्यात फोन केला व म्हणाल्या, ‘‘मला तू तिथे घेतलेली साडी आवडत नाही. इथे येशील तेव्हा तू साडी आणू नकोस. पैसे दे, इथे घेऊ. ’’ क्षणभर मला माझ्या मेंदूला आकलनच होईना. मी कोण? हया कोण? आणि नश्वर देह नष्ट झाल्यावर साडयांचे काय करतात? पण मी बरे म्हटले. मी त्यांच्या लेखी कुणीच नव्हते. दुसऱ्याची मुलगी जगली काय मेली काय? आजारी पडो नाहीतर काहीही होवो. प्रेम म्हणजे खंडणी वसूल करणे. नाते म्हणजे वसूली. लग्न म्हणजे एक बिनहाताचा आठपायाचा ऑक्टोपस पायात पाय गुंतवतो पण मदतीचा हात पुढे करत नाही. लग्न म्हणजे स्वताच्या गुणांची गळचेपी करायची. सुपारी देणे, समुद्राला काळया मण्यांनी बांधून टाकणे. त्याच्या लाटा पाकिटात बंद करणे लग्नात नवरदेवाला सुपारी देतात ना - ती नवरीच्या गुणांचा, तीच्या स्वतंत्र अस्तित्वाचा खून करायची असते का? कितीही आजारपण असू दे घरी तडफडत मी जेवण बनवायला हवे का? कारण मला त्यांनी कामासाठीच तर लग्न करुन आणले? सर्व लग्नांचे पुढे असेच होते का?

लग्न म्हणजे गुलामांची खरेदी,

लग्न म्हणजे काही घोषणा.

न  जुळलेला विसंवादी सूर?

अकाली मरण? सुप्त गुणांचे खच्चीकरण?

लग्न म्हणजे ब्र न काढता दाबले जाणारे वेदनामय अत:करण?

वेदनेने पिळवटलेल्या हृदयाचा आक्रोश? रजा नाही म्हणून कामावर पोहोचले.  पगार घेता काम करा म्हणणारे होतेच! कामावरसुध्दा सर्वांना वसूलीच करायची होती.  टेबलभर काम होते. थकून घरी आले.  लोकलमध्ये एक बाई सांगत होती, काहीही होवो पण घरी आल्यावर जेवण वाढायलासुध्दा मी हवी.  अगदी मला बाथरुमला जायचेही स्वातंत्र नाही. ''कशाची वाट बघतेस वाढ लवकर! घरी पाणीसुध्दा मी द्यायचे आणि नंतर ते ट्रेडमीलवर धावणार व्यायाम करणार आणि मला म्हणणार तू सुध्दा व्यायाम कर. '' कधी करायचा आणि असेच आयुष्यात वेळेची ओढाताण करण्यात सुखाचे क्षण निसटून गेले.  हळव्या हळुवार प्रेमाऐवजी व माझा पगार हयांनी गृहीत धरलाय.  माझे कष्टही गृहीतच धरले आहेत.  इतकी वर्ष शरीरात शक्ति होती वाटले नाही, जाणवले नाही.  मी राबत राहीले. कुठलीही छोटीशी मदतही सासरच्यांनी केली नाही.  आता मला होत नाही तर म्हणतात, ''तू म्हातारी झालीस. '' दुसऱ्या दिवशी पुन्हा कशीतरी ऑफिसला गेले. आपण सगळीकडेच उपऱ्या असतो कंपू करून गॉसीप करता येत नाही म्हणून नावडत्या ठरतो. त्या दिवशी ऑफिसमधील एका मैत्रिणीला अपघात झाला होता.  साहेबांनी मला व रंजूला तिच्या घरी पाठवले. ती ग्लानीत होती. आम्हाला बघून तिने डोळे उघडले व म्हणाली, ''ज्या घरासाठी कष्ट करतो ते आपले नसते. ज्या व्यक्तिसाठी करतो ते आपले माणूस नसते. मुलांना आपल्याबरोबर रहायचे नसते. पैसा हवा व सोय म्हणून ते आपल्याकडून फायदा काढत असतात. हया शोषणापासून सावध रहा.  डोळे उघडा.  तुम्ही कातडीचे जोडे घातले आणि चोवीस तास न झोपता राबलात तरीही सासरच्यांना ते कमीच आहे.  तुमचा नवरा कसा आहे माहीत नाही पण सावध रहा. ''

तिचा लबाड नवरा आसपास फेऱ्या घालू लागला.  मी तिला म्हणाले, ''सर्व घरी हेच असते. '' ती म्हणाली, ''पण रबर तुटण्यापूर्वी सावध व्हा. श्वास गुदमरण्यापूर्वी आवाज उठवा. ''

बिनधास्त फुलनदेवी म्हणून प्रसिध्द असलेली आमची मैत्रिण आमच्या डोळयादेखत निपचित होऊन पडली. समोर तिचा देह पडलेला असतानाच सासू आम्हाला ''आता हयाचे दुसऱ्या लग्नाचे बघा. एखादी नोकरीवालीच बघा'' म्हणू लागली. मला तिच्या कानाखाली एक वाजवावीशी वाटली पण मी गप्प बसले. कदाचित त्यांच्या घरची तीच पध्दत असेल. गेलेली मुलगी तिची नव्हती, कुणा दुसऱ्या घरुन आलेली होती. दुसऱ्याची मुलगी होती. खरेतर ऑफिसकडून खर्च मिळाला असता. यांनी तिला डॉक्टरकडे न्यायचे टाळले. दुर्लक्ष केले. का केले? वर तडफदार दिसणारी ती धीराची मुलगी ही खूपच सहन करीत होतीच की. सर्वच खून उघडकीला येत नाहीत. सर्वच विसंवाद जगजाहीर होत नाहीत. परमेश्वर म्हाताऱ्यांना आधी अशा सिनिओरिटीने माणसे का उचलत नाही. त्यामुळे तरुण अकाली जातात, म्हातारे जगतात. ही वेदना हेच सत्य नाही का?

मृत्यु म्हणजे काय देवाचा मनमानी कारभार?

मृत्यु म्हणजे सुटका. मृत्यु म्हणजे जुना खेळ तोडणे, भातुकलीचा डाव मोडणे.

मृत्यु म्हणजे नवा भातुकलीचा खेळ मांडण्यासाठी प्रस्थान. लग्नाचा जुगार समजू शकतो. त्रास देणारे भाऊ कधी समाजाने पाहिले आहेत? हिन्दी सिनेमा असता तर आपण हे घर विकू या व हुंडयात पैसे देऊन तुझे लग्न करुया म्हणणारे भाऊ असतात. प्रत्यक्षात मात्र माझे भाऊ लवकरच माझा तो महाल ते घर बिल्डरला देण्यासाठी पाडण्यासाठी देणार होते. कित्येक कोटींचा व्यवहार झाला होता. पण माझ्या लग्नासाठी खर्च करायची माझ्या भावांची इच्छा नव्हती. त्यांना वाटत होते की तीने आत्महत्या केली तरीही चालेल पण आमचा पैसा वाचावा. भांडण झाले की विहीरीत उडी मार, मोठी आली जगणारी म्हणत असत. गरीबाघरच्या मुलींना छोटया छोटया ईच्छा मारायची सवयच असते. अनेक ईच्छा मी मारत आले. कारण मी मुलगी होते. पाडलेला महल अद्ययावत पध्दतीने प्लॅट पध्दतीत हॉटेल रुपात बांधला जाईल. पण पडझड झालेले हे मन पुन्हा जुळून येईल का? माझी समस्या सुटणार नाही हे सत्य मी स्वीकारले.

घरी नवरा समजूत घालू लागला, ''पाहिजे तर नोकरी सोड. '' प्रत्येकजण आपापल्या परीने प्रश्न सोडवतो. जगण्याचा आनंद उपभोगतो. माझे काय बिनसले आहे मलाच समजत नाही माझ्या निराशेचे मुळ माझ्या बालपणात असावे. कष्ट व दु:खाचा बागुलबुवा करुन उपयोग नसतो. जिथे तिथे हात घालू तिथे अपयश, फसवणूक, गुंतागुंत पैशाचे हिशोब हे माझे दुर्दैव आहे कि माझ्यातच काही दोष आहे. माझ्याच अपेक्षा अवास्तव आहेत. हुंडा देऊ न शकणाऱ्या मुलींनी लग्नच करु नये. एखाद्याबरोबर असेच रहावे, मैत्रीत, नोकरीत, प्रेमात फसवणूक होतच राहते. कुठेही न फसलेली कुणी व्यक्ति जर हे वाचन करेल तर त्याने मला जरुर लिहावे. मला त्याची सुखाची गोष्ट ऐकायला, सांगायला खूप आवडेल. तोपर्यंत तरी गरीबाघरच्या मुलीची ही गोष्ट अशीच असते.

त्याच रात्री आमच्या शेजारच्या चाळीतील नंदाने घरी पंख्याला फास लावून आत्महत्या केली. नंदाचे लग्न ठरत नव्हते. ठरले तरी हुंडयासाठी बैठक ठरे व मोडे. सर्व उपाय करुन झाले पण तिच्या वडिलांची १/१ एक तोळा सोने, एक लाख हुंडा इतकीही ऐपत नव्हती.

कित्येक घरी मुली विहीरीत पडून, स्वयंपाक करतांना जळून मरतात. तू मेलीस तरी चालेल म्हणणाऱ्या आई वडिलांवर, भावांवर कधी आत्महत्येला प्रवृत्त होण्याची केस लागल्याचे ऐकले आहे? स्त्री भ्रूणहत्या होऊ नये मान्य आहे, पण जगलेल्या मुलींच्या आयुष्याची क्वॉलिटी सुधरावी असे कुणाला वाटत नाही. - मी.

काम, क्रोध, मत्सर हे षडरिपू म्हणायचे दिवस गेले आहेत. नवे शत्रू कोणते. दूरदर्शन, वर्तमानपत्रे, कॉम्प्युटर, मोबाईल फोन अहंकार स्वार्थी विचार. स्वत:ला सगळी सुख हवी दुसऱ्याने मात्र हाडाची काडे करायची. ऑफिसमध्ये मैत्रिणीला म्हटले मला हल्ली होत नाही. नवरा मदत करत नाही. ती म्हणाली, ''तुझा नवरा तसाच होता. लग्न झाल्यादिवसापासून तो तोच होता. पण प्रेमाची झापड तू डोळयावर बांधली होती. त्यामुळे तुला कळले नाही. तुझी नोकरी नसती तर झोपडी विकत घेण्याइतपत जमले असते का त्याला?'' मला इतकी टोकाची भूमिका नको वाटते पण सहजीवन हवे असेही वाटते.

‘‘लग्न जपून ठेव म्हणतात त्यामुळे सहन करावे लागते.  माझ्या शारीरिक कष्टांच्या मर्यादा जाणून का घेत नाहीत?’’ - मैत्रीण.

ती म्हणाली, ‘‘जुनी खोडे मजबूत होती.  आपल्या आयांनी, सासवांनी चांगले तूप खाल्ले होते.  त्यांना ना त्रास ना शीण.  ते अजूनही ठणठणीत आहेत.  त्यामुळे आपल्याला नोकरीत कष्ट असतात.  हयाचा विचार कुणी करतच नाही.  शिवाय हया अशा लोकांना घेता किती घेशील दोन करांनी अशा रितीने वसुलीची सवय असते. ’’ ‘‘मला हल्ली जगणेच नको वाटते. ’’ एक मैत्रीण म्हणाली. मी करवादले. ‘‘अग तुला काही झाले तर आयती प्रॉपर्टी आहेच. तेव्हा ते लोक मजेत राहतील. आता तुला बाहेरचा डबा नको घरचा स्वयंपाक हवा म्हणतात.  तेव्हा आयुष्यभरासाठी बाहेरचा डबा लावतील.  तू असे काही करु नकोस.  आपल्या फुलनदेवी मैत्रिणीच्या सासूचे पाहीलेस ना.  त्यांना पुनर्विवाहाची घाई झाली आहे’’ ‘‘मन उभारी धरत नाही. आपण कुणाचेच लाडके नाही.  आपण सर्वांनाच नकोशा आहोत असे वाटते. नवरा बायको मध्ये काय घडते काय बिघडते ते त्यांनाच कळते’’ रंजू म्हणाली ‘‘अग पुरुषांची ती खास युक्ति असते. आरडाओरडा करायचा किंवा तुझे तू बघ म्हणायचे म्हणजे निर्णयाची जबाबदारी स्वीकारावी लागत नाही.  शिवाय तो निर्णय चुकला तर तूच ठरविले मी तर नाहीच म्हणत होतो. म्हणून तोंडसुख घेता येतो. हात झटकता येतात. ’’ एक वृध्दा सांगू लागली.

लग्न म्हणजे सहजीवन हवे ना!  मी.  ती मैत्रीण म्हणाली, ‘‘नाही लग्न म्हणजे नुसतेच असहय जीवन! आनंद पराभव विरोध स्वीकार मृत्यु! हया पाच पायऱ्यांवरुन आयुष्याची वर्षे निघून जातात.  जेव्हा डोळे उघडतात. हातात शून्य असते. मग मुलांसाठी तडजोड करायची. माझी मुले प्रिय म्हणत त्या स्वप्नांमागे धावायचे व एकटेपणाने शेवटी गप्प बसायचे कारण मुलांकडून सुध्दा अवाजवी अपेक्षा ठेवून उपयोग नसतो.  मुलेसुध्दा पाखरांप्रमाणे उडून जातात. अर्ध्या घरी अमेरिकेला गेलेली मुले परत येत नाहीत. ’’

‘‘मग आपण कुणाच्या आधारावर जगायचे?’’ मी.

‘‘तू रजोनिवृत्तीबद्दल औषधोपचार घे. मेंदूमधील सिरोटोनीनच्या कमतरतेने सुध्दा निराशा वाटते. आणि वयोमानाने शरीर म्हातारे होणारच. फक्त तू लक्षात ठेव वृध्द होते ते शरीर. नष्ट होते ते शरीर. चिरंतन असतो तो आत्मा. ’’ ‘‘मला नोकरी झेपत नाही. ’’ मी. ‘‘ठीक आहे तू काही दिवस स्वता:साठी जगून बघ. रजा घे. बदली घे. तुला काही झाले तर सर्व पैसा टाकून, उपभोग न घेता वर जाशील. एखादा छंद जप. ’’ मला एखादा छंद जपायचा आहे. मी खूप चांगली चित्र काढायचे. पण हया घराने माझी उडान थांबवली. माझे पंख छाटले. त्यांना मोलकरीण हवी होती. मोराने कोकिळेप्रमाणे गावे. नोकरी करणारीने गृहस्वामिनीप्रमाणे घरकाम करावे. हया त्यांच्या अपेक्षेमुळे मी आतल्या आत मिटून गेले. मी सुवर्णपदकधारक होते. पण फक्त शून्य म्हणून उरले. मी रडू लागले. ‘‘असू दे आता शांत हो व आपण मार्ग काढू. तू दुर्लक्ष कर आणि एक ठरव माझे सुख मी इतरांवर अवलंबून ठेवणार नाही. त्याचा स्वभाव तसाच पिरपिऱ्या आहे समज व दुर्लक्ष कर. माणसाला अनुल्लेखाने मारणे फार लागते. जाऊ दे तू तुझे बघ. माझा श्वास माझा आहे. माझे शरीर माझे आहे. ’’

मी - मला जमेल का?हरवेन मी मिळवेन मी

ती - बघ प्रयत्न करुन! दु:ख वाटले की कमी वाटते.

**मी, माझी बदली धूळवडगढीला**

मी आता बदल करायचे ठरवले आणि सुदैवाने माझी बदली झाली. हया खेडयातील धूळवडगढी नावाच्या छोटयाशा गावी आले. मला जे घर मिळाले आहे त्याचे नाव आहे माहेर. ऑफिसच्या बिल्डींगचे नाव आहे मातोश्री. इथल्या एका छोटया म्हणजे फारशा प्रचलित नसलेल्या साप्ताहिकात मी थोडे थोडे छोटे छोटे काहीतरी लिहीते. खूप वाचन करते. कधी कधी नवऱ्याची, मुलांची आठवण येते. हरवलेल्या गोष्टींचीसुध्दा आठवण तर येतेच ना! तब्येतीचे प्रश्न इथेही आहेतच. मरण तर निश्चितच असते पण जगून घेते. किती छोटी अपेक्षा होती माझी ती सुध्दा मी पंचवीस वर्ष दाबली. स्ट्रगलरचे आयुष्य मी चालू केले आहे. माझ्या मैत्रिणीने मला होकारात्मक

सूचना दिली. मनाला वाटेल ते वाटेल तसे लिहीत सुटले. छापले जाण्याची वाट न पाहता लिहिले. कधी कधी असुरक्षित वाटते. पण देवावर भरोसा टाकला आहे. आता मी झेपेल तेवढच` काम करते. कुणी चांगले म्हणावे ही अपेक्षा न करता गप्प बसले. स्वताशीच माझे वेगळे नाते आहे. मी फक्त माझीच आहे. माझे घरातील स्थान व हे मातोश्रीतील स्थान परस्पर विरोधी आहे. जर हे दोन्ही पूरक बनले तर कितीतरी स्त्रिया अधिक आनंदी बनणार नाहीत का?

प्रेम म्हणजे काय दोष शोधणे?

बाई म्हणजे काय स्वयंपाकीण? बोलणे म्हणजे काय वाक्बाण फेकणे?

विसंवादाचे ओझे कशासाठी हवे? मी इतरांना बदलू शकत नाही. माझी त्या घरातील स्टेटस जाईल. जाऊ दे. मी स्वत: तर बदलायचे ठरवले आहे. थोडेसे हरवून तेसुध्दा बरेच काही मिळवू शकत होते ना! पण घरातल्यांनी व त्यांनी मात्र आयुष्यभर मलाच हरवण्याचा विचार केला. आता पैलतीर जवळ आला आहे. हरवलेले परत मिळणेही शक्य नाही. अर्ध्यावाटेतून परत जाणे सोपे नसते. काहीक्षण जगून घेणे. हया जन्मी मुक्ति शक्य होती का? स्त्री मुक्त होऊ शकते का? आयुष्यभर संघर्ष केला. पूर्णविराम कधी येईल कुणालाच माहीत नसते. तरी आपण धावत असतो. आता हा अर्धविराम समजून मी आजारपणाला तोंड देते आहे. भूतकाळांच्या आठवणींइतकीच वर्तमानाच्या ठेचांनी सुध्दा जखमी होते आहे. तरीही हरवेन मी मिळवेन मी फिरुनी नवी जन्मेन मी म्हणून गाते आहे.

पान लागल्यासारखी मी हरवून वावरत होते. मोजून दिवस काढत होते. एका रात्री झोप येईना. गॅलरीत उभी राहीले. गार वारा सुटला होता व वाऱ्यावर केस उडत होते. लाईट गेले. अंधारात चमकणाऱ्या चंद्र चांदण्या, झाडी व ओढे गावातील दूरवर दिसणारा भूतबंगल्यासारखा महाल ते खेडेगाव बघत बसले. आईच्या बोलण्यात त्या महालाचा उल्लेख असे. कदाचीत त्या महालात जाण्याचे योग असल्यांनेच तेथे बदली झाली असावी नंतर शांत झोप लागली. सकाळी ऑफिसला गेले. शिपाई सांगू लागला काल सामंतसाहेब वारले. झोपेतच गेले. वाटणे व वारणे जवळजवळ सारखेच! आपण अचानक झोपेत मेलो तर कोण बघणार? नवऱ्याचा फोन आला.

घरी जावं वाटू लागले.  रस्त्यावरच्या एका स्मशानातील कबरीकडे, थडग्याकडे बघायची सवय लागली. वाटले एक दिवस आपणही यातलेच होऊन जाऊ.  रडायलाही कुणी नसेल.

एक दिवस ऑफिसच्या दारातून मी आशाराजे बाहेर पडले.  एका जीर्ण पान गळालेल्या झाडावर बसून एक पक्षी गात होता.  एकटाच मग्न, तल्लीन बाजूच्या खंडहरची पर्वा न करता तो गातच होता.  मीही तसेच दिवस काढत राहीले.  एकाकी पक्ष्याप्रमाणे गात राहीले.  एक दिवस एकाकी राहणाऱ्या वृध्देचा झोपेत मृत्यु हया बातमीने थोडी खळबळ माजेल व शांत होईल.  पण आज वाटते हरवेन मी मिळवेन मी हे खरे असते का?  की तो एक फीलगुडचा फसवा फुगा असतो.  हरवून मिळणारी गोष्ट मिळते.  तेव्हा हरवलेल्या गोष्टीचे दु:ख बोचत राहतेच ना! मौसम बदलला निर्सगाने कुस पालटली. पाऊस सुरू झाला.

हरवेन मी मिळवेन मी? की मी हरवेन हेच खरे! संध्याकाळी कामावरुन पाय ओढत मी घरी आले.  समोर नवरा व मुलगा उभे होते.  ''मॉम घरी चल. '' लेक म्हणाला.  मी माझे करियर सोडून घरी आले.  मी हरवले? मी मिळवले?

मी नोकरी सोडली व पुन्हा त्या सासर घरी आले.  जगण्याचा मोह मला बोलावत होता. मी हरले पण मी माझे घर माझे कुटुंब मिळविले.  नोकरी सोडून धूळवडगडीचा महाल न बघताच निरोप घेऊन परत आले. संसार असे तडजोडीनेच चालतात. काहीतरी हरवूनच काहीतरी मिळते.

............................ **२**

साठे म्हणाले की आशाराजेची कथा अशी होती

त्या रात्री महालाच्या अंधारातून आदित्य राजेंना साठे पिशवीत काहीतरी भरून दबक्या पावलांनी बाहेर पडतांना दिसले. त्यांनी रजनी राजेंना सांगून साठेना अडवले. रजनी राजेंनी साठेची पिशवी हिसकून घेतली व म्हणाल्या, '' चोर, महालातील चांदिचा पत्रा चोरला? '' रजनी राजेंनी त्यांची पिशवी जमिनीवर ओतली. साठे म्हणाले, '' मारून टाका पण चोर म्हणू नका '' पिशवीतल्या सामानात आशाराजेची हस्तलिखीते, एक रिकामी दागिन्याची पेटी होती ती साठेचीं

होती त्यात आशा राजेंचे कागद काही जीण्ण फोटो होते. सामान भरून साठे महालातून डोळे पुसत निघून गेले.

आदित्य राजे पत्नीला म्हणाले, ‘‘ अपमानामुळे उदयापासून साठे येणार नाहीत’’

रजनीराजे म्हणाली, ‘‘ बरे झाले पैसे दयायला नको ’’

दोन चार दिवस साठे आले नाहीत. मी अस्वस्थ झालो मी वाच्छांनी तर्फे साठयांना लिखाणासाठी परत येण्याचा निरोप पाठविला. साठे आले नाहीत. त्यांना दबाव आणला साठे आले

राजे साठेंच्या खोलित बसले. आशाताईच्या रागात नादात साठे दारातून बाहेर पडले होते.

पिशवीतल्या सामानात हस्तलिखीतात राजेंनी साठेंची डायरी,आशा राजेंची डायरी,हातात फाईलमध्ये आशा राजेंची काही लिखाणाची कात्रणे आणली होती. राजे वाचू लागले.

ती आशा राजेंची होती. पुन्हा जुन्याच वृत्तपत्रातील नोकरी सुरु झाली होती. ती डायरी होती.

आशाराजे चे डायरीतील लिखाण मी तुझेच गीत गात आहे नावाने छापले जाइ.

**१४ चला, दोस्तहो...**

आजचा लेख तरुण पिढीसाठी आहे. हो! कबूल! स्त्रियांचे प्रश्न असुरक्षितता, स्त्रीभ्रूणहत्या हे माझे नेहमीचे ठरलेले विषय असतात. लिखाणात आई, जिजामाता हे विषय असतातच. पण मी तरुण पिढीबद्दल तरुणांच्या प्रश्नावरही लिहावे असे मला सुचवले गेले. खरेतर त्या दृष्टीने विचार न केल्याने मला कधी हा विषय सुचलाच नाही. मुलगा तरुण झाला तरी तो सुपुत्र व आपण मॉं साहेब (आई) असतो. त्यामुळे तरुणांचे प्रश्न काय असतील बुवा? मला समजेच ना! तरुणांचे ऐंशी साली मुंबई गाठणे हे ध्येय असे. साधारण १९९३ साली ग्लोबलायझेशनमुळे परदेशी नोकऱ्यांत लक्षवेधी वाढ झाली व तरुणांना परदेशी नोकरीचे आकर्षण वाटू लागले. त्या काळी गाणीही मुलगा परदेशी व घरची माणसे व्याकूळ झालेली. ‘‘पाखरा येशील कधी परतून’’ अशा अर्थाची होती. ही भरभराट कमी झाली व २००८ आले तर डॉक्टर सलील कुलकर्णी या युवा संगीत दिग्दर्शकाच्या भाषेत बोलायचे तर....

जरा चुकीचे जरा बरोबर बोलू काही
चला दोस्तहो आयुष्यावर बोलू काही.

आता इ. स. २००८ साल जागतिक मंदीमुळे खूपच गाजले. १९९३ पासून चंगळवादाकडे व आर्थिक सुबत्तेकडे धावणारे सर्वच देश २००८ साली गोंधळून गेले. मंदी कुठे नेते या भितीने हैरान झाले. वेगाने झालेल्या प्रगतिमुळे बदलामुळे बऱ्याच घरी मुले परदेशी शिक्षण अथवा नोकरीनिमित्त गेली होती. नोकऱ्याही सहज मिळत होत्याव पगारसुध्दा आकर्षक होते. परदेशी रहायची सवय, ओढ किंवा मजबूरी या कारणाने अनेक भारतीय अमेरिका, ऑस्ट्रेलिया, युरोप, जपान अशा देशांत बऱ्यापैकी स्थिरावले होते.

भारतीयांचा परदेशी ओढा बघून बऱ्याच शिक्षणसंस्था भारतीय विद्यार्थ्यांना मोहीनी घालू लागल्या. छोटया मोठया नोकऱ्या करुन परदेशी पोट भरणाऱ्यांची संख्या लाखाच्या घरात आहे. काही दिवसांनी परदेशी भारतीयांना बोलावणे त्यांचे राहणे व इतरही सुविधा द्यायला नको महणून परदेशी नोकऱ्यांचे कामांचे भारतात आऊट सोर्सिंग केले गेले. त्यांच्या व आपल्या वेळेत म्हणजे

भारतीय प्रमाण, वेळ व अमेरिकेची / त्या त्या राष्ट्राची प्रमाण वेळ यातील अंतरामुळे रात्री काम करावी लागणारी कार्यालय, कॉल सेंटर यांची चलती चालू झाली. बदलत्या जीवनशैलीमुळे काही तरुण बहकू लागतो. पण ज्यांचे पाय स्थिर नीतिमूल्यांवर टिकून होते त्यांनी आपले भवितव्य आपल्याच हाती उज्वल केले. बॅंक, सिटीग्रुप रॉयल बॅंक ऑफ स्कॉटलॅंडने कर्मचारी / पगार कपात सुरु केली आहे. आणि एक दिवस अचानक पूर्ण जगालाच मंदीने ग्रासले. डॉलर घसरला, सेन्सेक्स कोसळला व परदेशातील नोकरीच्या संधीही कमी झाल्या व भारतात आऊट सर म्हणजे उपकार्यालयेही डबघाईला आली. नोकरी कपातीची गदा अनेकांवर कोसळली आहे तर काहींवर कोसळणार आहे. काळ कठीण आहे. नोकरी सुटली म्हणन परदेशाहून भारतात परत येणाऱ्यांची संख्या सध्या लक्षणीयरित्या वाढली आहे. मेट्रोपोलिटन शहरात म्हणजे महानगरांतही नोकऱ्यांत कपात केली जात आहे. पगार कमी केले जात आहेत. सर्वत्र एकप्रकारचा ताण भरुन राहीला आहे. बदलत्या काळाच्या संक्रमणात आव्हाने करियर शिक्षण यांमध्ये तरुण गोंधळून गेलेसे वाटले. तरीही हया संवादांमधून असे जाणवले की हया तरुणांमधील बहुतांश तरुण सुसंस्कारित व कुटुंबीयांचा आदर करणारे आहेत. संयम व शिस्तीचे भोक्ते आहेत. नातेसंबंध जपतात. उदा. नसतेस घरी तू जेव्हा

जीव तुटका तुटका होतो

जगण्याचे तुटती धागे संसार फाटका होतो

हया कवितेप्रमाणे नातेसंबंध टिकवण्याकडे त्यांचा कल आहे. रेव्ह पार्टी, व्यसने, उथळपणा हयांच्यापासून बहुतांश तरुण अजूनतरी कोसो दूर आहेत. संस्कृति व परंपरांवर अजूनही या तरुणांचा अटल विश्वास आहे. तरुण पिढीवर देशाची भिस्त आहे. सकारात्मक रहावे असे विचार आजच्या आतंकवादाच्या वेळी खूप आवश्यक आहेत. परिस्थिती, पर्यावरण, ग्लोबल वॉर्मिक, संस्कृति ऱ्हास जागतिक मंदी यांनी झाकोळलेल्या परिस्थितीत कधी कधी वाटते.

दिवस असे की कुणी माझे नाही

मीही कुणाचा नाही

खरे सांगायचे तर

कुणीही कुणाचे नाही,कसलाही भरवसा नाही

त्यावेळी सांगावेसे वाटते की तरुण पिढीकडून खूप आशा आपण बाळगू शकतो. ‘‘अपना सपना मनी मनी’’ अशी वृत्ती त्यांची नाही. अतिशय विचारी विवके संपन्न तरुणांच्या पुढच्या पिढीच्या हाती या भारत देशाचे भविष्य पूर्णतया सुरक्षित आहे. चला दोस्तहो देशासाठी करुया काही! सुजाण अशा त्या तरुणांना शुभाशीर्वाद. आशाराजेचा हा लेख खूप गाजला.

मध्यंतरी बदली घेऊन गेली म्हणून गोष्टीवेल्हाळच्या संपादकांना तिचा राग आला ते तिला पुन्हा संधी घ्यायला, नोकरीवर घ्यायला नकार देऊ लागले. त्यांना आशा राजेंनी खुले पत्र लिहिले होते.

## लिखाण १६

**''अर्धाच टाकूनी डाव जायचे अंती**

ध्वज नाचत राहिल कुणाकुणाच्या हाती''

यातून तुम्ही काय संदेश देऊ इच्छिता? बोला ना! '' एक समीक्षक आशाराजेवर बरसला

ती गप्पचे .

''आता थोडक्यात सांगतो काय सांगायचे आहे ते नवीन वर्षात निश्चत करा – असे लिहायचे कि.

..... पंचेद्रियांना सुख होईल.

त्यात नाद असेल पावसाच्या सरीचा! - कानांसाठी

त्यात गंध असेल हळव्या सोनचाफ्याच्या ! - घाणेंद्रियांसाठी

ते दिसेल अंगणातल्या रांगोळी प्रमाणे! - नेत्रसुखासाठी

त्यात स्पर्श असेल कमळपाकळीवरच्या दवाचा! - स्पर्शेद्रियांसाठी

त्याला चव असेल आईने भरवलेल्या वरणभाताची! - जिव्हेसाठी

तोच साचा नको, धक्का तंत्रही नको – लेखन सोपे नसते तपश्चर्या असते.

एक समीक्षक म्हणून सांगतो आहे लिहा. ''

वाक्य अर्धवटच तोडून त्यांचे बोलणे खोडत मी म्हणाले. ''सर नाही नाही मी या वर्षी निश्चय केला आहे मी खूप खूप वाचीन लिखाणाचे नंतर बधू! ''

ते पुढे खेकसले, ''म्हणजे तुमच्या मनात दडलेल्या त्या कुणास तुम्ही ओळखलेच नाहीत म्हणायचे – अहो तो तुमच्या मना जो कुणी दडला आहे ना तो एका नवोदित लेखक आहेत. स्ट्रगलर मॅडम पुढे लिहीत राहा. आशाराजे तुमची स्टगलरची कथा आवडली. तुम्हाला लिखाणासाठी शुभेच्छा''

तिकडून फोन रिसीव्हरवर आपटण्याचा आला.  मी ही फोन ठेवला व दमून वेडीवाकडी सोप्यावरच रात्री कधीतरी बेल वाजल्याने जाग आली. नवरा व मुलगा सिनेमा बघून आले होते. फोनबददल सांगावे  कि न सांगावे तरीही नवऱ्याला सांगितले – ते म्हणाले. ‘‘ कामाचे फारच टेन्शन घेतले आहेस.

मनात जो कुणी आला आहे ना तो म्हणजे लेखक असावा. त्यामूळे लिखाण करण्यास जमले नाही. म्हणून स्वप्न पडले असेल. किंवा मनाचाच खेळ असेल? किंवा तुझेच दोष तुलाच जाणवले असतील. तरीही माझ्या मनात कुणीतरी लपले आहे असे मला वाटायला लागतं तसे प्रत्येकाच्याच मनात कुणीतरी लपलेल असतेच ना! वेगळेच

वाचकाच्या रूपाने!

लेखकाच्या रूपाने!

स्ट्रगलरच्या रूपाने! तुमच्या मनात कोण लपले आहे?

’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’

माझे डायरी  लिखाण वाचनाने मन लागेना.

हो मी राजेनी संदेश देऊन लिखाण करण्यास साठेना  परत बोलावले.

मध्यस्त  घातले,ते आले. लेखन करतो म्हणाले.

मी राजे सांगू लागलो. पण साठे गप होते. मनातुन बोलले नाही.

**साठे आले**

**मी राजे सांगू लागलो.**

आशा राजेने गोष्टी वेल्हाळपणा व लिखाणाची शैली सोन्याभाऊ साहेबांकडून आईकडून उचलली होती. ताईचे एक पुस्तक मध्यंतरी वाचण्यात आले मध्ये मध्ये ती लेख लिहायची पण गोदावरीचे पाणी पुस्तकाचे बरेच कौतुक झाले.  म्हणून एक कॉपी आणून वाचले. माझे व सिताराम भाऊंचे संबंध वरकरणी ठिक होते पण बहिण भावांचे मार्दव, भावबंध त्यात नव्हते.

Sisters spread Joy & Boys breed distress ताईचे व वसुधाचे संबंध हेवा वाटावे असे चांगले होते. खरेतर मला बहीणींचा रागच येतो त्यांचे फोन करणे त्यांचे ब्यूटी पार्लरमध्ये जाणे पण ताई कधीच जायची नाही राजे सांगू लागले. पण साठे व त्यांची नाती बोलली नाही. एका अभ्यासाने सिध्द केले आहे की मुली आनंद पसरवतांत उलट मुलगे घरातील वातावरण तणावपूर्ण करतात. ज्या कुटुंबाची पाहणी करून असा निष्कर्ष काढण्यात आला आहे की बहीणी खूपच आनंदी राहतात. त्या पाहणीत २ भाऊ, २ बहिणी, १ भाऊ + १ बहीण, १ चुलत बहीण, चुलत भाऊ अशा वेगवेगळया कुटुंबाना पाहणी करून हा निष्कर्ष काढण्यात आला आहे.

साठे म्हणाले, ''मुली संघर्ष करण्यात म्हणजे संकटाना तोंड देण्यात धीट असतात. डी मॉण्टफोर्ट व डस्टर या युनिव्हिसिटीत डेव्हलप सर्व्हेत हे निष्कर्ष काढले गेले. मनोवैज्ञानिक व लिज राईट व डी मॉनपार्ट यांना सांगितले कि आईवडिलाच्या भांडणात मुली बोलून स्वत:ला व्यक्त करून कुटुंबाला एकत्र ठेवण्याचा प्रयत्नं करतात. मुली असलेल्या घरांत विच्छेदांना तोंड दयायलाही सोपे जाते. तणाव कमी असतो कारण नैसर्गिकरीत्या मुली शांततेला कारणीभूत होतात. मुलगे असले तर आज ते स्वत:ही बोलत नाहीत व बहिर्णींनाही बोलू देत नाहीत अधिकाधीक ऐहिक सुखाची हाव मुलांत असणे तर मुली तृप्त पटकन होतात. प्रेम बाबत मुली कळया तर पुरूष मनीप्लॅण्ट ही वृत्ती असते. ''

आशाराजे सासरी नांदतेय ठीक आहे पाहून मी आशाराजे कडे गेलो खूप पश्चाताप झाल्यासारखे नाटक केले व तिचा हात पकडून म्हणालो. ''विसरलीस आपले भावाबहिणीचे प्रेम'' आशाराजे च्या नजरेत अविश्वास होता.

राजे सांगू लागले. पण आशाराजे बोलली नाही. मी घर फुंकून टाकले होते आता ती वाटा मागू शकत नव्हती. मीच राजमहलच्या घरात कसातरी रहात होतो. आशाराजे येवू शकली नसती आणि आली असली तरी माझ्या बायकोने तिला चार दिवसात पळवून लावले असते किंवा तिलाच लुबाडले असते. तसा विचार केला तर मी आता म्हाताराच झालो आहे ओरबाडून मला पैसा

मिळाला पण आरोग्य नाही, सुुखही नाही, हातातून सुटू पाहणारे तारुण्य मी धरू शकलो नाही. आशाराजे भोळी होती. बावळट व मुर्ख होती – माझ्या नाटकाला व खोटया नाटकी विभ्रमांना सहज फसेल असे वाटले. तुझी आठवण म्हणून एखादा दागिना मागून घ्यावा असेही वाटले, रेस खेळायला उपयोगी पडला असता पण तो बेत मी पुठच्या वेळेसाठी ठेवला. ‘‘अजून रागावलीस आहेस का? ’’ मी विचारले ती गप्पच बसली. मोठी भावजय मध्येच बोलली अरे आशाराजेवर अन्याय झाला, ती रागावणारच तुझे चुकले’’ मी नाटकी आवाजात म्हणालो

‘‘ हो चुकले पण मन मोठे करून क्षमा करावी शिवाय मी हे तिच्या भल्यासाठीच केले. माझ्या मुळेच तर दुसऱ्यांदा तिचे चांगले झाले. आशाराजे चे  लग्न झाले ती स्थिरस्थावर झाली. मला मोठा भाऊ नाटकी पणाने म्हणाला पहिल्यांदा तूच तिला खडयात घातले माणसाला त्याचे कर्म याच जन्मी याची देही याची डोळा फेडावे लागते.  आशाराजे ने तिला प्र्रुव्ह केले, ती खूप पॉझिटीव्ह आहे – नवऱ्याजवळ रहाते.

मी म्हणालो ‘‘हो रहायलाच हवे, नकोशा नातेसंबंधात राहूनच तर स्त्री मोठी ठरते आशाराजे ला मी पहिल्यापासूनच सांगत होतो. ’’ घटस्फोट होऊ नये तिला सूचवले होते.

पहिल्याच घरी तिने नांदायला हवे होते.  आपल्या मुलीला माहेर हवे म्हणून नकोशा वाटणाऱ्या सासरी स्त्री नांदते. अशी एक ओवी आहे कसेतरी दिवस काढायचे कुणाशी संबंध ठेवता आला असता, नवरा वेडा होता तर काय झालं, सासरी जळून मारावे पण मुलींनी परत येऊ नये. आपले उच्च घराणे मोठा भाऊ म्हणाला ‘आपले उच्च खानदान आहे. आपल्या घरी सतीची समाधी आहे.

खरा लबाड माणूस हाच!  याचे आम्हा बहीणी भावंडात कोंबडयाची झुंज लावून दिली व मजा पाहिली ईस्टेट हडपली. बहीणीला घराबाहेर काढणे, कुठल्या ईज्जतीच्या संकल्पनेत बसते हे विचारावेसे वाटले पण मी गप्प बसलो.  मी तरी दुसरे काय केले?  त्याच्याही घरी बहीण नको होती व माझ्याही घरी मला आशा राजे नको होती. मला वाटले होते आशाराजे मला बघताच धावत

येईल, मिठी घालेल ‘तुझे नाही माझेच चुकले म्हणेल ‘पण आशाराजे डोळे विस्फारुन बघतच बसली. अजूनही बारकी बुरकी असलेली भाबडया डोळयाची हसताच छोटे छोटे पांढरेशुभ्र दात दाखवणारी माझी बहीण मला परकीच वाटत होती. आशाराजे आशाताईची आशा मॅडम झाली होती. पूर्वी आशाराजे हसली की नजर हसायची. पण आता तिने जाणले होते की साध्या माणसांने तोंड बंद ठेवण्यातच शहाणपणा असतो. तोंड उघडले तर त्याचा जीव जावू शकतो. तीने मला तिच्या आयुष्यांतून खडयाप्रमाणे वगळले होते. भंगलेली मूर्ती म्हणून आशाराजे ने माहेर विसर्जीत केले होते. आशाराजे हसली की खारी बिस्कीटे कुस्करल्यासारखी वाटायची. शिवाय एक नंबरची इमोशनल फूल माझा होमवर्क सुध्दा करायची, विहीरीचे पाणी काढायची, नोकरांबरोबर राबायची. मी तिला ब्लॅकमेल करायचे लहानपणी म्हणायचो, ‘मी मेलो तर’ मग ही खूप रडायची. रडली की तिच्या लांब पापण्यांचे केस एकमेकांत गुंतत व खूपच सुंदर दिसत पण तरीही मी तिला हेवा वाटून म्हणत असे, ‘गावठीच दिसतेस तू, ना रंग ना रुप, शिवाय किती बारीक, तुला नवरा कसा मिळणार? इतर बघ, नटया बघ कशा टम्म पुरीसारख्या असतात. ’ आम्ही तिला कधी सुख दिलेच नाही तर ती जाड कशी होणार. खरंतर एखादया राजघराण्यात सहज सून म्हणून कुणीही केली असती. कदाचित ती सयाजीराव गायकवाड महाराजांचीच वारसदार झाली असती पण मलाच तिचा हेवा वाटत असे हे कसले प्रेम? ही ईर्षा? ही सिबलींग रायव्हरी. ईतकी कठोर ती कधी झाली? भाऊ हा प्राणी असा असतो हे कळायला खूप वर्षे जावी लागतात तिला ते विसाव्या वर्षीच कळले नाही पण बळी गेल्यावरच कळले.

राजमहालातील एखादया निसरडया जागी आशाराजे त्यांना पति त्यांच्या मुलासह बोलवून खाली ढकलून दयावे असा बेत करून मी त्यांना येण्याचा खूपच आग्रह केला. आशा राजेंच्या मुलांवर माझा राग नव्हता. पण तो धूळवडगडीच्या जमिनीवर हक्क सांगेल किंवा मी त्याच्या आईवर अन्याय केल्याचा सूड घेईल. हया भितीने मला त्याचा काटा काढायचा होता. मी त्याचा कंस मामा होतो.

आशाराजेने लिहिले होते

## १७ काटा आहे तसा आहे तेथे राहू दया

मी नवऱ्याला विचारलं,‘एक दिवस मी गावी राजमहालात जाऊन येऊ का? अलका नावाची मैत्रिण सोबत येणार आहे’ तो जा म्हणाला. बस पकडून दोघे निघालो. गाव मागचा मागे पडला होता. मनात सल बोचत होता पण विचार केला भाऊ बोलवितो आहे तर जाऊया. काटा आहे तसा आहे तिथे राहू द्या!

खूप दिवसांनी आज त्या माहेरच्या गावी निघाले होते. मोठया भावाची तब्येत बरी नव्हती. तसा तो माझ्या पेक्षा वयाने खूपच मोठा होता व समृध्द आयुष्य जगून आता तृप्तपणे मरणाच्या दारी जात होता. मुले नातवंडे, पतवंडे सर्व सुखं पायाशी लोळण घेत होती. एखादया व्यक्तिच्या नशीबी सर्व सुखच देव लिहीतो, असा तो भाग्यवान होता.

आईवडिलांना न बघणाऱ्या बहीणींची कुठलीही जबाबदारी न स्वीकारणाऱ्या त्या माणसाला त्या मरणासन्न क्षणी म्हणे बहीणींना भेटावेसे वाटत होते. सर्व होते ते साम्राज्य दोघा भावांत उपभोगून वाटणी करुन खल्लास झाले होते. बहीणी आता काही मागणार नव्हत्या, वडिलांचीही जबाबदारी नव्हती त्यामुळे त्याला आता मरणदारी बहीणी आठवल्या होत्या.

माहेरचा सांगावा आला व हृदयाच्या सर्व जखमा भळभळा वाहू लागल्या. परक्यांनी दु:खावल्याचे दु:ख होते पण याच आपल्यांनी जखमांवरच्या खपल्या काढण्यातच आनंद मानला. माझ्या आईवडिलांना जे त्यांचेही जन्मदाते होतेच या भावांनी सांभाळले नाही, पैसे खर्चले नाही की कधी हाताला धरुन डॉक्टरकडे औषधोपचाराला नेले नाही. आणि सर्व ईस्टेट मात्र चमचा वाटीपासून दागदागिन्यापर्यंत वाटून घेतली. वडिलोपार्जित धन म्हणजे पुरुषाला धन आणि स्त्रीला ऋण असते.

लग्न झाल्यापासून पंचवीस वर्षे मी त्या गावी जाऊ शकले नाही कारण ते गाव जणू मला सांगत असे ये गलिया ये चौबारा यहॉं आना ना दोबारा के तेरा यहॉं कोई नहीं।

आज पंचवीस वर्षांनी मी त्या माहेरच्या वाटेवर चालत होते. काटे टोचत होते. तरीही निघाले होते, अश्रू पुसत, पाय फरफटत.. कुठल्याशा अनाम ओढीने निघाले होते. माझे आनंदगाव मला तीर्थाप्रमाणे पवित्र वाटत होते. एखाद्या वारकऱ्याप्रमाणे मी गात होते.

मला पंढरपूराला जायचे

माझा आनंद गगनात माईना...

मला बालपण आठवले. अष्टकोनी नात्यांची ती चित्रे शोभादर्शक यंत्राप्रमाणे नजरेसमोर फिरु लागली. सुट्टी म्हणजे मजा व खूप हुंदडणे व आईच्या प्रेमसागराच्या लाटांत डुंबणे असे ते बालपण होते. तुम्हालाही तुमच्या आईचे वर्णन प्रेमस्वरुप आईच करावेसे वाटते ना! हो म्हणजे त्या काळी आई ही आई सारखीच असे, धुवूनही मळलेले कपडे घामाने थबथबलेले शरीर व कष्टाने सुकलेली काया या शब्दांत तिचे वर्णन करता येई. ती पूर्ण अर्थमंत्री असे. घरचा जमाखर्च, पै पाव्हणे लग्नांसाठी पैसे साठवणे सर्व व्यवहार तीच पहात असे.

अलका म्हणाली, 'आई तू खूपच मादक दिसते असे एका नटीच्या मुलाने आईला म्हटल्याचे मध्ये वाचनात आले. असेही हल्ली आयासुध्दा टीपटॉप सडसडीत असतात. आया मुलांच्या बरोबरीने खरेदी, बाहेर खाणे, फिरणे यात भाग घेतात व काहीजणी शॉपिंगसाठी पैसा हवा म्हणून नवऱ्याशी भांडतात. मुलींशीही बरोबरी करतात, त्यांची असूया ठेवतात. पण माझी आई खूपच साधी व जुन्या काळातलीच होती. त्याकाळी घर कितीही लहान असले तरी अंगणात, गल्लीत शेजाऱ्यांकडे पाहुण्यांची सोय होई. '

मी म्हणाले,'आमचे राजमहली जीवन फारसे आकर्षक नव्हते. त्या काळी करियर करणारी एखादीच असे व तिला मिळवतीला मदत करुनही तिच्याबद्दलचे आकर्षण बाकीच्यांच्या बोलण्यात डोकावत असे. कुणा एकीचा नवरा रात्री कुकर लावतो याबद्दलही चर्चा होत असे. आनंदगाव तसे छोटेच होते. आमच्या गावी भरतकाम, विणकाम, चित्रकला, रांगोळया, फ्रेम बनवणे, कपडे शिवणे ही कामे आवडीने व कलाकुसर म्हणून केली जात. चाळीस दिवसांचे सोहळे

म्हणजे बाळंतपणानंतरचे बारसे, चाळीशीची शांत, ख्रिश्चनांचे लेन्टचे चाळीस दिवस, श्रावणाचे चाळीस दिवस असे गाजत असत. कारण आम्ही सर्व शेजारी एकोप्यानेच रहात असू. जात धर्माची बंधने आईवडिलांनी घातलीच नाहीत. थोरले राजेसाहेब राजमहालाचे प्रमुख द्रष्टे राजे होते. घरी सर्वधर्म समभाव असे. हा आपला तो परका ही भेदभावाची भावना असे पण ती मारझोडीपर्यंत जात नसे. प्रेम व संस्कार या दोन तटातून नदीने वहावे तशी ती द्वेषाची व परकेपणाची भावना (जर असेल तर) संयमितच असे. ' अलका माझ्याप्रमाणेच लोकलमध्ये प्रवासात कंटाळायची. ती इतिहासाबद्दल अभ्यास करणारी एक विदयार्थिनी होती. तिला राजमहालाबद्दल विशेष अभ्यास प्रकल्प करायची ईच्छा होती. तिने विचारले,'तू पर्वणीत संगमावर गेली आहेस का? नदी कशी दिसते?'

दूर नदी किनारी गावाबाहेर राजघराण्याचे संबंध लपवून आईने साधूंकडे नेले होते. सिंहस्थ पर्वणीत कुंभमेळा भरत असे. साधूंचे आखाडे लागत असत. आई भक्तिभावाने अशा वेळी वडिलांची नजर चूकवून आम्हाला टांग्यातून नेत असे व त्या साधूंना महंतांना 'मुलींना चांगले स्थळ मिळावे म्हणून व्रत सांगा' अशी विनंती करीत असे. मुलींचे लग्न हा तिचा कायम काळजी करण्याचा विषय असे. तसा विचार केला तर ती एकच गोष्ट अजूनही कायम आहे. मुलींची काळजी. चिरंतन अशी ती मातृत्वाची स्वतंत्र भावना व चिंता ही मातृत्वाच्या आनंदाबरोबर उचलावीच लागते. कारण नाळ तोडून मूल आईपासून दूर होते पण गर्भापासून जुळलेली मने होत नाहीत. ' मी म्हणाले.

अलका दूरवर बघत म्हणाली,'प्रेमामुळे जीवने परावलंबीच राहतात. माझीसुध्दा आई आम्हा मुलांवर खूप प्रेम करीत असे. थोडे अधिकच कारण तिला आई नव्हती. एकदा सिंहस्थात मी आई व बहीण साधूचे आशीर्वाद घ्यायला गेलो असता त्या साधूने त्या चिलीमीतून धूर ताईच्या तोंडावर फेकताच मला चक्कर आली. आईने मला ओढत बाहेर आणले. त्याच दिवशी त्या साधूंच्या आखाडयांची शस्त्राने मारामारी झाली. तेव्हापासून आईने कधीही कुठल्या बुवा

बाबाकडे किंवा साधू महंताकडे किंवा ज्योतिषाकडे नेलं नाही.  पण ती काळजी मात्र करीत राहीली. राजघराण्यातील मुलींनाही शेवटी चांगला नवरा मिळण्याची काळजी असतेच.

अलका म्हणाली,‘व्रत वैकल्ये करुन मुलींचे चांगले व्हावे म्हणून आई ती स्वत:ची काया झिजवत राहीली व तिच्या माघारी आम्ही मुलींचे अतोनात हाल झाले.  तिच्या जुन्या पातळांच्या जीर्ण त्या गोधडयांना अजूनही अश्रूंचा वास येत असेल. खरेतर जवळ असणाऱ्या गोष्टी जवळ असताना त्यांची किंमत कळत नाही कि दूर राहिलेल्या, मागे पडलेल्या गोष्टी अधिक आकर्षक वाटतात सांगणे कठीण आहे.  मुलीच्या लग्नाची काळजी मुलीच्या पालकांनाच कळते.  त्याकाळी तर ‘शादी डॉट कॉम’ सारखे प्रकार नव्हते व विवाहात फसवणूक होई.  अर्ध्या घरी मुलांसाठी मामाचीच मुलगी केली जाई.  मुलीचे लग्न होत नाही म्हटल्यावर ती व तिचे घर सर्वचजण हिरमुसले होत व शेवटी कसेतरी कुठेतरी जमवले जाई.  त्या नात्यात ती सुखी होण्यापेक्षा जबाबदारी पार पाडणे हाच भाव असे.  अर्थात पर्याय तरी कुठे असे?  ते नाते जर अयोग्य ठरले तरीही त्या नात्यातून मुक्त होण्यासाठी त्या नकोशा लग्नाच्या घटस्फोटाच्या कागदी तुकडयासाठी चोरटेपणाने कोर्टकचेऱ्या कराव्या लागत.  कुणाची चूक, काय चुकले याचा फारसा विचार न करता अशा प्रकरणात सरसकट मुलीलाच दोषी धरले जाई. मी अमर प्रेममध्ये अशा मुलींची फरफट दाखवली आहे.  पावसाने झोडपले नवऱ्याने मारले तरी गप्प बसावे अशीच शिकवण तर मुलींवर आजही बिंबवली जाते.

सासरी उभ्याने जावे व आडव्याने परत यावे किंवा येऊच नाही.  (तिथेच मरावे) असा उपदेश मुलींना केला जाई.  त्या मुलींच्या प्रश्नांतून सुटका म्हणून काही घरी मुलगी झाली व जन्मत:च गेली अशा बातम्या येऊ लागल्या.  तोही एक प्रकारे जुगाडच होता, गपचूप केलेली छुपी स्त्री हत्या होती.

१९८३ च्या सुमारास गर्भजल चिकित्सेने मुलगी असल्यास गर्भपात करणे सुरु झाले पण त्यावेळी त्या विषयावर प्रबोधन झालेच नाही व प्रश्नाचे उत्तर शोधण्याऐवजी चूकीचे मिशन सुरु

झाले.  अलका म्हणाली,‘वालाचे बिरडे सोलणे, दळणे कांडणे, पोळया लाटणे (कामवाली बाई न आल्यास) सर्व कामे आई किंवा ताई करीत असे.  ‘तुम्ही अभ्यास करा’ सांगत असे.  सिनेमा बघून माणूस बिघडतो असे ती सांगत असे, पण बहिणीबाईंची, शांता शेळकेची गाणी मात्र तिला खूप आवडत.  गरमागरम खिचडी किंवा पिठले भात, तिची तब्येत बरी नसेल तरच बाकी तिचा सुग्रास स्वयंपाक चालूच राही.  स्वयंपाकघरात ती काय खुडबूड करते.  देव जाणे असे मी म्हणत असे. (आता कळते काय करावे लागते) नातेसंबंधांत तणाव त्या काळीही होता.  घराची प्रॉपर्टीची भांडणेही होती पण काटयावाचून गुलाब नाही हे सत्यच असते. राजमहाल खूप सुंदर आहे म्हणे?’ अलकाने डोळयात उत्सुकता घेऊन विचारले.

मी म्हणाले,‘हो माझ्याही घरी कौटुंबिक स्थिती तुझ्यासारखीच होती. आईवडिल आजारी असतांना भावाने किंवा कुणीतरी मदत करावी असे वडिलांना खूप वाटत असे.  पण कुणीही आले नाही.  जर त्यावेळी कुणीतरी देव माणूस मदतीला आला असता, एखादा तिसरा हात पुढे होऊन मदत करायला धावला असता तर आमची पाचही बहिर्णींची नशीबं बदलली असती पण असे कुणीही कधी आले नाही.  वाट पहाण्यात आम्ही खूप काळ घालवला शेवटी स्वत:ची मदत स्वत:च केली  व पुढे आलो पण त्या वाटेवर खूप काटे होते, असुरक्षितता होती! तो काळ कुटूंब नियोजनाचा नव्हता. त्यामुळे प्रत्येक मूल म्हणजे एक चिंताच असे. ’

बसमधील एक बाई गप्पात सामील होत म्हणाली,‘तो काळ स्त्री भ्रूण हत्यांचा नव्हता त्यामुळे घरोघरी पाच ते नऊ मुली असत.  लग्नासाठी दलाल नात्यातील एखादा वृध्द स्थळ आणीत असे.  कधी कधी पाचही मुली एकदमही दाखवीत असत.  हवी ती करा.  मला फारच वाईट वाटत असे.  भाजीचे वाटे मांडावे व हवी तू उचला म्हणावे असे वाटे.  मी रडले की आई म्हणत असे ‘‘सर्वांनाच धाकटी करायची असते पण.... ’’ अग आपण हट्ट धरला व अहंकार धरला तर चांगली स्थळे निसटून जातात.  सर्वांनाच हुंडा हवा असतो.  मुलगी उर्वशी व गोरी हवी असते.  आयुष्य म्हणजे तडजोड असते. ज्याच्यावर प्रेम केले ते मिळतेच असे नाही. जे मिळते

त्यावर प्रेम करायचे. घरोघरी बहुतांशी प्रत्येक मुलीचे दु:ख निराळे असे. कुणी सासरच्या जाचाला कंटाळलेली कुणी वरुन दु:ख न दाखवता आतून पूर्ण मिटलेली होती. गाव तसा गरीब. काही घरी मात्र मुली सुखी असत व त्यांना अनपेक्षित सुख मिळे. पैसा बोलतो म्हणतात अशी ती श्रीमंत व सत्ता गाजवणारी घरे होती. पण त्यांची कुणाला मदत करायची वृत्ती नव्हती. उलट फुकट काय मिळेल ते घेण्याचीच वृत्ती होती. ' त्या मावशी म्हणाल्या मी या आनंदगावातच राहते. त्या काळी नोकऱ्या मिळत नसत. (आता तरी कुठे मिळतात?) नोकरी लावतो सांगून माझ्याकडून सुध्दा चैन व चेन एकीने घेतले होते. अनेकजणींनी चैन, अंगठया विकून पैसे दिले. त्या काळी गावात एखादाच डॉक्टर असे व तो देवमाणूस असे. शारिरीक रोगांवर सरकारी दवाखान्यांतही उपचार होत. बाकी आयुर्वेदिक उपचार व आजीबाईचा बटवाच उघडला जाई, नाहीतर आजार अंगावर काढला जाई.

मनोरोगांवर डॉक्टर नव्हते पण आस्थेने विचारपूस करणारे ते आजोबा बुजुर्ग डॉक्टरचेच काम करायचे. आस्थेचा पूल पार केलेले सदृशील संत व साधूही असत,पण संयमित सल्ले व साधेसुधे दैवी उपाय ते सांगत असत. देवदर्शन म्हणजे तरी काय? एक बदल! व हे सल्ले म्हणजे आशा असते! आई सहलीला सुट्टीसाठी जवळच्याच देवळात नेई. भाकरी आवडत नसेल तर चपात्या व चपात्या आवडत नसेल तर थालीपीठ! भरपूर खाऊ, भेळभत्ता, लाडू चकल्या घेऊन जायचे व थकून परत यायचे. वाटेतच कैऱ्या तोडून त्यांचा किस भेळभत्यांत कालवायचा व मिटक्या मारायच्या. रस्त्यांवर खादाडी मिळण्याचे ते दिवस नव्हते. वडापावच्या गाडया गावोगावी गल्लोगल्ली नव्हत्या.

मी म्हणाले,'बर्गर व हॉटडॉग सिनेमातच बघायला मिळत असत! भाकरी ते बर्गरचा प्रवास मी याची देही याची डोळा पाहीला. १९७९ साली दूरदर्शनचा बोलणारा इडियट बॉक्स लोकांना मूर्ख करु लागला. अलका म्हणाली,'साहित्य संमेलनाध्यक्ष यांच्यावरील टीका अजूनही ताजी ताजी असतांनाच मी माझ्या बालपणीच्या मौजमस्तीबद्दल बोलून तीच टीका माझ्यावर ओढवून घेते आहे. म्हणजे असे की मी माझ्या अनुभवांचे भांडवल करुन लिहिते व

वाहवा मिळवते.  पण लिखाण जीवन अनुभव व विचार एकमेकांपासून वेगळे करता येतच नाहीत. भावना, शरीर, अनुभूतिदायक मेंदू व हृदय एकत्र करुनच तर सजीव मानव बनतो.  ते आराखडे ते ओरखडे तो भाकरी ते बेकरी प्रवास, तो पाथ, तो पंथ, तो पथांस सर्व एकत्रित करुनच तर ते जुगाड बनत असते.  बुढीची खटली, गावातली झोपडी, बिऱ्हाड बाजली, वाडीवस्ती सर्वांनी बनते ते ''जुगाड'' बनते! त्यात तर बालपणाची अनुभूति झिम्मा फुगडी एवढे अविभाज्य असते.

अलका पुढे म्हणाली,'मी अजूनही विचार करते.  नदी किनारी, किती बुलबूल असतील. एकतरी दोन तरी तीन तरी असतील? बुलबूल? तो पक्षी?  बालपणीच्या आठवणींतील स्वप्नील दुनियेचे याहून अवास्तव निराळे वर्णन ते काय होऊ शकते?' मी म्हणाले,'मुलींना अगदी पिंजऱ्यातच ठेवले जाई.  मात्र नंतर असुरक्षिततेला कटकटींना तोंड देताना त्या मुलींना उडाण घ्यावी लागे.  पण खंबीरपणे कालपर्यंत सायकलीवर फिरणारी परकरी शाळकरी मुलगी सुध्दा यशस्वीपणे खंबीर वाटचाल करीत राही.  सासरहून परत आलेली असो किंवा दुर्दैवाने विधवा अगतिका बनलेली मुलगी असो, अशोकवनातील सीतेप्रमाणे ती त्या वाडी वस्तीत सुरक्षित असायची.  माहेरच्या वेलीचाच नव्हे तर त्या गावातील सर्व सवंगडयांचा बुजुर्गांचा तिला आधार असे. ' मावशी म्हणाली,'कावळयासारख्या चोचा मारुन दु:खावणारे असले तरीही ती वस्ती तीला जगायची उमेद देई.  मी म्हणजे शरीर नव्हे एक आत्मा हे शिकवण्यासाठी दुर्गादेवी राजेसाहेबांनी मुलगी वाचवा संस्था सुरु केली होती.

मी म्हणजे आत्मविश्वास हे ते गाव प्रत्येक मुलीला सांगे, तिला शिकवत असे.  आजीच आम्हाला सांगे : कुछ रीत जगत की ऐसी है हर एक सुबह की शाम हुई

तू कौन है तेरा नाम है क्या,सीता भी यहॉं बदनाम हुई।

अशी खोटी तसल्ली मनाला देत वाटचाल करावी तसे आयुष्य चालत राही.  व ती वीरानीही समृध्द होई.  आयुष्याचे चुकलेले गणित उराशी घेऊन ती चालत राही ती सीता ना! महीन्यातून एकदा गावाबाहेरच्या टेकडीवरील देवळावर व वर्षातून एकदा कुलदैवतेला जाणे होई.

गावाबाहेरील मंदीरात अचानक येणाऱ्या पावसाने देवदर्शना पूर्वीच मातीच्या गंधाने हृदयाचा गाभारा भरुन जाई. अचानक पावसाळी हवा होणे, पाऊस येणे, ओढया नाल्यांना पूर येणे व रस्ता हरवणे, गाडया बंद पडणे अगदी नेहमीचेच असे. मग पलिते पेटवून कंदील लावून रात्र काढली जात असे. पण त्या रात्रीची सर कशालाही येणार नाही अशी ती रात्र संस्कृतिने समृध्द होती व होत असे व संस्मरणीय ठरत असे.

अर्थात कधी आईला रक्तदाबाचा त्रास होई. आईला मुलींची काळजी वाटे व भाऊ बहिणींना बघतील याची शाश्वती तिला नव्हती. व्यसनी व विचित्र पुरुष त्या काळीही असत पण माझ्या दादांच्या दराऱ्याने ते आमच्यापासून दूरच रहात असत. त्यामुळे त्या रात्री जे गडी असत ते गपचूप तंबूच्या बाहेर आमची राखण करीत बसत असत. वडीलधाऱ्यांचा धाक व आदर असल्याने व परस्त्री मातेसमान व दुसऱ्याची लहान मुलगी आपल्या मुलीप्रमाणे बहीणीप्रमाणे असे मानून त्या गावाने माझे लाड केले. त्या अशा असुरक्षित ठिकाणीच्या अंधाऱ्या रात्रीसुध्दा गाणी म्हणून भूताखेताच्या गोष्टी सांगून आम्ही मजाच करीत असू. यात्रेच्या कथा व आठवणी सुश्राव्य असत व वर्षभर पुरत. प्रत्येक स्त्री ही ताई असे, प्रत्येक पुरुष ताईचा भाऊ असे, प्रत्येक रस्ता आत्मविश्वासाचा असे. देऊळ तुला बघायला मिळेलच.

अलका म्हणाली,‘बाहेरच्या खाण्याची सवय न लागल्याने जे मिळेल ते खाऊन आम्ही मुले खूषच असू. अर्थात् आई मामी सर्वजणी खूपच सुग्रण होत्या. तेलतिखट पोहे कालवले तरी ते चविष्ट होत असत, मग पक्वानांची गोष्ट काय सांगायची. अनपेक्षित पाहुणा आला तर शेवया रांधल्या जात. पाहुणा आला की कढई ठेवली की मग समजायचे कुरडया व नागलीच्या पापडाचा हारा आता तयार होणार. अर्थात तो आम्ही मुलेच फस्त करीत असू. अक्षरशः परातभर पुऱ्या व परातभर भजी आई सुट्टीत करीत असे. दारावर येणाऱ्या केळीवाल्याकडच्या केळी, मुसलमान पाववाल्याकडचे पाव व भजी व कटाची आमची रस्सा हा तगडा, जीभ जाळणारा मेनू असे. काली मूॅंछ, दूध मोगरा, कोकम, जिरेसाल, आंबे मोहोर गावचा, त्रिंबकेश्वरचा, घोटीचा असे

वेगवेगळया प्रकारचे तांदूळ आई खरेदी करीत असे. ती वेगवेगळया डब्यांत भरुन ते आलटून पालटून वापरत असे.

आईवडील असेपर्यंत आम्ही सुरक्षित होतो. रात्री बेरात्री वडील पाठवतच नसत पण तरीही आम्ही तशा स्वतंत्र व सुरक्षितच होतो. आज स्त्रियांनी प्रगति केली पण ती सुरक्षितता उरली नाही. कारण समाज दूरदर्शनमुळे दूरदर्शी वृत्ती विसरला. एक प्रकारचा हावरट बुभूक्षितपणा समाजातील काही व्यक्तींमध्ये आला. तृप्त होत नाही ती अतृप्ती घेऊन ते समाजाला रसातळाकडे नेत राहीले. त्यांची विकृति त्यांच्यापुरती मर्यादित न राहता समाजासुध्दा हानि करीत राहीली. सर्वत्र स्त्री असुरक्षित झाली. उघड दाखवले नाही तरी मनात!

वेगवेगळी फुले उमलली, वेचूनी त्यांचे झोके एकमेकांवरी उधळले गेले ते दिन गेले! फुलांचे वेल रोपे झाडे तो गंध गेले ते दिन गेले.... सुवासासाठी फुल बघण्याचे दिवस आता नाही. आता फुले खुडली जातात ती स्वार्थासाठी! आता शाळा सुटताच मुलांना आणायला पालकांना जावे लागते. खंडणीसाठी मित्र मित्रांचे वैरी बनतात. वर्गमित्र काहीवेळा काही ठिकाणी मैत्रिणींचा गैरफायदा घ्यायची ईच्छा ठेवतात. सिनेमांनी व इंटरनेटने बालकांचे बाल्य कधीचच संपवले आहे. उरला आहे तो ग्लोबलायझेशनचा गोंधळ! उरली आहे ती जीवनाच्या सोहळयाची चव घालवणारी काळजी, असुरक्षितता!

मावशी म्हणाल्या,‘कोणतेही खत न घालता पिकवलेली फळे व भाज्याच चवदार होत्या. त्या काळी सर्व भाज्या गोड लागत. तेलाने थबथबणारा रस्सा असो नाहीतर उकडलेली मेथी / पालकाची वडी /अळू वडया तळण्यापूर्वीच संपत असत. आंब्याची निर्मिती देवाने सर्वात मोठी देणगी म्हणून केली असावी. म्हणूनच तर कुंकवाच्या कुर्अरीचा आकार आंब्याचा असतो. आंब्याचे सर्व पदार्थ त्या बाण्याचा अविभाज्य भाग होते. संपलेले दिवस नेहमीच चांगले वाटतात की ते दूर जातात म्हणून साजिरे वाटतात. जवळ असतांना नकोशी माणसे नंतर आठवणीत का हवीशी होतात?

जीवन म्हणजे तरी का? बालपण तरुणपण की भैरवी ?

स्वप्नांची नवथर पालवी की जरठ शरीराची कुडी? की बिनशिडाची होडी?

जीवन म्हणजे आजचा क्षण की फार पूर्वीची कुठलीशी आठवण?

जीवन म्हणजे मनाचा उत्सव की जीवन म्हणजे एकाकीपण?

जे दिसते तेच सत्य असते? की सत्य कायमच दडून बसते काहीसाठी?

स्त्रीला कायम बोलावणारे माहेर की लग्नानंतरचा आयुष्याचा मोहोर?

पैशांच्या लगडीवरचे सरण की अपार कष्टाने झिजणारे चरण?

ते वृध्द काळजीनी झाकोळलेले की मिजाशीत ऐट करणारे कोल्हे?

हागरे ओकरेवास ते बाळंतपण की दुपट्टयातून वाहाणारे जीवन?

बाळाच्या रडण्याची नवलाई की सुटलेल्या माहेराची जुदाई?

जीवन म्हणजे पुजेचा चौरंग की तडजोड तुटफूट व मानभंग ?

काहींसाठी इंद्रधनुचा रंग तर काहींसाठी पाळण्यात रडणारे बालपण?

तर कुणाच्या थडग्यावरचा दुभंग देवळातील आरती व अभंग?

कुठे पंढरपूरच्या यात्रेतील मृदुंग तर कुठे रक्तरंजित विजयरंग।

जीवन म्हणजे फसवणूकीची भाषा की जीवन म्हणजे अतूट आशा?

बस थांबली. अलका भारवल्यासारखी दूरवर दिसणाऱ्या डोंगरावरील राजमहालाकडे बघत बसली. माझा स्वप्नांचा भूतकाळ संपला. कृष्णधवल काळातून मी रंगीत काळात आले. हट्ट करुन गावी तर आले पण पाय जमिनीवर लागताच कळले ते घर फक्त उरले आहे, घरोबा संपला आहे. तो वाडा ती माणसे कधीच काळाच्या पडदयाआड गेली आहेत. सासरहून मी त्या माहेरच्या गावी गेले. गावच्या भूमीवर उतरले. त्या पृथ्वीच्या माऊलीच्या गावच्या मातीचा स्पर्श व्हावा म्हणून मी चपला काढल्या. राजमहालाची मालकीण पंचवीस वर्षांनी येत होती.

सर्वच कळया उमलत का नाहीत? कुठे सम्राट अशोकाच्या विजयाचा रथ कुठे कधीही पूर्ण न झालेले मनोरथ. कुठे हरवलेला पदपथ दैवाने लिहीलेले विधिलिखित असे का होते? एका राजमहालाची राजकन्या पर्यटकांबरोबर बसने आज त्या राजमहालाकडे वाटचाल करीत होती.

सोबतची बाई म्हणाली, मी इथेच चाळीत राहते. चहा पिता का? चहा पिऊन आम्ही काटेरी रस्त्यावर चालू लागलो. अनेक काटे टच्‌कन पायात मोडले व रक्त टरारले. एकही काटा उपसून काढता येईना. एक जोरात खेचला तर त्याबरोबर माझे रक्त माझे मास खेचले गेले. जन्म गावाचे नाते असेच असते. सलते टोचते पण काटा काढून टाकायाला गलो तर तो रक्त काढून जखमी करते. अलका म्हणाली,‘तू इथेच यांच्या घरी नीज मी वर जाऊन महाल बघून येते. मी म्हणाले,‘आयुष्याचीही तिन्ही सांज झाली आहे. पुन्हा भेट होईल न होईल. तरीही पुढे जाववेना मागेही फिरवेना. काटयाचे टोक पायातच राहीले आहे. पुन्हा गावी येईन न येईन. पंचवीस वर्षांनी आले आहे. मला वर यायचे आहे. ’ मावशी म्हणाली, ‘परत येऊ शकाल आता तू इथेच नीज. नाहीतर पायातून अधिक रक्त येईल. ’ मी रडू लागले व म्हणाले,‘भावाला वाटेल मरतांनाही भेटायला आली नाही. मुलगा दाखवायला आणला नाही. ’ ती म्हणाली,‘एवढे जर होते तर तो पंचवीस वर्षे तुझ्या घरी का आला नाही? आणि तू तब्येतीमुळे इथे अडकली आहेस. मावशी म्हणाली, झोपा आता जरा, भेट होणे न होणे देव लिहित असतो. प्रत्येकजण वेगवेगळया ध्रुवावर राहते. जगलो वाचलो तर भेट होणे देव लिहित असतो.

काटा आहे तसा आहे तिथे राहू द्या
चोरुन हळू डोळे पूसन घ्या मला लंगडत घराकडे जाऊ या
या गावाच्या कुशीमध्ये शिरवा
घेऊ दया मला काही क्षण विसावा.
लाड करणारे सखे सोबतीचा थवा
गेले कधीच स्वर्ग लोकीच्या गावा
आता कोण कधी भेटणार नाही बा
मलाही कधीही येईल वरचा सांगावा
माझी शेवटची हौसही पुरवा
मला लंगडत घराकडे जाऊ द्या।

**१८ या जीवनाचा पक्षिणीचा प्रवास**

त्यातली जुगाडाची ही शेवटचीच उडाण असेल कदाचित. त्यानंतर काळाच्या पडद्याआड तर सर्वांनाच जायचे असते. कधी तरी मग त्या सुंदर यात्रेसाठी जायची वेळ येईल पण मी पुन्हा त्याच आईवडिलांच्या पोटी येईन, त्या गावी जाईन, पर्याय मिळाले तरीही म्हणेल मला त्याच गावी जन्मायचे. मला त्या वाळूच्या घडयाळाजवळ, त्या सतीच्या समाधीजवळ जायचे आहे पण मला चालवेना. खूप ऊन चढले होते व पायातून रक्त गळत होते. महाला मी तुझेच गीत गाते आहे.

तर दारांपर्यंत जाऊनही मी राजमहालात जाऊ शकले नाही. मी माहेरी पुन्हा जाऊ शकले नाही, त्या मावशीच्या खोलीत निजून राहीले. मावशीने परत जाताना विचारले, ‘आशाराजें मी तुम्हाला ओळखले. तू माझा भाऊ तुझ्याबरोबर शाळेत होता. तू खूप देखणी दिसतेस म्हणून आम्ही चोरुन बघायचो. आमची गावाबाहेरची वस्ती पण तुमच्याशी जे राजेसाहेब वागले ते आम्हाला आवडले नाही. पण बोलायला आवाज नव्हता. ’ तिने कुंकू लावले व म्हणाली, ‘दिल्या घरी सुखी रहा. अलकाबरोबर परत फिरले. बस सुरु झाली. परतीच्या वाटेवर कुठूनशी मोगऱ्याच्या वासासारखी मंद लकेर कानावर आली.

सुन्या सुन्या मैफिलीत माझ्या तुझेच गीत मी गात आहे. मी त्या आवाजाने डोळे पूसन ओळखले. वाळूच्या घडयाजवळची मैफल कायम सुनीच राहणार असा दैवी शाप असेल का? मी त्या राजमहालाच्या पायऱ्यांवरुन परत यावे हे पण विधिलिखितच असावे का?

.......................’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’’

सीतारामराजेला आईराजेने आशाराजे ताईला दिलेली हिऱ्याची अंगठी हवी होती. अगदी वारंवार तो ती ताईला मागे ‘खून करुन काढून घ्यावी’ असे ही तो एकदा दारु पिऊन म्हणाला होता.

आशाराजे आजाराने मरायला टेकल्यावर तो गेला व म्हणाला आशाराजे आपल्या राजेघराण्याची अंगठी सासरी कशाला देतेस? मला दे, पण आशाराजेताईने दिली नाही.

आता तू बारीक झालीस.  अंगठी गळून पडेल.  मी लहान करुन आणतो सांगून सीतारामराजे ती अंगठी घेऊन आला व पुन्हा त्याने आशाराजेताईला तोंड दाखवले नाही. ती मेली असती तर तो दहाव्या बाराव्यालाही गेला नसता. नाहीतर तिचा नवरा व मुले न जाणो सीतारामकडे अंगठी मागायचे.  सीतारामराजेनी वर्षानुवर्षाचे संबंध अंगठीने तोडले.  पैसा वाईट असतो.  नसेल तरी वाईट असेल तरी वाईटच! अंगठी घेऊन सीतारामराजे महालात आले होते.

आम्हा भावांच्या मनात पैशांची स्वप्ने कायमच जिवंत असतात. शिवाय उपभोगाचे मनसुबेही असत!  आम्हाला कुटुंबात मृत्यूची फार भीती वाटते.  जगण्याचा अतिमोह आहे तरीही आशाताईला एकोणीसाव्या वर्षी ती घटस्फोट घेऊन परत आल्यावर मी तिला विहिरीच्या काठावर उभा करुन म्हणायचो, जीव दे, एवढा काय मोह जगण्याचा!  मोठी मानकरीण आली आहे.  तुझ्या घटस्फोटामुळे आमची बदनामी होते.  मेलीस तर पाय घसरुन विहिरीत पडली किंवा तापाने मेली सांगू.  तिला मर म्हणणारे आम्ही आम्हाला सत्तरीत सुध्दा जगायचा मोह आहे.  खूप खूप जगायचे आहे.  शंभर वर्षे!  कारण आम्ही पुरुष आहोत, राजे आहोत, खरेतर या शरीराचा भरवसा नाही.  मी मेलो तर ही भीती मला  सत्तरीत खाते पण निर्लज्यपणे मी ताईला व इतरांना म्हणायचो, ‘जीव दे’. दास डोंगरी रहातो, यात्रा मनी पहातो अशी ती विरक्त होती.

आशाराजे ती कधीही उलटून म्हणाली नाही ‘का’? कारण मग उध्दटपणा करते म्हणून आपण अजूनच भांडलो असतो. तिला मारहाण केली  भांडण झालं की ‘वाट पाहतेय विहीर तुझी मर. आपल्या घरची गावची सतीची समाधी म्हणते आपल्या हया घराण्यात घटस्फोटीत स्त्रीला तुम्ही जीवंत कसे राहू दिले?  असेही आशाराजेला म्हणत असे.  पण मी मेलो तर माझी बायको कधीही सती जाणार नाही कि सितारामराजेची बायको जाणार नाही.  उलट सगळे फुंकून परदेशी मजा करायला जातील. आशाराजेला बहीणीला हिणवणारे आम्ही भाऊ आमच्या बायका सती जाण्याला तयार होत्या का?  आमची लायकी काय होती?  आम्ही मेलो तर या सुनांनी कदाचित पुनर्विवाह केला असता हसतच एका पायावर!  पण बहीणीला मात्र आम्ही ‘सेकण्ड हॅण्ड’ म्हणून हीणवले.  दबावात आमच्या बायकांचे चारित्र्याचे दाखले कुणी दिलेही असते.  पण शेवटी चार

इंचाच्या जीभेने माणूस / माणसे वाटेल ते बोलू शकत होती. चालायच्या व शरीर हलवण्याच्या पध्दतीवरुन स्त्रीचे मूल्यमापन करता येते. खरे तर आमच्या बायकांपेक्षा आशाराजेताईच सोज्वळ होती. पण दुर्दैव तिचे ती घटस्फोटीत होती.

आशाराजेनी सासरी राहून` काहीही केले असते तर चालले असते पण माहेरी परत येऊन तिने गुन्हा केला होता. तिला वारंवार 'जीव दे' सांगायचा हक्क मला होता. माझी बुध्दी तेवढीच होती. माझ्या लेखी स्त्रीची मुलींची किंमत तेवढीच होती. पण आता माझे डोळे उघडले.

आशाराजेताई राजमहालातून गेली घरातील लक्ष्मी गेली. मी तुझेच गीत गात आह अस`लिहित राहिली. राजमहाल जर्जर झाला. घर हसणे विसरले. माझे बालपण म्हणजे आशाराजेताईची संगत गेली, भातुकलीची गम्मत तरुणपण म्हणजे ती नको म्हणून केलेला राग राग. ती गेली मी प्रौढ म्हातारा झालो पार मरणाच्या दारी आलो. असंबध्द विचार करीत मी बसून राहीलो. कुठल्याही वयात भातुकली मोडली तरी डाव अर्धाच रहातो. हे मला आता कळले.

बायको दार ढकलून आत आली 'का हो झोपलात?'ती

'हो झोपलो होतो. पण आता कुठे थोडासा जागा झालो आहे. मी

'काय विचार?' ती

'गावच्या सतीच्या समाधीचे नुतनीकरण करावे का? मी

- 'कशाला खर्च'? कालबाहय गोष्टी आहेत त्या! उद्या तुम्ही मेलात तर काय मी सती जाणार आहे का? ' ती

मी गप्प बसलो. माझा हिरमुसला चेहरा बघून म्हणाली 'करु या'! माझा भाऊ आमदार झालाय त्याला बोलावू या आणि टेरेस पार्टी ओली करून घरात कार्यक्रम करु या! ' मी निवांतपणे झोपलो.

समोर वाच्छानीकडे पाहुण्यांची वर्दळ होती. स्त्री भ्रुण हत्याबंदीचा काहीतरी कार्यकम ठेवला होता. थोतांड लेकाचा! स्त्री भ्रुण हत्येत मेलेल्या मुलींचा स्तंभ बांधायचा म्हणे. त्याने अंगणात एक पार बांधून प्राजक्ताचे झाड लावले आहे. आशाताईला प्राजक्त फार आवडायचा

पण प्राजक्ताला झाडाखाली त्याच्या मुली, नातवंडे गप्पा मारताना बघून माझ्या अंगात प्राजक्त लावायची इच्छा संचारली. प्राजक्त लावला! दोन तीन महिन्यातच प्राजक्त बहरला! स्वत:ची बहीण मी पार मारली आणि झाडे जगवायची वल्गना करतो.

रुणझुण पैंजणे

किणकिण काकणे

मुलगी आली सोनपावलाने

वीना मुलगी चे घर सुने

सून आली नव स्वप्नांनी आली.

आशाताईच्या मुलाचे लग्न झाले.

त्याला चांगली मुलगी मिळाली.

माझ्या मुलांची मात्र लग्न होत नव्हती.

मुली म्हणजे पैंजण बांगडया कानातले. रांगोळया! आशाताईला सर्व हौस, पण तिला मुलगी झाली नाही, नाहीतर एक वेगळीच स्त्री घडली असती. आशाताई बाग फुलवायची गजरे करायची! खरेतर व्यक्तिमत्व, रुप खुलते ते कला व प्रेम यामुळेच फुलते! त्यामुळे कुठूनतरी मागणी येते म्हणजे मार्केटींगचाच प्रकार असतो! मुली म्हणजे पराभव, मुली म्हणजे पडती बाजू असे म्हणणारे म्हणू देत, पण तरीही मुलगी म्हणजेच जीवन! मुलगी झाल्याची किंवा बहीण असल्याची लाज त्या राजेपाटील घराण्याला वाटत असे. त्यामुळे आशाताईला तूच्छ लेखण्याची एकही संधी मी व सिताराम सोडत नसू! ४ इंच जीभेच्या तलवारीने मुलींना बोलून, कत्तल करुन बदनाम करुन आयुष्यातून उठवता येते या तुच्छ तुच्छ स्वार्थाचा विजय आम्ही दोघांनी उपभोगला. आशाराजेताईला हाकलून विजयोत्सव साजरा केला. हे संस्कार? हे खानदानीपण? सतीच्या समाधीपेक्षा या महालासाठी त्याग करुन आम्ही केलेले अन्याय बाहेर न सांगणाऱ्या त्या आशाराजेची आशाराजबहिर्णीचीच समाधी बांधायला हवी!

आशा राजेसुध्दा आयुष्यात सुखी नव्हती की होती माहीत नाही. नवरा त्रास देई की नाही आम्ही कधी बघितलेच नाही. मन मिळवणी नव्हती की होतीआशाराज आम्ही विचारले नाही. भाऊ विचित्र असे होतो. आम्ही माजात म्हणून कुणी टोचले की नाही आम्हाला कल्पना नाही. पण माहेरी जागा  नव्हती व नाही हे आशाराजे जाणून होती. शिवाय समाजसुध्दा घटस्फोटीतेला दोष आहे की नाही हे विचारात न घेता दोष लावतो. कसे तरीच मन मारत आयुष्य ती जगली असावी का?  नीच भावाची बहीण असणे इतके दु:खदायक असते? नशीब म्हणून त्या भोगांना सामोरे जात राहीली.  फक्त मारहाण करणे म्हणजेच छळ असतो का? आणि अगदी नवरा मारहाण करत असता तरी ती कुणाला सांगणार? आम्ही भाऊ हात उचलायचो, तेव्हा तरी तींने कुणाजवळ तक्रार केली नव्हती. अचानक रात्री मला तीचे रडणे आठवते व माझ्याच पाठीवर वळ उठतात. मी असा का वागलो. तर मी राजेंनी ओंजळीत तोंड लपवून हूदंका दिला.

लिखाणाचा वारसा तिलाही होता.  तिने मध्येच लिहिले होते, संसार म्हणजे तीन पायाची शर्यत असते.  त्याच्यावर खूप टीका झाली.  समाजाला फिलगुडचे फुगे हवे सत्य नको.

रजनी राजे, माझी बायको वाच्छानीच्या बायकोच्या कार्यक्रमाला निघाली सर्वांनाच त्यांचे त्यांचे कामधंदे होतो. मीच असंबध्द विचार करत बसलो होतो.

रजनी  म्हणाली, ‘‘तुम्हीही चला. पार्टीत मित्र मिळतील. ’’

‘मला आवडत नाही ’ मी

‘का? गप्पा मारायच्या’ रजनी राजे

‘असे वाटते की हे लोक मला हसतात म्हणतात हया नीच माणसाने बहीणीला कपटाने मारले ’

‘छे! आपणच सांगायचे ती तशी होती अशी होती ’ ती

‘खोटे सांगून अजून पाप करायचे?’ ‘मी’.

‘प्रत्येकजण स्वार्थाची वेळ आली की खोटे बोलतो श्रेष्ठ राजे घराणे आहे तुमचे. तुम्ही घराण्याच्या अब्रूसाठी केले असे सांगता येते. ’ ती.

‘अब्रूसाठी, कुणाला विशेषत: स्त्रीला बेघर करणे कोणाच्या खानदानीपणात येते?’ मी.
‘तुमचे मन खाते ’ रजनी राजे

‘तूच आम्हा भावंडात भांडणे लावली. तुला तिच्या रुपाचा, गुणांचा, सौंदर्याचा हेवा वाटला. मला तिचेसाठी वर वाच्छानी पसंत होता. हुंडा दिला असता ताटातले वाटीत परत मिळाले असते. पण तू ते होवू दिले नाही. ’ मी.

‘तुमचे प्रेम पक्के हवे, भांडणे काय कुणीही लावेल. माझ्या भांडणे लावण्यावर तुम्ही भांडलात कारण तुम्हाला काही कष्ट न करता महाल हडपण्याची हाव होती. मी रजनी राजे मी तिला सर्व देवून आपण काय वाडगा घेवून फिरायचे होते? वाल्या कोळयाच्या पापांत इतर भागीदार नसतात. तुमचे पाप तुम्हीच जाणा. ’

‘काही रामायणांमध्ये राम नसतो. ’ मी.

‘स्त्रीला ती बहीण होती तरीही, नसती तरीही आधार घ्यायचे संस्कार तुमच्या घरी नाहीत. राजघराणे हा शब्द तुमच्या तोंडी शोभत नाही. ’ रजनी राजे फणकाऱ्याने बोलून निघून गेली.

जाता जाता दिंडी दरवाजात ती थांबून ओरडून म्हणाली.

‘दोन वेळा पाचव्या महिन्यात गर्भात मुलगी म्हणून मला तुम्ही गर्भपात करायला लावला आता आपल्या मुलांना मुली मिळत नाहीत. चांडाळ तुम्ही चांडाळ. ’

मला धक्का बसला. माझ्या पापात भागीदार असलेली माझी पत्नीही रजनी राजे या षडयंत्राची जबाबदारी घ्यायला तयार नव्हती. तीही मलाच दोष देते याचे मला वाईट वाटले. त्यानंतर मी जीन्याकडे बघत राहतो. येईल माझ्या घरी सून येईल मुलगी येईल. माझ्या मनात एक मुलगी वावरु लागली. आशाताईसारखी, सोनचाफ्याची कळी पण सुवास लपवणारी, वेड लावणारी. स्वत:लाही लपवणारी! त्यानंतर मी आशाराजे चे लेखन साठवून ठेवू लागलो आशाराजेताईचे शब्द प्रभूत्व यमक कुणालाही जमले नसते. तिच्या शब्दांना वास असे लयनाद असे सुगंध असे ती लिखाणात रमून जाई. तिचे पुस्तक वाचताना माझा न राहतो मी हरवून तो

किनारा असे वाटे. माझे प्राण तुझे प्राण हरपले देहभान असे सोनेरी शब्द तिचे होते पण ती कुठल्या भातुकलीत रमते म्हणाली की डाव मी मोडला.

राजमहालात एका खोलीत, आशाराजेताई पूर्वी सारखी, आम्ही हाकलल्यावरही कुंडयांना गेरु लावायच्या पात्रात निजली, पडली असती तर माझे काय जाणार होते? मी दुर्योधन सुईच्या अग्रावर मावेल ईतकीही जमीन देणार नाही म्हणणारे कौरवच जगात लौकिकार्थाने सुखी होतात. पांडवांचे नशीब रानावनातील काटयाकुंटयात जखमी होते संपून जाते! भाऊबंदकीत आाशाताईला आम्ही भावांनी बेवारस फिरवले. तिने आमच्याशी तडजोड करायचा खूप प्रयत्न केला पण तिच्या मवाळपणाचा फायदा घेऊन आम्ही कोपरांनी खणले, बिचारी म्हणायची. मला फक्त इथे सुरक्षित राहू दया. मी कुंडीतसुध्दा निजेन. असे

आशाराजे म्हणत तेव्हा आम्ही तिला सांगायचो- रस्त्यावरच्या कचराकुंडीत निज. आशाताई गाई.

खुदकोभी हमने मिटा डाला मगर, फासले जो दरमिया थे रह गये!

तुम्हे याद करते करते जायेगी रैन सारी, तुम ले गये हो अपने संग नींद भी हमारी

मन है के जा बसा है अनजान उस डगर में

ते निजलेले गाव, मृत प्रजा सोडून ती पुढे गेली पण तिच्या मनात बसलेले घर? ते तिथेच दडून राहीले असावे. पेरले असावे.

रजनी राजे माझ्यावर ओरडल्या - माझी सोय करा. धूळवडगडीचा महाल विकून रोख रक्कम माझ्या नावावर ठेवा. तिथे धूळवडगडीचे महाली रूद्राक्षाचे मणी सापडतात पैसे रोख रक्कम घेवून यवहार करा.. वाच्छानीकडे पाहुण्यांची वर्दळ होती किंवा

वाच्छानी ही हवेली मागतोय म्हणून एका दलाला मार्फत तो महाल विकण्यासाठी एक गि-हाईक शोधले. गढी आशाराजेताई व आईसाहेबांच्या नावांवर होती. सहा वारसदांर होते. त्यांनी पाडून किंमत मागितली. दोन कोटी वरचे रोख दयायचे व नाममात्र रक्कम चेकने घ्यायची ठरले. मी व सीतारामभाऊ व्यवहार पूर्ण करण्यासाठी गेलो. खरेदी करणारा भितीदायक वाटावा असाच होता.

त्याची माणसे शस्त्रास्त्रे घेवून होती, व्यवहार असाच होता. व्यवहार पूर्ण करून रोख रक्कम घेवून कागदपत्र पूर्ण केली. व महालाची किल्ली त्यांच्या ताब्यात दिली. त्या खंडहर हवेलीचे इतके पैसे मिळाले म्हणून मला खूप आनंद झाला. मात्र परत येताना सिताराम भाऊराजे त्या पैशात वाटा मागू लागला. शब्दांने शब्द वाढला तो मला म्हणाला, '' तू निरवंशी तुला कशाला पैसा हवा'' आम्ही भांडत असतांना ज्यांने हवेली खरेदी केली होती, त्याच्याच माणसांने गाडी आडवी घातली. त्याची ती माणसे शस्त्रास्त्रे घेवून आली. एकाने आमच्या दोघाच्या गळयाला तलवार टेकवली. व पैशाची बॅग हिसकून घेतली. त्या गढीचे पैसे आमच्या नशिबी नव्हते. चेकने उरलेला व्यवहार पूर्ण झाला. पैसे आमच्या नशिबी नव्हते. माझ्यात व सीतारामभाऊराजे दोन भाऊ आमच्यात मात्र या प्रसंगाने वितुष्ठ आले. आशाराजेताई व आईसाहेबांच्या त्या गढीचे पैसे गेले.

आशाराजेताई आमच्या सेवेला आली असती **पण** वितुष्ठ आले. गेले पैसे गेले–

आशा राजेसुध्दा आयुष्यात सुखी नव्हती की होती माहीत नाही.

साठे ती असावी असे मला वाटले.

पण तिच्या मनाचा विचार करताना, माझा फार फील आले. तिचे लेखन बघता आमच्या मते नव्हती. असे मला वाटले. साठे बोलले नाही.

साठेंनी एक लेख दिला. राजे मनी वाचू लागले.

## १९ काही बोलायाचे आहे पण बोलणार नाही

'समानतेसाठी आम्ही' या सदरातील वेगवेगळया गावच्या व वेगवेगळया स्तरातील कुटूंबीयांच्या समानतेबद्दल त्या पुढे उचललेल्या पुढच्या पावलाबद्दल वाचून मी स्तिमित झाले.

श्रावणमासी हर्ष मानसी हिरवळ दाटे चोहीकडे

क्षणात येते सरसर शिरवे क्षणत फिरुनी ऊन पडे।

३१ मे २००९ ला वर्तमानपत्रात एक बातमी झळकली. एका इंजिनियर पतीने आपल्या इंजिनियर पत्नीला मुलगी झाली म्हणून भर रस्त्यात बेशुध्द होईपर्यंत मारले. ती पत्नी मुलीला पोटाशी घेऊन वाचवायचा प्रयत्न करीत होती. लोक बघ्याची भूमिका घेत होते. जेव्हा पोलिस आले तेव्हा तो पोलिसांना म्हणाला,'माझ्या घरचा मामला आहे माझी बायको आहे. मी मारीन नाहीतर जाळीन. ' स्त्री वरचा मालकी हक्क पुरुषांच्या मनात असा खोलवर रुजलेला आहे. समानतेसाठी आम्ही अशा वेगवेगळया प्रतिक्रिया माझ्या मेंदूत गोंधळ घालू लागल्या. बोलावे कसे ते समजेना, लिहावे काय कळेना. अशी अवस्था माझ्यातील त्या 'स्त्री' ची झाली. स्त्री ही अजूनही 'विकर सेक्स' आहे व तिला थोडासा मस्का मारावा, देवी ईमेज बहाल करावी व थोडयाशा पडतेपणाच्या निमित्ताने खूप फायद्यांची बेगमी करावी असे मला वाटले. समानतेचा हा सुवर्ण वर्ख वरवरचा साधारण वाटला.

१. उंबरठा :साधारण १९७७ सालापासून नर्स, कारकून, शिक्षिका अशा विविध व्यवसायात बायका नोकरीसाठी घराबाहेर पडल्या. बायका नोकरीसाठी घराबाहेर पडल्या. तरीही तो 'उंबरठा' ओलांडताना त्यांची बरीच घालमेल झाली. घरच्या जबाबदाऱ्या सांभाळून बाहेरचाही कामाचा महामेरु त्या स्त्रिया पेलू लागल्या. 'मी मिळवती' या अभिमानी बिरुदात त्या खूपच खुष होत्या व अवास्तव कष्ट करीत होत्या.

२. फायदा : फायदयाच्या गोष्टी समाज पट्कन स्वीकारतो तशी आर्थिक लालूच दाखवणारी स्त्रियांची नोकरी समाजाने पट्कन स्वीकारली. चैनीच्या वस्तू, घर दागिने अशा खरेदीत काळ झपाटयाने जात होता. वरकरणी सर्व काही ठीक दिसते म्हणजे असावे.

३. घर व घर-घर : घर घ्यायची हिम्मत पूर्वी फक्त निवृत्त झालेले वृध्दच फंडाचे पैसे काढून करीत असत. त्या घराबांधणीच्या खर्चात कधी स्त्रियांच्या दागिन्यांची, स्त्रीधन विकून जमवलेल्या पैशाची सोनेरी करुण किनार असे. खूप काटकसरीच्या काळानंतर स्वगृहाचे स्वप्न पूर्ण होई. स्त्रियांचया नोकरीमुळे पैसा मुबलक आला व घर लवकर घेता येऊ लागले. थोडे स्वातंjय हवे म्हणून विभक्त कुटूंबे अस्तित्वात आली. पाळणाघर म्हणजे बाळ बाहेर सांभाळायला ठेवणारी एक स्वतंत्र व्यवस्था अस्तित्वात आली.

४. कुटुंबसंख्या : एकत्र कुटुंबाकडून न्युक्लीअर फॅमिलीजकडे आपण वळलो. पण परकीय शक्तिच्या आक्रमणातून पुढे लग्नच नको, लिव्हईनमध्ये राहू या, मुलांचा त्रास नको मुले नको ईतक्या धाडसी विचारापर्यंत समाज आज येऊन पोहोचला आहे. कुटुंबसंस्थेच्या आठवणी आता थोडयाशाच उरल्या आहेत.

५. घटस्फोट : कसेबसे, कसेतरी कुठेतरी जगायचे असा विचार झटकून स्त्रीने कात टाकली. मनाने ज्या संसारातून बाहेर पडल्यावरही, जग रहाटीसाठी एकत्र राहणारी तडजोड करणारी स्त्री बंडखोर झाली व स्वत:च्या शोधात बाहेर पडली

६. संघर्ष : ‘सासरी उभ्याने गेलीस आडव्याने परत ये ’ म्हणजे ‘तिकडेच मर’ हया ऐवजी घटस्फोटाचा स्वल्पविराम स्वीकारुन स्त्री पुढच्या यात्रेला निघाली. ही यात्रा ही वाट खडतर होती पण संघर्षाचे बळ त्या स्त्रिच्या पंखात आले. एकत्र कुटूंबात ‘सन्यास्त सव्वाशण मी लेकुरवाळी’ म्हणत कसेतरी झुरत दिवस काढणारी सामान्यत: खचणारी स्त्री स्वबळावर पुढे सरकू लागली. आर्थिक स्वातंjयाशिवाय मतस्वातंjय शक्य नाही म्हणून शिक्षण व नोकरी हा स्त्रिच्या जीवनाचा अविभाज्य घटक ठरला.

७. What is for dinner ? 'स्त्री' नरुवारीतून पाचवारीत, पाचवारीतून पंजाबी सूटमध्ये व पुढे पॅण्टमध्ये आली पण मेघना पेठेंच्या फक्त तुझी दगडी भिवई प्रमाणे हा बदल बाह्यांगी आहे का? IAS परीक्षांत वेगवेगळया क्षेत्रांत स्त्रिया चमकू लागल्या पण.... चाळीस हजार पगार, वा! वा! ''ठीक आहे पण आता रात्रीच्या जेवणाचे बघ'' म्हणजे घरच्या जबाबदारीच्याच जोडीला ही करियर स्त्रीला ॲडिशनल चार्ज म्हणून मिळाली?

८. मुले कुणाची?

काळ बदलला तरी मातृत्व स्त्रीकडेच राहीले व मुलांचे संगोपन त्यांचे शिक्षण हयाही जबाबदाऱ्या स्त्रीवर आल्या. बाहेर नोकरीवर जातेच म्हणून येता जाता करायची. बाहेरची कामेही आलीच म्हणजे पुरुषांचा भार हलका झाला व स्त्रीच्या डोक्यावरचा वाढला. एक गाडी बाईला घेऊन दिली की बाई फिरत राहिली. एकापाठोपाठ एक कामं करीत राहिली. पुरुष मात्र दूरदर्शनसमोर विसावला. ओढाताण बाईचीच होऊ लागली.

९. स्वतंत्र स्त्री :पुरुषांची आर्थिक जबाबदारी कमी झाली, पैसा खुळखूळू लागला पण कुठेतरी बाहेर पडलेली ही स्वतंत्र स्त्री असुरक्षित बनली. लोकलगाडीमध्ये, अपरात्री कामाच्या ठिकाणी तिला ही स्वायत्तता एका आतल्या दंशासह येऊ लागली. स्वतंत्र राहतानाही ती 'स्त्री' आहे म्हणून भोग्यवस्तू समजून तिला सिनेमांनी विकृत रुप दिल्याने स्त्रीबद्‌दल आदर कमी होतोय असे समाजात दिसते.

१०. भय इथले संपत नाही.

शाळकरी मुलींपासून वरिष्ठ नागरिक स्त्रियांपर्यंत सर्वच स्त्रिया असुरक्षित जाणवू लागल्या. आज वर्तमानपत्रात वाचलेली बातमी नाव बदलून उदया आपल्या जवळच्या कुणाबाबत घडली तर? विकृतीच्या व्हायरसच्या पसरण्याला कुणी आवर का घालत नाही? हिणकस चित्रपट व विकृत अशा स्त्री प्रतिमा दाखवण्यावर कुणी आवाज का उठवत नाही? कितीही धीटपणाचा आव आणला तरीही स्त्रीला ती भीती असुरक्षितता बंदिवान करते. मला तरी करते. गझनीसारख्या

चित्रपटात एक ब्रीद वाक्य आहे, ‘तुमच्यासारख्या नराधमांमुळे स्त्री भेदरलेली रहाते. ’ एखाद्या स्त्रीची प्रगती आदर्श ठरावी अशी होती किंवा आहे पण प्रातिनिधीक नव्हती.

११. देव -कर्मकांड : असुरक्षिततेपासून वाचवण्यासाठी अजूनही हया आधुनिक स्त्रीला देवाचा व कर्मकांडाचाच आधार घ्यावा लागतो. यावरुन तिची परिस्थिती अनेक शतकांपूर्वी होती. त्यापेक्षा आज वेगळी असेल असे वाटते का?

१२. शील चारित्र्य मूल्ये : बदलत्या काळात संस्कृती रक्षकाची जबाबदारी स्त्रीवर आली. ‘तू सुखी राहा. इतरांनाही कर. मग तुला काय करायचे ते कर’ म्हणत पुढे जाणारा काळ हया स्त्रीला गोंधळवत राहिला. पाळणाघरे, विभक्त कुटूंबे, मुलांचे प्रश्न असा बदल घडला त्यांत स्त्रियांनी अगदी फारच नेटकेपणाने स्वत:ला सावरले आहे. त्याबद्दल त्यांना श्रेष्ठ मानायला हवे. समानतेसाठी हे उपक्रम स्तुत्य आहेतच, पण मुख्य म्हणजे आपण स्त्रीला बरोबरीने वागवून तिला स्वातंय देऊन काही विशेष करीत आहोत, असा दंभ असा अहंकार त्यात नसावा हीच इच्छा प्रत्येक स्त्रीची असते.

१३. मिळून साऱ्याजणी - स्त्रियांच्या बाबतीत एकी होणे ही गोष्ट अतिशय अवघड ठरली.

म्हाळसाबाणाई झुंजती देखोनी मल्हारी हसती

अशा रीतीने एकी होऊ न देण्यासाठीच प्रयत्न केले गेले. स्त्रीचे प्रश्न उपेक्षित राहिले.

१४. खास काहीजणींसाठी

काही वर्गात, काही जातींत काही कुटुंबामध्ये अजूनही स्त्री समानता ही काही वस्तू आहे याची जाणीव नसते. स्त्रीने सर्व करायचे पण ते घर व नाते घट्ट सांभाळूनच करायचे व अशी आखूडशिंगी बहुदूधी कपिला गाय हवी म्हणून मुलगी निवडतांना अधिक चोखंदळ व्हायची वृत्ती आढळते. हया सर्वांमधील काही खास जणी तर ‘लग्न नको’ म्हणू लागल्या अजूनही बऱ्याच घरी मुलगी झाली कि दु:खी होणारे लोक आहेत. त्यावरुन स्त्री समानतेसाठी अजून बरेच काही करायला हवे हे दिसते.

१५.	स्त्री भ्रूणहत्या :स्त्री समानतेचा पुरस्कार जर समाजात होतो आहे तर वाढत्या स्त्री भ्रूणहत्या काय दाखवतात? गर्भजल चिकित्सा करुन गर्भलिंग का ओळखले जाते?

१६.	स्त्री पुरुष समानतेबद्दल पडलेले हे पाऊल सत्य आहे पण स्त्रीची समाजातील परिस्थिती आजही पूर्णपणे व्यक्त होत नाही. समाजापुढे येत नाही. हिमनगाचा एकसप्तमांश भाग दिसावा तशी बाहयरुपी, प्रत्यक्षदर्शी प्रगती व समानता सहा सप्तमांश भाग सत्य स्त्रीच्या पदराआड पडूनच राहते. सत्यशोधक समितीचे अहवाल याबाबत बरेच काही सांगून जातात. माहेरी स्त्रीला सन्मान नसेल तरी तिला ब्र उच्चारता येत नाही. सासरी दरवाजाजवळच्या पाय पुसण्याइतकी किंमत असली तरीही गोड मानून घ्यावे लागते. चारचौघींची प्रगती म्हणजे सामान्य स्त्रीची प्रगती नव्हे म्हणूनच म्हणते, काही बोलायाचे आहे. पण बोलणार नाही.

,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,

या लेखात खूप दर्द होता. साठेंच्या सांगण्यानुसार अपराधी भावना संपण्यासाठी मी आशाताईला एक पत्र लिहिले. नंतर ते फाडून टाका, साठे म्हणाले.

प्रिय आशाराजे,

हा देश निजलेला आहे. तुझ्यावर अन्याय झाला तेव्हा ते लोकही गप्प बसले. मी चुकतो आहे हे मला कुणी सांगितले नाही. तू खूप चांगली वागलीस, पण मीच वाईट वागलो.

चिठ्ठी फाडताना माझा हात थरथरला, मी नोकराला पाण्यासाठी हाक मारली माझा आवाज चिरकला.

साठे म्हणाले. ‘तूम्ही सुखी रहा इतरांनाही करा पण...

मी सांगू लागलो.

आशाराजेताई माझी बहीण पण, संसारात ठीक आहे याची असूया मला झाली. सख्ख्या बहिणीच्या सुखाचीही असूया असते! हो असते! त्याला सिबलींग रायव्हल्री म्हणतात! भाऊबंदकी म्हणतात. एक दिवस आशाराजेताईच्या नवऱ्याचा फोन आला. तुमची बहीण तुम्हाला भेटू इच्छिते. भेटून जा. तिची तब्येत बरी नाही. मी जाणे टाळले.

जर आशाराजेताई गेली आणि मोठया बहिर्णीप्रमाणे ही बहीणही वारली, तर मग मी गढीचा मालक ठरणार. मी भेटायला गेले. राजेपाटलांना मुली नकोच होत्या त्या अशा वारल्या. पण आशाताई वीस वर्षे नोकरी करत होती, कमवत होती. तिचा नवरा व्यवस्थित होता. मी तेराव्याला जावे तसे गेलो. खाऊन पिऊन वर तिच्या नवऱ्याशी भांडण काढले. ज्यावेळी आशाराजेंची मुलगा व सून त्यांची सेवा करत होते व त्यांचे चाहते देवाला त्यांना दिर्घायुष्य मिळावे म्हणून प्रार्थना करत होते. तेव्हा मी तिचे पती रामला म्हणालो (आशा राजेंचे पती ) 'आशाराजेचे सर्व दागिने गुपचूप दया' मी दुष्ट आहे हे तो ओळखून होता. म्हणून तो म्हणाला 'तिला काही दागिने नव्हते' 'शटप तुम्हाला कोर्टात खेचेन, पोलिस केस करतो तुम्ही त्यांना त्रास दिला ' तो गृहस्थ माझ्या पाया पडला. त्याची आई म्हणाली, ''तुमच्यापेक्षा आम्ही तीला सुखातच ठेवले होते '' त्याने आशा राजेंनी साठवलेले व मित्रांकडून उसने पैसे गोळा करुन पैसे आणून दिले. माझ्या बहीणीचे कपडे दागिने माझ्यासमोर ठेवले. व म्हणाला, ''आम्ही खाऊनपिऊन सुखी होतो. आमच्याकडे हयांहून अधिक पैसे नाही. ''

कपडयांचे मला काय कारायचे होते? एक चांदीची पेटी व दागिने व पैसे घेऊन बाहेर पडलो. वाटेत मला खुदूखुदू हसू येत होते. मरतांनाही ही बहीण मला डबोले देऊन गेली. खरेच आम्ही राजेपाटील बंधू भाग्यवान! पण त्या आजारांतून आशा राजें वाचल्या. घरी येऊन मी ती पेटी उघडली व त्यात एक पत्र सापडले. मूर्ख आशाताई ४० वर्षापूर्वी मेलेल्या आईला पत्र लिहिले. मी ते वाचले. साठे म्हणाले

मी वाचू?काय सांगते आहे?

## २० शेवटचेच पत्र

प्रिय आईस,

तुला लिहिलेले हे शेवटचेच पत्र असेल. अर्थात कारण हेच की हया पत्रासाठी माझी अट आहे की मी मेल्यावरच हे पत्र फोडावे.

तर हे पत्र मी तुला काही सांगण्यासाठी लिहीत आहे. जर मी वेळोवेळी तुला ते सांगायचा प्रयत्न केला असता तर तू 'आजकालच्या तुम्ही मुली तुम्हाला सुख टोचते अग संसार म्हणजे एक तडजोड असते' असे सांगून उडवून लावले असतेस व मीही 'अग गंमत केली' म्हणून डोळे पुसले असते. आपले दु:ख कुणालाही कळू नये किंवा त्या दुसऱ्या व्यक्तीने ते कळूनही न कळल्यासारखे दाखवावे याचे दु:ख फारच भेदक असते. तरी मी तुझेच सहनशील गीत गाते आहे. निदान बाईने एक स्त्री म्हणून दुसऱ्या स्त्रीला समजून घ्यावेसे वाटते म्हणून तुला सांगते. पण आई तू एकदा म्हणाली होतीस.

'भाऊ व दादा म्हणतात तिच्या मनातल्या असंतोषाचा उद्रेक होऊ देऊ नको. नाहीतर तो वणवा तिचा संसार व आपल्या खानदानाचे जंगल जाळेल. अर्थात आई वणव्यातसुध्दा अर्धे सजीव म्हणजे श्वास घेणारी, पण चालू न शकणारी, स्थिर झाडेच जळतात. श्वापदे पळून जातात, पक्षी उडून जातात. वृक्षवल्लींची राख होते. आई माझीही अशीच आगीत राख होते आहे. माझी झुंज एकाकी आहे. घाबरू नको लिहिले की बरे वाटते म्हणून सांगते आहे.

मी माझ्या आंतरराष्ट्रीय शिष्यवृत्तीच्या एका पुस्तकाच्या छोटयाशा ब्लर्बचे मलपृष्ठाचे काम होते, मी नोकरी घरकाम व वयोमानाने होणाऱ्या थकण्याचा सामना करत होते. त्यावेळी मी माझ्या नवऱ्याला ते पुस्तकाच्या मलपृष्ठाचे मुखवटे तयार करण्याची विनंती केली. लोकांची प्राप्तिकरांची, निवेदनांची काम करणारा बाकी लष्करची भाकरी भाजणाऱ्या नवऱ्याने चार ओळी टाईप करुन ते काम अर्धवट करून माझ्या तोंडावर फेकले व म्हणाला 'तुझी तू कर, प्रत्येक गोष्टीत तुला कुणाची मदत कशाला हवी? आणि दूरदर्शनवरच्या दिशाहीन मालिका बघत बसला. डोळे गरगरा फिरवत मला म्हणाला 'तुला लिहायला तर देतो ना! 'म्हणजे ते सुध्दा

कथित उपकार खूपच झाले म्हणायचे. माझे ब्लर्बचे काम माझ्या एकटीकडून पूर्ण झाले नाही व माझी ती संधी हुकली. पुरुषाचे करीअर चढवावे मग मला करिअर का शोभू नये. आई काही कामात मदतीला कुणी पुरुष सेकंड हॅण्ड मदतीला हवा गं! 'स्वयंपाक करणे न येणे' पुरुषाला शोभते मग कम्प्यूटर वर भराभरा काहीभाग काम न करता येणे (तेही वेळ नाही म्हणून) मला का शोभू नये. मग मला मदतीला गरज पडली तरीही कुणी मदतीला येऊ नये. एवढे माझी स्टेटस त्याच्या आयुष्यात सेकंडरी आहे. मी सेकंड हॅण्ड आहे हया भावनेने केलेले हे दुर्लक्ष आहे का? फक्त चारचौघात सुंदर बायको मिरवून पुरुषाचा अहंकार सुखावतो. बाकी सत्य बाहेर कितीजणी सांगू शकतात? सहजीवनाची सुख पातळी किती?तरीही ठिकच आहे.

न व्याख्या ना त्याची नांदी

नवजीवनाची करु या नांदी.

मुलींनाही देऊ या संधी...

आधुनिकतेचे विचार तू पूर्वी अंगीकारले होते' शिक असे म्हणत तू मला शिक्षण दिलेस. मी तुझ्यावर त्यावेळी रागावायचे खरेतर तू जिवंत होतीस तोपर्यंत मी कधी लाडाने तुझी पापी सुध्दा घेतली नाही. घरातील पुरूष म्हणजे भाऊ व वडिल यांनी तुला मन नाही असेच गृहित धरले होते. मला वाटते तुझ्या आत्म्याने मला शाप दिला असेल. तुझा नवरासुध्दा असाच निष्ठूर व कृतघ्न निघेल व तुलाही कळेल ज्याच्यावर प्रेम आहे तो निष्प्रेम असला की कसे वाटते. असू दे! तरीही सर्व ठीक आहे म्हणायचे. तू व्यायाम करायला हवा म्हणून अंगावर खेकसणारा हा नवरा मला व्यायामाला थोडा वेळ मिळावा म्हणून कपडे धुवायला वॉशिंग मशीनही लावत नाही. येताना भाजी आणणे, इस्त्रीवाल्याला कपडे मोजून देणे हीच काय तर बॅंकेचे व्यवहार,वकिलाची कामे, आर्थिक नियोजन हे सर्व त्याला 'जमत नाही' म्हणून माझ्या माथी मारले आहे. पाच वर्षात एटीएमचे स्टेटमेंट सुध्दा त्या राम ने कधी आणले नाही.

घर घेणे हे 'तुलाच हौस' म्हणत माझ्या गळी मारले. म्हणजे काय निर्णय चुकला तर बोल लावायला मला जबाबदार धरता येते. असू दे! तरीही छत आहे हे ठीकच म्हणायचे. बाहेरच्या

जगातील गिधांडाचा अनुभव मी घेतला आहे. मागे सुनीताताई म्हणाली होती, 'नीट जेवत जा' म्हणून अशा आवाजात ओरडून सांगतो की जीव दडपून दोन ठोके चुकतील. खेकसून 'जेव जेव' सांगून काय उपयोग? दोन घास चावायला जो वेळ हवा, तो दिला तर मी जेवणार ना! स्वत:चे कपडे धुवायला व ईस्त्रीला टाकायला (फोन करुन) एकच मिनिट लागतो म्हणून मला करायला सांगितले जाते. जर एकच मिनिट लागतो तर राम ते का करत नाही?

तसे हे प्रश्नं गंभीर नाहीत. मुलगा चांगला आहे मी लग्नाच्या परिक्षेत ३५ टक्के पास आहे. ज्यांच्या घरी पत्नी नोकरी करते त्यांच्या घरी हे होतच असावे असते. पैशाचा प्रश्नं नको असेल तर हे स्वीकारावे लागते आई मी परत प्रश्न विचारला तर भांडणाचा त्रास मलाच होईल. म्हणून मी गप्प बसते. पण मिळवतीच्या नव्या प्रकारच्या सासूरवासात हा विसंवाद ऑफिसमध्ये कानावर पडतोच. आई माझ्या नशीबी सर्व वस्तू सेकंड हॅण्डच येतात. घरीही तू मला भावाची जुनी सायकल जुनी पुस्तके घ्यायचीस. माझे त्या घरातील स्थान सेकंडरीच होते. लग्न होऊन हया घरी आले तेव्हाही ते सेकंडरीच राहीले. भाऊ मला सेकंडहॅण्ड म्हणायचा. त्याला वाटायचे ही आपल्या इस्टेटीत वाटा मागेल. कुठलाही बीजवर शोधा व हिला घराच्या बाहेर हाकला असा त्याचा मराठी नसलेला तेजस्वी बाणा होता. मला असेच नीट चौकशी न करता एका घरी ढकलण्यात आले. तुझा व राजेदादांचा दोष नसेलही कदाचित, पण माझा त्यात बळी गेला. त्या पुरुषाच्या आयुष्यात आलेली मी सेकण्ड गर्ल होते.

लहान मुलांना पाळणा घरात सोडून नोकरीला जातांना प्रचंड अपराधी वाटते पण वरकरणी आनंद दाखवून सुखाचे व करीअरचे मुखवटे चढवावे लागतात सासरी गेलेल्या त्या मुलीने उभ्याने जावे व आडव्याने परत यावे म्हणजे सासरी तरी मीच मरावे असा टोमणा भाऊराजे हाणत असे. भाऊ वडिलांना 'आपल्या खानदानी घरात सतीची समाधी आहे तुम्ही ही कशाला घरात ठेवता! ' तरीही त्या असहय असहजीवनातून सेकंड हॅण्डचा शिक्का घेऊनच बाहेर पडावे लागले. पुरुषाचे बरे असते. त्यांच्याकडे वाईट नजरेने बघणारे हवसे-नवसे फारसे नसतात. स्त्री मात्र कायमच व्हीक्टीम असते. सेकंड हॅण्डचे स्टेटस घेऊनही जगणे अवघडच

होते.  दादाराजे एकदा एका सामाजिक कार्यकर्त्याकडे घेऊन गेले.  तो म्हणाला दुसरे लग्न करुन घ्या किंवा त्यांना दुसरे करिअर करू दया. ’

मी म्हणजे गरम उकडलेला बटाटा होता.  कुणालाही हातात धरायचा नव्हता.  शिवाय वाईट नजरेच्या पुरुषांपासून घटस्फोटीत सेकंड हॅण्ड मुलीला सांभाळणे, वाचवणे अवघडच असते. चार काळे मणी वाईट नजरेपासून दृष्टीपासून वाचवतात ते असे राजघराण्यातील करोडपती वडिलांची  लाडकी लेक सेकंड हॅण्ड स्टेटसमधून बाहेर पडली ती साध्या पध्दतीने लग्न करुन! वाटले माहेरी भाऊराजे मारेल किंवा खून करेल सासरी नवऱ्याकडे मरु किंवा जगू, मरत मरत जगू  किंवा जगत जगत मरु.  खरेतर मला लग्न करायची अजिबात ईच्छा नव्हती.  जर एखादया स्त्रीला लग्न करायचे नसेल तर तिला ती मुभा का दिली जात नाही?  सुरक्षिततेसाठी नवऱ्याचाच आधार का हवा? भाऊ संरक्षक, मित्र, केअरटेकर का होत नाहीत? लग्न करायचे नसेल तर कुठे बिघडते?घरातल्या एका कोपऱ्यात ती सेकंड हॅण्ड वस्तू पडलेली राहिली तर कुठे बिघडते?  तिची भावाला काय अडचण होते?  त्या स्वार्थी माणसांच्याच भाषेत सांगायचे तर ‘मुलीचे लग्न करणे म्हणजे अजूनही काही घरी अडगळीचा कोपरा रिकामा करा! ’ अडगळ राहीली तर कुठे बिघडते? यहुदीत एक वाक्य आहे.

तुम्हारा ही खून होता है खून हमारा है पानी!
भाऊ पुरुष घरी त्याचा थाट असावा.
त्याची बायको वहिनीसाहेब वा वा!
घरातली मुलगी तिला वाटेला लावा.
ती वाईट आहे हा वर कांगावा.
घरदार करोडोची दौलत
सर्वकाही भावाचीच रियासत
बहीणीला मिळतो नुकसानीचा वारसा
वर म्हणतात मागत होती वाडयात हिस्सा

नाव काय असते बदनामी काय?

स्वार्थासाठी केलेला एक डाव! तरीही मी सुखी आहे  ठेव हा भाव!

तर अशा रीतीने तुमच्या  घरची अडगळ घरगळत या घरी आली.  कामाला स्वयंपाकाला शिवाय नोकरी करुन घरात पैसे आणायला एक बाई या घरी आली.  मी सासरी आले. बाहेरुन दुरुन बघणाऱ्याला चोकर्सचे काळेमणी साजिरे दिसतात पण जो घालतो त्यालाच ते चोक करतात, टोचतात गळचेपी करतात. मी जेव्हा शिक्षण घ्यायचे म्हटले तेव्हा बराच विरोध झाला तेव्हा रात्री आई  उजेडाचा त्रास इतरांना होऊ नये म्हणून मी डायनिंग टेबलच्या खाली बसून अभ्यास केला. आई तुझ्या लेकीला सुवर्णपदक मिळाले तेव्हा तिला घरी शाल जोडीतले आहेर मिळाले, ‘स्वयंपाक करा, ठेवा ते बाजूला. अहंकार वाढलाय तिचा एक पुस्तक काय वाचले, चार लेख काय लिहिले. ’

तरीही ठीकच आहे. चार काळे मणी वाईट नजरेपासून दृष्टींपासून वाचवतात. भांडणानंतर थंडगार शिडकाव्याप्रमाणे प्रेम मिळते. मुलगा लाडीगोडी लावून चिकटतो व शेवट गोड होतो. स्त्री ही आई झाली नसती तर पुरूषांचे अन्याय ती कशी सहन करू शकली असती?

आपली सून चांगली आहे असे सासू कधीच म्हणाली नाही.  ती घरकाम करीत नाही. सुग्रास पंच पक्वाने बनवत नाही हे गाऱ्हाणे ती सांगत राहीली.  सकाळी ८ ते रात्री ७ नोकरी करणारी स्त्री अजून कितपत घर व संसार व नोकरी बॅलन्स साधू शकते? पण चांगल्या गोष्टी माझ्याबद्दल कुणी कधी बोललेच नाही.  मी क्षणाक्षणाला कणाकणाने झिजत होते.  मनाने खचत होते कारण माझे कौतुक कुणालाच नव्हते. सोड! ती अपेक्षाच नव्हती, पण किंमतही नव्हती. नशीब गांडू कुणाशी भांडू? कितीतरी सेकंड हॅण्ड गाडयांना चांगले मालक मिळतात ते त्या गाडीवर प्रेम करतात.  गुणदोषासह करतात. सोड!  मला तर माझ्या गुणांकडे दुर्लक्ष करुन दोषच उगाळणारे सासर मिळाले. काहीजणींचे नशीबच खडतर असते आणि तक्रार कुणाजवळ करणार? वडील स्वार्थी होते त्यांना चारचौघात मुलगा मिरवायचा होता.  भाऊराजे लबाड होते त्यांना बहीण नकोच होती.  नवरा हुषार होता. पण त्याला मला त्याच्या अपेक्षांत मला मोल्ड करायची होती.

त्यांच्या मर्जीप्रमाणे आखूडशिंगी बहुदूधी कपिला गाय हवी होती म्हणजे अप्सरेत दिसणारी, पक्वान्न करणारी, आयुष्यभर गोडीगुलाबीत नोकरी करणारी, थोडावेळ झोपून जास्त वेळ काम करणारी, घरची बाहेरची सर्व कामे करणारी व त्यांच्यापुढे 'माझे किती भाग्य मी तुमच्या पदरी पडले किंवा तुससी ग्रेट हो' म्हणत त्यांचा अहंकार सुखावणारी हवी'' माझ्या अपेक्षा कुणी कधी विचारल्याच नाहीत. सेंकड हॅण्ड मुलीला अपेक्षा कोण विचारते का? आणि सगळयाच अपेक्षा कशा पूर्ण होणार? आरोग्य हवे पण मिळणार कुठून?

आई आता माझे वय पुष्कळ झाले. मला वयोमानाने चष्मा लागला. छातीत दुःखू लागले. हृदयविकाराची सुरवात जाणवू लागली. पण मला कुणीही दवाखान्यातही नेत नाही. 'व्यायाम' एकमेव रामबाण हयांच्या भाल्यात असतो. बरे झाले आई हयांच्या घरी कुणीही डॉक्टर नाही, नाहीतर आयसीयूतील पेशंटलासुध्दा चालायला किंवा व्यायाम करायला लावले असते. शिवाय सगळे दुसऱ्यांनीच करायचे असते हयांनी फक्त क्रेडीट घ्यायचे असते. त्यामुळे व्यायाम करुन मी कितपत हेल्दी राहीन देव जाणे! असू दे माझी सेकंड हार्ट ॲटॅकच्या दिशेने वाटचाल चालू आहे. सत्तरीची माणसे ठणठणीत आहेत. मी मात्र थकले आहे. सुखाचे कुंकवाचे बोट शरीरांवर छोटेशेच लागते. प्रत्येक क्षण सुटा नसतो. कुंकवाच्या बोटाशी जुळलेलाच असतो. स्त्रीचे आयुष्य भुतकाळ, वर्तमानकाळ लग्नांशी संबंधीतच असतात. कुठेतरी त्या संसारातच विश्रांती न घेता औषधोपचार न करता ती संपून जाते. आजार शरीराला होतात पण ते मनाला घाबरवतात.

आई पैसे खर्च करायचे असते तर गोष्ट वेगळी! इथेतर पैसे माझ्या ऑफिसकडूनच मिळणार आहेत पण दवाखान्यात खेपा घालणे, डबा देणे वगैरेंनी त्यांचे विश्रांतिचे रुटीन बिनसू शकते. त्यामुळे मी अशीच एक दिवस तक्रार न करता वर जाईन. आई, खूप वर्ष खूप दुःख सोसली आयुष्यभर सेकंडरी स्टेटस भोगले. खूप गरम दूधाचे पातेले हातात धरुन उभे करावे पण पातेलं हातातून सरकले की दूध सांडून जाते त्यामुळे दोन्ही पर्यायात हात भाजून घ्यावे लागतात. आई मी पहिल्यांदा नवऱ्याला सोडून आले तेव्हाही मला अगदी असहाय झाले म्हणून

आले. पण आता हात पोळले तरी मी हे पातेले सोडू शकत नाही. मरण्यापूर्वी कुणालातरी सांगायचे म्हणून सांगते आहे. आई संसाराचे दूधाचे पातेले सहजासहजी कोण हातातून सोडेल का? वेदनांची प्रतिक्षिप्त क्रिया म्हणून हात मागे झाले व दूध सांडेल मला तरी 'सेकंड हॅण्ड' हया शब्दाचे डाग हवे होते का? माझे दुर्दैव की ते माझ्यावर चिकटले. महादुर्दैव म्हणजे ते भावानेच चिकटवले.

समाजात कितीतरी मैत्रिर्णींनी लग्नाआधी प्रकरणे केली होती त्या सेकंड हॅण्ड नव्हत्या? साखरपुडा होऊन लग्न मोडलेल्याही होत्या. त्या सेकंड हॅण्ड नव्हत्या? काहीजर्णींनी अजिबात इच्छा नसताना भांडण होऊन मोडलेल्या संसारात खितपत पडावे लागले त्यांना स्वतंत्र रहायची इच्छा होती, पण हिम्मत झाली नाही म्हणून संसाराचा गाडा ओढत होत्या, काही प्रकरणवाल्या ही होत्या त्या सेकंड हॅण्ड नव्हत्या? मॉलमध्ये ट्रायल रुममध्ये घालून बघून पुन्हा हॅंगरवर लावलेला ड्रेस सेकंड हॅण्ड नसतो? फक्त खरेदी करणाऱ्याला माहीत नसते की हा सेकंड हॅण्ड आहे. सोन्याचे जुने दागिने मोडून नव्या घाटणीचे दागिने केले जातात ते सेकंड हॅण्ड नसतात? ज्या आईच्या कुशीतून मी जन्माला आले त्याच कुशीतून भाऊ जन्माला आला मग तो भाऊ उष्टया कोखमधून जन्मला म्हणजे तो सेकंड हॅण्ड नव्हता. गणपतीच्या कारखान्यातील न विकले गेलेल्या मूर्ती पुढील वर्षी विकतात. सेकंड हॅण्ड शब्दाचा तरी अर्थ काय? त्या मूर्ती सेकंड हॅण्ड होतात? सेकंड हॅण्ड शब्दाने माझी कोणती दु:खती नस कापली जाऊन भळभळा वाहते?

आता तर समाजात लाईव्हईन रिलेशनची पध्दती आली आहे. त्या स्त्रिया ते पुरुष सेकंड हॅण्ड होत नाहीत का? लग्नाच्या विधींचा लेबलचाच संबंध सेकंड हॅण्ड होण्याशी असतो का? सेकंड हॅण्ड म्हणजे नक्की काय? आपल्या धर्मात पुनर्जन्म मानतात. आई तुझी लेक सेकंड लाईफ मध्ये अजिबात सेकंड हॅण्ड म्हणून जन्मू इच्छित नाही. तू जाऊन वीस वर्षे झाली तरीही मी तुला पत्र लिहित आहे. यावरुन ओळख की मला तुझ्याएवढे जवळचे किंवा तुझ्याएवढी जिवलग मैत्रीण म्हणावे असे कुणी मिळालेच नाही.

कधी वाटते उगीचच आपण ईतके चांगले होतो. आपल्या चांगुलपणाचा फायदा सर्वांनीच घेतला शिवाय चर्चा करुन ‘सेकंड हॅण्ड’ स्टेटस बद्दल सुप्त विकृत आनंद मानून स्वत:चे ते चांगले स्वभावाचे व सभ्य, भिडस्त नसणे’ किती व्यवहार्य म्हणजे चांगले आहे हयाची पुष्टीच केली. म्हणूनच तर कौरव लौकिकार्थाने मजेत राहिले व पांडव महाभारतात पुस्तकातले हिरो ठरले. प्रत्यक्षात चांगला माणूस म्हणजे नापास आहे.

सबकुछ सीखा हमने न सीखी होशियारी

सच है दुनियावालो के हम है अनाडी.

हे पत्र मिळेल तेव्हा मी दूर गेली असेन. अर्थात जीवंतपणी जरी चुकून मिळावे असते तरीही तुम्ही कुठे धावत येणार होतात म्हणा आणि जरी चार पावले पुढे जायला निघाला असतात तरी भावाच्या म्हणजे आदित्य राजेंच्या धाकाने व मायेने परत वळला असतात. राजघराण्यांतील उपेक्षित मुलगी, वसतीगृहातील नोकरी करणारी मी, विवाहीता, माता, पत्नी, स्वयंभू लेखिका, लेक,सासू अशा या प्रवासात मी पस्तीस टक्के पास व पासष्ठ टक्के नापास झाले आहे.

सेकंड हॅण्ड पुरुषांची कहानी मात्र निराळी असते. ती का?

पुरुष -स्त्री समानता असते का?मूठभर व्यक्तिंकडे असेल. बाकी घरी काय?

स्त्री ही बंदीनी? की न स्त्री स्वातंत्रम् अर्हति म्हणून हिणवणे? की तेवढीही दखल न घेणे? तरीही मी सुखी आहे. मी तुझेच गीत गात आहे.

**आशाताईराजे**

,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,

**तरीही मी सुखी आहे**.

हे आनंद मानून घेणे गंगा,

आशाराजेंची मैत्रीण सांगा.

आता कळून उपयोग नाही... सुखाचे साधारण परिमाण पस्तीस टक्के पर्यंत इतकेच असावे. साठे म्हणाले,''शो मी अ हॅपी मॅरेज असे तत्ववेत्ता म्हणाला आहे. संसार इतपतच सुखी असतात माझी पत्नी मरेपर्यंत मला तीची किमंत कळली नाही. आता कळून उपयोग नाही. राजे मी गंगाचा नवरा आहे. मी आशा राजेंबद्दल तिच्याकडूनच माहिती मिळवली. ''साठे मुसमुसु लागले.

राजे पुढे सांगू लागले. आशा राजेंचे पत्र वाचून झाले होते.

मेव्हण्याला वेळीच पुन्हा ब्लॅकमेल करायचे मी ठरवले. मी मुंबईला गेलो. ऑपरेशन नंतरही आजारी आशाराजे लोकल गाडीत सेंकड क्लासच्या डब्यात दारात लटकत नोकरीला जातांना दिसल्या. माझ्या पोटात तुटले मी आणलेले दागिने माझ्या बहिणीच्या रक्ताचे होते. तीने घाम गाळून कमवलेल्या पैशाचे होते. मी मात्र ते रेस खेळण्यात उडवले. मी खालमानेने परत आलो. माझ्याप्रमाणे बहीण नकोशी असलेल्या नराधमांनी व मुलगी नको म्हणणाऱ्या सत्पुरुषांनी (?) भ्रूणहत्या केल्यामुळे स्त्रियांचे प्रमाण खूपच कमी झाले होते. मला वाटते होते. 'मला मुलगी नको इतरांना होऊ दे' पण इतरांनीही तोच विचार केला पण त्या विचारामुळे माझ्या मुलाला मुलगी मिळेना. बहीणींना मारण्यात माझा मोठा भाऊही माझ्या इतकाच दोषी होता पण देवाने व त्याच्या पूर्व पुण्याईने व दैवाने त्याला नेहमीच भरभरुन दान दिले. त्याच्या मुलांना मुली मिळाल्या. माझ्या मुलांना मिळेना. त्याच्या मुलांना मुलगे झाले व तो अभिमानाने व गर्वाने माजला.

माझ्या मुलांची लग्नेच होत नव्हती. समजा माझ्या पापाचे फळ मला मिळाले. मग माझ्या भावाला का नाही! त्याने कोणते पुण्य केले होते? मोठया भावाने व त्याच्या बायकोने आशाराजेंचा संसार मोडला पण त्याला देवाने शिक्षा केली नाही. मग माझ्याच मुलांचा संसारही थाटला जाऊ नये! मुलींना, बहीणींना मी नेहमीच तूच्छ लेखतो. पण आता मुलांना लग्नाला मुलगी हवी म्हणून मी उत्सूक झालोय व काळजी करीत आहे. इतके दिवस सुध्दा असा भाऊ नसावा म्हणून लोक माझ्याकडे बोट दाखवत होते मी मात्र गर्वाने ते माझा आदर करतात असे समजत होतो. डोळे उघडले तेव्हा त्या नजरांचा अर्थ कळला. देवाने गर्वाचे घर खाली केले.

## २१ सतीच्या समाधीजवळ

आदित्यराजे लेखक साठेंना रोज लिखाण सांगत असत. साठे भक्तिभावाने लिहून घेत. आशाराजेंप्रमाणे साठेही वाळूच्या घडयाळाजवळ बसून राही. त्यांच्या राहण्याची सोय राजमहालातच समाधीजवळ केली होती. राजेपाटील कुटुंबाला परका साठे त्या महालात चालला होता. पण बहिणी मात्र नको होत्या. माणूस परक्या व्यक्तीवर विश्वास टाकतो, पण आपल्या माणसांवर संशय घेतो. राहण्यासाठी दिलेली, साठेंच्या खोलीजवळ हत्तीची जागा होती. एकच हत्तीण उरली होती. एक माहूत तिथे राहत होता. साठे मितभाषी होते. कधी कधी ते आनंदगावी राहणाऱ्या बहिणीकडे जात असत. पण बाकी वेळ लिखाण व वाचनात घालवत असत.

आदित्यराजे खरे सांगतात की खोटे ही उत्सुकता साठेंना होतीच. पण इतके खरे सांगतात याचे नवलही वाटले. चष्मा सावरत साठे पुढे लिहू लागले.

या घराण्याने अनेक मुलींना मारले. परक्याच्या व स्वत:च्याही मारले. आम्हाला मुली नकोच असायच्या मुलगी झाली कि आम्ही म्हणजे आमचे पूर्वज दाईला सांगून बाळाला आइचे शेवटचे दूध पाजायला सांगत असू नंतर बाळाला मीठ खायला देण्यात येई. ती मुलगी बाळ रडून रडून मरुन जाई. सोन्या भाऊंनी चारही मुली जगवल्या पण त्या आम्ही नंतर मारल्या. आशाराजेताईला मी घरातून हाकलले पण मनातून हाकलू शकलो नाही. मी तिला मुलगी म्हणून हीणवले पण आईने आशाराजेच्याच मांडीवर प्राण सोडला. वडील जेव्हा मेले तेव्हा मी वाच्छानीच्या लग्नासाठी शहरात व पुढे बायकोला घेऊन शहरात सिनेमाला गेलो होतो आशाराजेनेच त्यांना हाताने शेवटचे पाणी पाजले. मुलगी मुलांपेक्षा श्रेष्ठ असते हे आशाराजेने कृतीने दाखवले. तिला वारसा म्हणून आम्ही काय दिले? असुरक्षितता बदनामी, अपमान! मधुर भक्ती, शृंगार, प्रीती, भोळेपण म्हणजे मुलगी त्या आम्ही मारल्या. हो. गोष्टीचे वेव्हाळपणा आशाराजेताईला वडिलांनी दिला. सोन्या भाऊराजे दादांचाच काया प्रवेश असेल का? की सतीच्या समाधीतील सती आशाराजेताईला सांभाळत असेल. ती सती माता तरी स्वत: मनाने सती गेली कि

माझ्यासारख्याच एखादया नीचाने जबाबदारी नको म्हणून तिला आगीत ढकलले. सतीच्या समाधीत काय खरे व काय खोटे असेल? खरे लिहावे कि नाही मला कळत नाही. सांगावे म्हणून सांगतो सतीच्या समाधीच्या आसपास म्हणे रात्री अवेळी स्त्रीच्या किंकाळया ऐकू येतात. स्त्री सती जाण्यापूर्वी जिचा नवरा मृत झाला आहे, त्या स्त्रीला कदाचित म्हणे अफ्फू देण्यात येते. म्हणजे तिने सती जायला आगीत उडी मारायला, विरोध करु नये, नाकारु नये. सतीच्या ज्वाला पेटत असतांना जोरजोरात ढोल व ईतर वाद्ये वाजवण्यात येतात. 'राणी सतीराजेचा जय हो' म्हणून ओरडले जाते का? तर सतीच्या किंचाळया ऐकू येऊ नये. बाजूला दांडगे लोक काठया घेऊन उभे असतात का तर जळतांना वेदनांनी सतीराजे बाहेर यायचा प्रयत्न करु लागली तर तिला काठीने आत ढकलावे व ती स्त्री सती नाखुषीने गेल्याचे बाहेर येऊ नये. असे कोणीतरी सती गेले असेल का?

एकलव्याच्या भक्तीची आशाराजेताई सव्यसाची अर्जूनाप्रमाणे जखमी झाली. या वाडयात या वास्तूत वाटते आपले पूर्वज आसपास आहेत. आशाराजेताईला मी जीवंतपणे ईथून हाकलले ती मेल्यावरही इथे यायची हिम्मत करणार नाही. पण ते पूर्वज अतृप्त आहेत. ती सती माता आहे व तो ग्रीक गृहस्थ ज्याने वाळूचे घडयाळ बनविले तोही वावरत असतो. त्याने अन्यत्र असे घडयाळ पुन्हा बनवू नये म्हणून म्हणे त्याला भिंतीत चिनून मारले किंवा अन्य काही केलें. नक्की कल्पना नाही पण तो अदृश्य झाला. वाळुचे घडयाळाजवळ तो सुध्दा लांब झगा घालून घडयाळ पुसत वावरतांना दिसतो. कोंबडयाचे दिशादर्शक यंत्र बुरुजावर रंगवणारा चित्रकार तर म्हणे विहिरीत बुडून वारला. कुणा घेणेकऱ्याला म्हणे कधीतरी त्या फाशीच्या आंब्याच्या झाडावर फाशी दिले. अनेक रहस्यच रहस्य या आमचे करोडोच्या जायदाद मध्ये आहेत.

माझा एखादया नवोदित कलाकाराला बोलावून आत्मचरित्र लिहायचा विचार होता, जेवढेच या जगात नाव जगवण्याचा अट्टाहास दुसरे काय? साठे सांगतो म्हणून मी हे लिहीले बघा. शिवाय मी आशाराजेताईवर केलेल्या अन्यायाचे थोडे परिमार्जन होईल. आत्मचरित्र म्हणजे उकिरडा नव्हे कि घाण बाहेर टाकावीं. पण कॅथेरसीस साठी मी किती नीच आहे हे लिहीणे

भाग होते. साठे लिहीत होते. हा राजमहल वाच्छानीच्या घशात जाण्यापूर्वी थोडा शेवटचा प्रयत्न करायचा. म्हणून लिहीतो –माझे आत्मचरित्र गाजले तर पुन्हा नाव होईल हा पुन्हा स्वार्थ आहेच. एखाद्या चित्रपट अभिनेत्या बरोबरच्या येथील चित्रीकरणाबद्दलचा नटीचा वाद कथित प्रेमसंबंधाबद्दल एखादा चटक धडा, खोटे नाटे प्रकरण घालून पण कटुता टाळून लोकप्रियता मिळवण्यासाठी वादळ उठवता येईल. या राजमहालात चित्रपटाचे वांरवार शूटींग होईल हा राजमहाल वाडा गजबजेल, मिळकत सुरू होईल. हे लिहीणे भाग होते.

आता मी वृध्द झालो. पण पत्नी मला बघत नाही, माझी सेवा करत नाही. माझी सर्व शुश्रुषा करणे ती यशोदाची आई सेवा भावाने करते. आशाराजेताईचा फोटो टांगावासा वाटतो, पण मी पत्नीला घाबरतो व अल्बममधून चोरुन चोरुन बघतो. पलकोंके किनारे कजरारे सारखे ते डोळे हसतात. राजमहालात सर्व कुटुंबाचा कौटुंबिक फोटो पाहून वाटते. क्या पाया हमने ईन्सान होके?

बावनखणी देखणी आशाराजेताई माती मोलाने जगली, जिवंतपणी मेली. मी कन्यादान केले नाही. बहीणीला बाहेर फेकले. मला हल्ली पुजा करावीशी वाटत नाही. ते देव फसवे आहेत. आशाताईराजेवर अन्याय झाला तेव्हा हे फोटो हे टाक, यामूर्ती माझ्या व सितारामराजेच्या डोक्यावर पडायला हव्या होत्या. माझी ओळख मुले असूनही निर्वंशी! सोन्याभाऊराजे अपघाताने जळून वारले व आम्ही भावांनी राज्य बळकावले. कदाचित आमची मुलेही माझ्या मरणाची वाट पहात असतील कारण मी माझे वडिलांना मारले... मी आदित्यराजे बोलता बोलता गप्प झालो. व शब्द सावरुन घेत म्हणालो.

कारण मी मुलींना हक्क नाकारले! कारण मी बहिणीला भातुकलीतून उठवले. देव म्हणत असेल बहिणी नको, मुलगी नको होती ना सुनाही मिळणार नाहीत. मला मुलगी असती तर आशाराजेताईने सोन्या भाऊसाहेबांची केली तशी तिने माझीही सेवा केली असती, तशी भक्ति केली असती. आशाराजेताईशी नीट वागलो असतो तर भोळी मूर्ख आशाताईराजे सेवेला आली असती. ती वडिलांची दाढीही करायची अगदी कपडेही बदलवून घ्यायची. १९ व्या वर्षी फ्लॉरेन्स

नाईटिंगेल्ससारखी वृध्द पित्याची सेवाभावी वृत्ती, तिच्यात त्या प्रेमानेच आणली. तिच्याही मनी कविता करायला स्वप्नी कुणीतरी राजपुत्र असेलच की! मी मात्र पैसा/हुंडा दागिने द्यावे लागतील, खर्च करायचा नाही म्हणून तिची स्वप्ने मारली. मारी गयी गरीब वाला की राह में. मीच तर तिला बदनाम केले. आता माझीही सुहानी रात ढल चुकी.

साठेनी विचारले पुढे काय झाले व तुम्ही नाराज का झालात? परदेशांतून यावे लागले म्हणून?

मी राजे सांगू लागलो. त्या दिवशी शेवटचा प्रयत्न म्हणून मी मुलाला फोन लावला.

'भारतात ये बेटा! ' मी. म्हणालो

'तुम्हीच व्हीसाचे काम झाले कि पुन्हा इकडे या' तो.

'शेवटची भेट होवू दे' मी.

'विकून टाका तो महल आपण ईथे हॉटेल काढू या, चांगले सेव्हन स्टार. परदेशात तिथे आपल्या महालातील पुरातन वस्तूंचे प्रदर्शन ठेवू या! शिवाय तुम्ही मेल्यावर आम्ही दोघे भाऊ भांडणार त्यापेक्षा आत्ताच विका व पैसे वाटून दया. ' तो

'तब्येतीला येणे झेपत नाही शेवटचे म्हणून भेटायला तरी ये, वाटल्यास मी पाच लाख रूपये पाठवतो' मी.

'नोकर ठेवा, पैसा फेकला की सर्व मिळते' तो ओरडला

'नाही रे बेटा, नाही मिळत पैशाने सर्व' मी

'उगीचच रडगाणे लावू नका. मुंबईला जाऊन राहा' तो

तो पिऊन तर्र वाटत होता. कुठेतरी बाहेर जात असेल पण वैवाहीक सहजीवनाचे सुख दोन्ही मुलांना नाही. तरुण अविवाहीत मुले घरात पाहणे व मुलगी न मिळणे मी अनुभवले. मी आता ७० वर्षाचा झालो. माझी सुखी दोन्ही मुले बिनलग्नाचीच राहिली. सितारामराजेही मागच्या वर्षी वारला. त्यानंतर सितारामजीच्या मुलांचा अपघाती मृत्यू झाला पण मुलांचे दु:ख वेदना तडफड त्याला बघावे लागले नाही अगदी थेट मृत्यूची बातमी आली. तसे पाहिले तर राजेपाटील

घराण्याची वारसदार आता कुणी उरले नाही. आशाराजेही आजारीच आहे. आशाराजेचा मुलगा व त्याच्या मुलाचा मुलगा खरा वारसदार होईल. तो हया हवेलीचा, या वाडयाचा, या घरादाराचा वारस ठरेल. तो कोण? टिणपाट तो वारस ठरु नये. पण मी कुणाजवळ अजुन बोलणे केले नाही. परसात शेतीत मी आईवडिलांची मूर्ती बसवली. एक गावकरीही हसत म्हणाला ‘वडील व आई संशयास्पदरित्या वारले. हयानेच मारले असतील. बहीणींना घरात राहू दिले नाही आणि वडिलांच्या मूर्ती शेतात बसवतोय व हे असे राजे!

मी आता पापाचा घडा भरल्याप्रमाणे गप्पच असतो. राजेपाटील कुटुंबाचा वंश संपला आहे. खरेतर लवकरच सर्व घरदार विकून मी व पत्नी परदेशी जाऊन स्थायिक होणार आहोत पण सध्या मला कुणीतरी धरल्याशिवाय बिछान्यातून उठवत नाही. नोकर मिळत नाही, मी जे पेरले ते उगवले. पैसा आहे पण आरोग्य नाही शिवाय पूर्वी मुलगी नको होती बहीण नको होती, म्हणून सूनही मिळाली नाही. वयोमानाने अजून किती जगणार आहे मी! माझ्या क्रूर कर्मातील वाटैकरी झालेले सितारामराजेही सुखी झाला याची असूया मला वाटत राहते. माझे चुकले असे वाटते अर्थात आता काहीही करुन माझ्या चारही बहीणी परत येणार नाहीत.

माझा भाऊ, सितारामराजे भाऊ माझ्या पैशा अडक्यात वाटेकरी नव्हता म्हणून आमचे जरा पटले पण आता या वयात मला त्याचा हेवा वाटतो. उलटपक्षी तो मला मीच काळी जादू करून त्याची मुले मारली असा आरोप करी. हो माझ्या करवी त्यांने गुन्हे घडवले. पैसा पैसा म्हणून मी आयुष्यात काय मिळवले? जुनी घरे विकून टाकली. हा राजमहल फक्त उरला कारण हा ऐतिहासिक वाडा विकता आला नाही म्हणून उरला. नाहीतर तोही विकला असता. पैसा हवा म्हणून नव्हे तर मुद्दाम हाय नको, जून्या पूर्वजांचे काही नको म्हणून किंवा वाच्छानी मागतोय त्याला विकावा लागु नये म्हणून! ही हवेली लीजवर कॉन्फरन्स रुम म्हणून द्यावी का?

खरेतर मी परदेशी गेलो होतो. वरकरणी मी तिथे स्थिर स्थावर झालो होतो. पण त्या उंच अपार्टमेंटमध्येही माझे मन लागत नव्हते. तिथेही मी एक कोपरा पकडला होता. या राजमहालात सोन्याभाऊराजे दादांनी पकडला होता तसा! फक्त दादांच्या मृत्यूची वाट पाहायला

मी व सीतारामभाऊ  असे दोन पुष्ट पुत्र व दोन सुना असे चार जण होते.  माझी मुले अविवाहितच राहिली. त्यामुळे त्यांना आमच्या असण्या नसण्याने काहीच फरक पडत नाही.  पदरेशात सुरवातीला आम्ही खूप मजा केली, पर्यटन केले. तब्येत बिघडल्यावर औषधोपचार महाग आहेत. म्हणून मी कोपऱ्यात पडून असायचो. मी दिवस मोजत होतो!  भारतात वाटते परदेशात जावे पण परदेशी एखाद्या महीन्याने मी परत भारतात जाऊ म्हणत असे.  मी अदेशीच राहिलो माझा देश कोणता? घराची, गावाची, देशाची ओढ काय असते हे मला आता कळतेय.  बहीणीला वडिलांना बेघर केले तेव्हा कळले नव्हते.  बायकोला रजनी राजे ला कशाचेही फारसे वाईट वाटत नाही. मुलांच्या लग्न न होण्याचेही वाईट रजनी राजे ती वाटून घेत नाही.  प्रॅक्टीकल आहे मला मॅचिंग! फक्त म्हातारपणामुळेच मी हळवा झालो आहे. मृत्यू समोर दिसतो त्यामुळे आयुष्याचा रिव्हयू करतो आहे.  माझ्या मुलांचे लग्न न झाल्याने आमच्या राजघराण्यातील रक्ताचा वंश संपला.

**२२देव बाप्पा कुठे राहतो हो?**

देव समोर दिसतो मला त्याची क्षमा मागायची आहे. माझ्याच चूकांची फळे मुलांना कां? नकोशा मुली हाकलल्या पण हवीशी माझ्या मनातली मुलगी सून म्हणून घरी कधी येणार? कितीतरी जण पाप करतात व सूटून जातात मला एवढी मोठी शिक्षा का?

मागे व्हिसासाठी मुंबईला गेलो होतो. तेव्हा आशाराजेताईच्या मुलाचा लेख वाचला. तिच्या सुनेचे पुस्तकही प्रसिध्द होणार आहे. आशाराजेचे वाईट व्हावे म्हणून मी आयुष्यभर तळतळाट केला तिचे चांगले झाले. तसा तर मी पण ठीक होतो. वरवर ठीक दिसणे म्हणजे ठीक असणे असते का?

आशाराजेचे चांगले झाले. माझे तरी कुठे वाईट झाले, मीही लौकीकार्थाने खूषच आहे. पण मनातील भाऊबंदकी जाळत राहते. राजघराण्याला वारस हवा. मुलगीही चालेल पण आधी त्यासाठी मुलांची तर लग्न व्हायला हवी. मुले लीव्हइन रिलेशनमध्ये राहीलीत. त्यांचा संसार मला कुठून बघायला मिळणार?आम्ही दोघांनी भावांनी आयुष्यभर सुखासीन आयुष्य काढले. पण अविवाहीत राहीली, ती ही मुले फक्त माझी रजनीराजेचीच सितारामराजे भाऊची का नाही? दुबळया बहिणीला आशाराजेला प्यादया सारखे वापरून हया लबाड भावाने माझ्याशी रडीचा डाव खेळला!

व्हिसा नाकारला गेला मी व रजनी राजे गावी परत आलो. राजमहालात जाण्याच्या वाटेवर मी व रजनी राजे शिरलो. काही दिवसांनी जमले कि जाऊ मुलांकडे परत असे ठरवले. आनंदगावला यशोदाची आई नावाची मोलकरीण सरबराईला धावून आली. हॉटेलवाला वाच्छानी पुढे आला. त्याच्या अस्तनीतील स्वार्थ दिसत होता. पूर्वीचा राज महालातील पेटलेला जुना महाल जिथे सोन्याभाऊ वारले तो वाडा रजनी राजेनी साफसूफ डागडूजी करायला सांगितला. रजनी राजे व मी वाच्छानीच्या हॉटेलमध्ये थांबलो. वाच्छानीला मी म्हणालो, ‘पत्नीसह परेदशातून मी भारतात गावी राजमहालात परत आलो. दोन्ही मुलगे तिथेच राहीले. परेदशात त्या १०३ व्या मजल्यावर

राहतात. स्वच्छता झाली की उदया महालात जावू ! ' वाच्छानीच्या हॉटेलात आशाराजेंनी काढलेली अभिसारीकेचे चित्र होते सुनी सुनी मैफील असे खाली लिहीले होते. राजमहालाचे जुन्या दालनाचे नवे दार उघडले. घराचा फाटकाचा दरवाजा कर्र आवाज करत उघडला. प्राजक्ताच्या फुलांचे झाड सुकले होते. जाईची वेल मेली होती. घू घू आवाज करत वटवाघळ उडाली. महाल तसा स्वच्छ होता. मी माझ्या दालनाचे दार उघडले. बूट काढले. आत शिरलो. वाच्छानीने सर्व आवश्यक तयारी केली होती. रिकामा कोपरा माझी वाट पहात होता.

मी त्या कोपऱ्यातल्या पलंगावरची गादीची चादर हाताने टिचकी मारुन झटकली. यशोदाची आई नावाची मोलकरीणीने जवळ पाण्याचा तांब्या पेला ठेवला. मला माझ्यात सोन्याभाऊराजे दादा दिसले. मुलीच्या लग्नाची काळजी करणारे सोन्याभाऊराजे आता नव्हते. मी आता सोन्याभाऊराजे दादांची जागा घेतली होती. कदाचित तो कुलपुरुष तिथे त्या कोपऱ्यात बसत असेल. आमच्या राजघराण्याला शापच असेल. मी पुटपुटू लागलो. माझ्या मुलांचे कसे होईल?

मुंबईहून प्रवास, अमेरीकेतील वास्तव्याचा त्रास व शीण, जेटलॅगमुळे झोप लागली. मध्येच लॅसवेगासची मायानगरी आठवू लागली. तर कधी बालपणीचे राजमहालातील दिवस आठवले. क्षणभर ग्लानी आली. वाटले राजमहालातील सर्व पूर्वज हसत आहेत. कोपऱ्यात तेजाचे वलय दिसत आहे. अकाली मेलेल्या बहीणी शिव्याशाप देत आहेत. मी ओरडलो 'मला अजून खूप जगायचे आहे मरायचे नाही' 'मग काय आम्हाला मरायचे हाते? त्या आकृत्या विचारत होत्या. सोन्याभाऊ राजे ओरडले, दूर व्हा. मला ग्लानीतून जाग आली.

मला मी तुझेच गीत गात आहे या चरित्र लेखनाचे काम संपवायचे होते. मी सांगू लागलो त्यानंतर मी आनंद गावचे जीवन सुरू केले. मग वाच्छांनीने तुम्हाला चरित्र लेखनांसाठी महालात पाठविले. आपण नाव ठरवले

मी तुझेच गीत गात आहे. जवळ जवळ दोन महिने झाले मी हे सांगत आहे. हया आठवडयातच ही मैफील संपेल.

रजनी राजेंनी रेडिओ लावला सर्वत्र बातमी येत होती.  आशाराजेंना उत्कृष्ट लेखिका म्हणून व त्यांच्या मुलाला संग्राहक म्हणून अत्युच्च पुरस्कार मिळाला होता.  लेखक साठेंनी मला आदित्य राजे ऐकांना म्हणत आनंदाची बातमी सांगितली व माझे प्रतिक्रियेचा अंदाज घेऊ लागले. वाच्छानी व रजनी राजे बरोबर धीटपणा करुन दालनात आले त्यांच्या हातात मिठाईचा पुडा व ताजी वर्तमानपत्रे होती. माझ्याजवळ येऊन वाच्छांनी म्हणाला, 'आशाराजेंना त्यांच्या पुस्तकासाठी बक्षीस मिळाले पेढे खा'.

वाच्छांनीने मला हातात धरुन अगत्याने उठवले व म्हणाला, 'व्हीलचेअरवर बसा आईसाहेबांच्या समाधीजवळ जाऊन बसू या. '  आधार देत रजनी राजे व त्यांनी मला त्या वाळूच्या घडयाळापर्यंत आणले.  तिथे कोरिव काम केलेली आईराजेसाहेबांची स्मृती समाधीची ती छत्री स्वच्छ केली होती.  कबूतरे फडफडत उडाली.  तिथे आईराजेसाहेबांचा फोटो होता.  त्याला व पादुकांना ताज्या मोगऱ्याच्या फुलांचा हार घातला होता.  वाच्छानीने नमस्कार केला.  पेढा ठेवला व म्हणाला आईराजे तुमचा आदित्य आला आहे व अक्षयही आला आहे.  आम्हा दोघांनाही क्षमा करा.  आईसाहेब आम्ही या राजघराण्याच्या रक्ताचे रक्षण करु शकलो नाही.  आशाराजेला आधार व सुरक्षा देण्यात आम्ही कमी पडलो.  तुमची संस्था आम्ही बंद पडु देणार नाही. देवाच्या दारी आम्हाला हिशोब द्यावाच लागेल पण तुम्ही क्षमा करावी.

मला वाच्छानीचा हेवा वाटला.  मुली, जावई जवळ आहेत म्हणून शिवाय तो प्रामाणिक पणे गुन्हा कबूल करतो आहे म्हणून! सर्व जग बदलले आधूनिक झाले. कपडे बदलले, दागिने बदलले, खाण्यापिण्याच्या सवयी बदलल्या.  पण आमची कोती मनोवृत्ती बदलली नाही!  आमची राजेपाटलांची मुलींना तूच्छ लेखायची वृत्तीही कमी झाली आहे. पण  पूर्वी आमच्या बायका पत्नी आदरणीय होत्या पण मुली व बहीणी नव्हत्या.  आता ही मी लिखाण करुन अमर होऊ ईच्छित आहे. चूक सुधारतो. श्रीमंतांचे मोठयांचे राजेमंडळीचे लिखाण बरीच जण वाचतात.  माझेही वाचतील.  मला खिडकीतून वाच्छानीचे घर दिसत होते व माझी असूया वाढत होती. अनेक वर्षांनंतर वाच्छांनी वर्षानुवर्षे जपलेले ते अबोल, आशाराजेवरचे अव्यक्त प्रेम उघड करत होता.

वर्तमानपत्रात आशाराजेंची सुंदर चित्रे, फोटो व पुस्तकांचे परिक्षण होते. साठेंनी ते सर्व समाधी समोर ठेवले. मी तिचे पंख छाटले. तरीही तिने जखमी असतांनाही भरारी घेतली. जागतिक पातळीवर यश मिळवले आशाराजेचे भाबडे शब्द, भोळीआकृती, उदास रंगसंगती, अश्रु माझ्या नजरेसमोर फिरले.

## २३ 'मरणात जग जगते?

आत्मा अमर असतो. कोणी हया खोटया कल्पना पसरवल्या कोण जाणे. मरणे म्हणजे जाणे! ' ईतरांचे प्रश्न मी तटस्थपणे बघितले. आता ईतर लोक माझे बघत होते. निर्विकारपणे मी आशाराजेंना हाकलले. आशाराजेला मी विसाव्या वर्षी मर म्हणायचो मला सत्तरीत जग सोडवत नव्हते. पण देव मला जगातून हाकलत होता. माझीही भातुकली संपणार होती. मी राजा होतो पण देवाच्या दारी एक बाहुलाच होतो. आशाराजेंना आयुष्य भराच्या कष्टानंतर कुठले एक बक्षीस मिळणार होते. एखादा असता तर आनंद मानला असता पण माझा पुन्हा जीव जळत होता. हया हेव्यापायी भाऊबंदकी पायी मी मरणदारीही तळमळत होतो. आशाराजेताई राजमहालातले घर सोडून गेली. मी जग सोडून जात होतो. तिने महाल सोडून जाताना ढाळलेले अश्रू माझा श्वास गुदमरु लागले. रजनी राजे सोबत होती पण तीही माझ्या मृत्यूची वाट पहात होती. तिच्या नजरेत केव्हां हे जातात व मी सुटते असा भाव होता.

मी पैशाने लंगडा नव्हतो पण मी बहीणीची तजवीज केली नाही. बुध्दीभ्रंश झाल्यासारखी माझी बुध्दीची कुवत कमी पडली, मी बहीणीवर वाईट वेळ आणली. आता ते का आठवावे? मधूनच डोळयासमोर बालपण आठवते. कधी ते लॉस वेगासचे रुपडे आठवे. निवृत्ती सोपी नसते. मरावे असे कुणालाही वाटत नसते. उलट मरणदारी आयुष्य अधिकच सुंदर दिसू लागते. मरतांना मरलीन मन्शेने जगण्यासाठी फोन उचलला होता. तो जगण्याच्या ईच्छेने, औषधोपचार करण्यासाठीच ना केला. मी वीस वर्षाच्या बहीणीला आशाराजेला विहीरीवर काठावर उभा करुन जीव दे तुझ्यामुळे बदनामी होते असे सांगत असे. मला मात्र गात्रे क्षीण झाल्यावर सत्तरीत जगायचे आहे. निर्विकारपणे मी ईतरांच्या दु:खाकडे पाहीलं पण स्वत:च्या बघू शकत नाही. जगायचा हक्क मला आहे. ईतरांना नाही असे मला वाटे. साठे तुम्ही हे सर्व लिहून घ्या साठेंनी त्या समाधीपाशीच हस्तलिखीतात ते लिहिले. जीवना मी तुझेच गीत गात आहे. साठेंनी शेवटचे वाक्य लिहिले व हस्तलिखिताचे पुस्तक मिटले.

पुस्तक कादबंरी संपली. मी लहान मुलासारखा रडू लागलो.

## २३ महफिल सुनी वाटू लागली.

थोडा वेळ समाधीपाशी बसून झाल्यावर साठेने व वाच्छानीने मला आदित्यराजेंना पलंगावर आणून झोपवले. माझया नजरे समोर अस्पष्ट सावल्या हलू लागल्या. सारखी साखळी जुळे व तुटे. जुने गाव, बालपण ते भातूकलीचे खेळ आठवत होते. मध्येच नवे लॉसवेगास दिसू लागले. असंबध्द गोष्टींची साखळी तुटली अंधार पसरला. मला, अर्जून, आईराजे, आशाराजे आठवल्या. भाजल्यावर, दालन पेटल्यावर ओरडणारे सोन्याभाऊराजे आठवले. जगायचे होते पण माझा हात लुळा पडला. माझया नजरेसमोर अंधार पसरला व उघडया डोळयांतून प्राण गेला. राजमहालावर अंधार पसरला. संध्याकाळचा काळा मखमली पडदा पडला. सुर्य खोल दरीत बुडाला. आत्म्याचा प्रवास सुरू झाला.

,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,,

मला आदित्य राजेसाहेबांना शेवटचा निरोप दयायला स्मशानापर्यंत अंत्य यात्रेला सर्व गावकरी जमले होते. पण रडत कुणीच नव्हते. आशाराजेताई त्याचदिवशी अपघात झाल्याने येवू शकली नाही. माझेबद्दल एकाही घरी हळहळ नव्हती. रजनी राजेंनी सामान आवरुन परदेशी जायची तयारी केली. वाच्छानीने त्या राजमहालावर ताबा जमवला. घुमटातून दिंडी दरवाजापासून वाच्छानीच्या मुलीने सर्व कारभार ताब्यात घेतला. तिने भातुकलीच्या राजाराणीच्या उंच लाकडी मूर्ती रंगवल्या. कला दालन सजवले.

सतीच्या समाधीजवळ व आईसाहेबांच्या छत्री जवळच्या काळया सावल्या अधिकच गडद झाल्या. चंद्राच्या प्रकाशातली महफिल सुनी वाटू लागली. जणू आशाताई गात होती.

सुन्या सुन्या मैफलीत माझ्या तुझेच मी गीत गात आहे.

अजूनही वाटते मनाला,अजूनही चॉंद रात आहे. मी तुझेच गीत गात आहे.

राजमहाल विकून मिळालेले पैसे माझे मुलांनी व रजनी राजेंनी वाटून घेतले. तरीही ते तिघं पैशासाठी भांडतच राहिले.

साठेंनी कादंबरी पूर्ण केली. मात्र कुणाचीही बदनामी नको म्हणून काल्पनिक गोष्ट म्हणून प्रसिध्द केली. मात्र एकच नवल शेवटी घडले त्या राजमहालातील तळमजल्यावर सुंदर कलादालन बांधले गेले. तिथे नवोदित कलाकारांना चित्र प्रदर्शन भरवण्यासाठी किंवा गायकांना गाण्याच्या मैफिलीसाठी ते कलाभवन उपयोगी पडू लागले, आर्ट गॅलरी वापरली जाऊ लागली. आशाराजेंची इच्छा पूर्ण झाली. ज्या मैफलीत आशाराजेचे अश्रु पडलेले असत तिथे म्हणे सुंदर मोत्याचे आणि रूद्राक्षाचे मणी अजून सापडतात.

ज्या ठिकाणी पूर्वी मी ड्यूक आदित्यराजे बसत असत तिथे हल्ली वाच्छानी बसून असतो व म्हणतो. ''हया महालात माझ्या आशाराजेचे अश्रू पडले आहेत. म्हणून मला हा महाल हवा होता. प्रेम म्हणजे इच्छा नव्हे, तर जपणूक व वेदना असते. मला दूरवरून आशाराजेचे स्वर ऐकू येतात व भरलेली मैफिली सुनी वाटते.

सुन्या सुन्या मैफलीत माझ्या मी तुझेच गीत गात आहे.

आभाळात आणि सर्व महालात ते सूर घुमतात. घुमटातून दिंडी दरवाजापासून, सागवानी लाकडाच्या कोरिव खांबांमधून त्या गीताचे प्रतिध्वनी ऐकू येतात. राजमहालाची मैफिल अजूनच संगीतमय होते. राजमहाल सांगतो मी तुझेच गीत गाते आहे. राजमहालातील भातुकलीच्या खेळामधील राजाराणी सांगतात मी तुझेच गीत गाते आहे. मनोरे केविलवाणे न होता गातात. वाळूचे घडयाळ थरथरते. सतीची समाधी गूढ बनते. सुन्या सुन्या मैफलीत समया जळत राहतात. आवाज घुमतो

मी तुझेच गीत गात आहे.

**समाप्त**

**टिप :** वरिल कादंबरी पूर्णपणे काल्पनिक आहे. एखाद्या घटनेशी त्याचे साम्य असल्यास तो योगायोग समजावा.

# ई साहित्य प्रतिष्ठान

माणूस किंवा कोणताही सजीव संवेदनशील असतो. त्याच्या डोळयांसमोर कोणी तडफ़डत असेल तर तो आपोआप धावून जातो. म्हणून तर संकट्काळी आपण किंकाळी फ़ोडतो. कारण आपल्याला वाटते की आपली किंकाळी ऐकून, आपला टाहो ऐकून कोणी न कोणी धावून येईल. आपल्या रक्तातील लाखो करोडॊ वर्षांच्या शिकवणीचा तो भाग आहे. संकट काळी टाहो फ़ोडणं आणि दुसर्‍याच्या संकटात धावून जाणं हे आपल्या रक्तात असतं.

पण सध्याच्या व्यापारीकरणाच्या युगात नेमकी याच्याविरुद्ध शिकवण दिली जात आहे. समाज एका असंवेदनशीलतेच्या दिशेला वाटचाल करतो आहे. शेतकरी मरतो आहे, मरेना का? स्त्रियांवर अत्याचार होत आहेत, होईनात का? ’जोवर आपल्या स्वतःपर्यंत संकट येत नाही (आणि ते येणारच नाही अशी खात्री आहे) तोवर मजा करून घ्या” अशी प्रवृत्ती वाढते आहे.

अशा वेळी समाजाला समाजभान यावे, संवेदना आणि सहवेदना जागी व्हावी हे काम उत्कृष्ट दर्जाचे साहित्य करते. प्रस्तुत पुस्तक तसेच आहे. आपण हे पुस्तक वाचा आणि इतरांना वाचायला द्या.

ई साहित्य प्रतिष्ठान दर महिन्याला अनेक उत्तमोत्तम पुस्तके प्रकाशित करते. आपण त्यांचे सभासद व्हा. आणि आपल्या ओळखीच्या सर्व मराठी साक्षरांना या अभियानात सामिल करून घ्या.

आमचा पत्ता :esahity@gmail.com
अधिक माहितीसाठी भेट द्या :www.esahity.com
आपले नम्र
टीम ई साहित्य